# प्रस्तावना.

गेल्या सालीं 'विविध-वृत्तांत' आलेली मराठी शाहीर ही लेखमाला, पुनः पुस्तकरूपानें प्रकाशित करितांना, जरूर वाटलेल्या ठिकाणीं त्यांत भर घातली आहे. संत व पंडित कवींचे अनेक चहाते आहेत, तसे अर्वाचीन नव्या कवींचेही भक्त आहेत. परंतु मराठी राज्याच्या अखेरच्या काळांत, ज्यांनीं केवळ स्वतंत्र पद्धतीची काव्यरचना केली, त्या शाहीर कवींकडे बरेंच दुर्लक्ष होत असतें. तें दूर करण्याच्या इच्छेनें या लेखमालेला 'विविध वृत्तांत' सुरवात करतांना फक्त चार किंवा सहा लेखांकांत हा विषय पुरा करण्याचा उद्देश होता. पुढें लिहिण्यास सुरवात केल्यावर संकल्पित प्रकारापेक्षां जास्त विवरण करण्याची आवश्यकता भासूं लागली. शाहिरांच्या काव्यांतील वैशिष्ट्य, त्यांच्या काव्याची तुलना वगैरेचें विवेचन करावेसें वाटूं लागलें आणि या लेखाचा विस्तार पुष्कळच वाढला.

शाहिरी काव्याची चर्चा करितांना मराठी कविता व वाङ्मय यांविषयीं सामान्यतः जें विवेचन केलें आहे त्यांतील कित्येक मुद्यांसंबंधानें मतभेद होण्याचा संभव आहे. त्याविषयीं इतकाच इशारा द्यावासा वाटतो कीं, संत कवींच्या काव्याची चर्चा करितांना लेखकानें त्यांची कृति केवळ 'काव्य' या दृष्टीनें अभ्यासिली आहे. ईश्वरी अवतारांनीं केलेली प्रासादिक रचना, अशी भावना त्या कविते विषयीं धरलेली नाहीं; त्याबद्दल कोणा संतभक्तांचा रोष झाल्यास इलाज नाहीं.

लेखमाला चालू असतां, अनेक सूचना करून ज्या मित्रांनीं उत्तेजन दिलें त्यांचा मी आभारी आहें. त्याचप्रमाणें ही लेखमाला कंटाळवाणें भारूड आहे, असा इशारा देऊन ती कंटाळवाणी न होतां वाचकांस चित्तवेधक वाटेल अशा स्वरूपांत ठेवण्याची ताकीद वारंवार देणाऱ्या टीकाकारांचेही उपकार कदाचित त्यांच्या नकळत झाले आहेत.

महाराष्ट्र सरस्वतीची ही सेवा गोड करून घेण्याची महाराष्ट्र वाचकवृंदास सविनय विनंती आहे.

मुंबई,
ता. २० मार्च १९३०.

श्रीपाद महादेव वर्दे.

# मराठी शाहीर.



## थोडासा पूर्वेतिहास.

तें हें दिव्य कवित्व दुर्विधिवशें हीनत्व कीं पावलें !
त्याची बूज करावया न अगदीं कोणी कसें राहिलें ?

—केशवसुत.

शाहीर आणि त्यांचीं कवनें यांनीं मराठी वाङ्मयांत अढळ स्थान मिळविलें आहे. शाहीरांच्या पोवाड्यांत मराठ्यांच्या इतिहासाचीं अमूल्य बीजें आहेत ही गोष्ट विद्वन्मान्य झालेली आहे. इतकेंच नव्हे तर कित्येक प्रसंगीं इतर ऐतिहासिक साधनांपेक्षां पोवाड्यांना जास्त विश्वसनीय समजण्याकडे कित्येक संशोधकांचा कल झुकतो. पोवाड्यांतील ऐतिहासिक माहितीला कोणत्या बाबतींत महत्त्व द्यावें हा प्रश्न वादग्रस्त आहे. मराठी राज्याच्या इतिहासाचें साधन म्हणून पोवाड्यांना बरेंच महत्त्व आहे; तथापि मराठी काव्य आणि भाषा यांच्या इतिहासांत पोवाड्यांची योग्यता त्याहून विशेष आहे. पोवाडे हा जसा शाहिरी-वाङ्मयाचा एक भाग आहे तसाच लावण्या, फटके आणि कटाव हा त्याच शाहिरी-वाङ्मयाचा दुसरा भाग आहे. शाहिरी वाङ्मयाच्या या शाखेचा परामर्ष घेणें हा प्रस्तुत ग्रंथाचा उद्देश आहे.

आंग्लपूर्वकाळीं मराठी वाङ्मयांत गद्यरचना फारच थोडी होती. या काळांत मानभावांचे सांकेतिक भाषेंत लिहिलेले सांप्रदायिक ग्रंथ, बखरी, वैद्यक, ज्योतिष, मंत्रशास्त्र व रसायनक्रिया वगैरे शास्त्रीय विषयांवरील ग्रंथ, याबाहेर मराठी गद्यसारस्वत फारच थोडें आढळेल. वेताळपंचविशी, सिंहासनबत्तिशी यांसारखे गद्यग्रंथ लिहून ते मुलांकडून वाचविण्याचा प्रघात होता, असें महाराष्ट्र-सारस्वतकार लिहितात. नाना फडणविसांचें आत्मचरित्र, हनुमंत स्वामीकृत रामदास-चरित्र वगैरे चरित्रात्मक असे कांहीं गद्य ग्रंथ होते; परंतु तेही बखरवजाच होते. यांतील कांहीं बखरींची

भाषा डौलदार, तेजस्वी, प्रौढ व जोरदार आहे; तथापि या बखरीवजा गद्य वाङ्मयाचा फारसा प्रसार झालेला नव्हता. कोणत्याही भाषेचा इतिहास घेतला तरी मुद्रणकलेनें वाङ्मयांत क्रांति घडवून आणिली आणि पद्यरचनेला श्रेष्ठ स्थानापासून खालीं ओढून गद्य सारस्वताला वरचें स्थान दिलें, असें आढळून येईल. मुद्रणकलेचा प्रसार महाराष्ट्रांत व हिंदुस्थानांत आंग्लोत्तर काळांत झाला. आंग्लसत्तेनें हिंदभूमि अंकित केल्यावर ज्या अनेक घडामोडी झाल्या, त्यांत हिंदी वाङ्मयाच्या प्रांतांत गद्य व पद्य यांच्या स्थानांचीही उलटापालट झाली; हें स्थित्यंतर साहजिकच घडून आलें. मुद्रणकलेचा प्रसार होण्यापूर्वी पद्यरचनेला महत्त्व कां होतें व छापखान्यांच्या सोईमुळें गद्याला श्रेष्ठत्व कां आलें हें थोडयाशा विचारानें समजून येण्यासारखें आहे आणि त्याचें विवेचनही आजवर अनेकदा झालेलें असल्यामुळें त्याच्या विवेचनांत येथें शिरण्याचें प्रयोजन नाहीं. एक गोष्ट मात्र निर्विवाद आहे. ती ही कीं, मुद्रणकलेनें जी क्रांति घडवून आणिली तिच्यामुळें पुढील काळांत महाकाव्यांना पूर्वीसारखी मान्यता मिळणें शक्य नाहीं.त्याप्रमाणेंच परमार्थासारख्या विषयाचें देखील विवरण करून त्याचा जनतेंत प्रसार करावयाचा झाल्यास यापुढें पद्यरचनेपेक्षां गद्याचें अवलंबन करणें जास्त फलदायक होईल. तथापि संगीतकला आणि पद्यरचना यांचा अन्योन्याश्रयसंबंध जडलेला आहे; गद्यापेक्षां पद्य हें पठण करण्यास सुलभ आहे; गद्यापेक्षां पद्याच्या योगानें थोडया शब्दांत जास्त अर्थ संकलित करितां येतो; अलंकारयुक्त साहित्यरचनेला गद्यापेक्षां पद्यांत जास्त वाव मिळतो, इत्यादि अनेक गुणांमुळें पद्यरचनेचें महत्त्व राहाणारच !

मराठी गद्य सारस्वताचा खरा जन्म आणि विकास आंग्लशाहीनंतर झाला. त्याप्रमाणेंच मराठी शाहिरी वाङ्मयाची खरी सुरवात शिवशाहीपासून झाली. पेशवाईंत या वाङ्मयाचा विकास झाला आणि पेशवाईनंतर लवकरच तें अस्तंगत होऊन आधुनिक मराठी काव्याच्या रूपानें त्याचा पुनर्जन्म झाला असें म्हणतां येईल. शिवपूर्वकाळांत शाहिरी वाङ्मय मुळींच [illegible] असें म्हणणें अविचाराचें होईल. अग्निनदास ऊर्फ अज्ञानदास [illegible] केलेल्या

अफझलखान वधाच्या पोवाड्याहून जुना पोवाडा उपलब्ध नाहीं. शिवपूर्वकाळांतील तालिकोट ऊर्फ राक्षसतागडीच्या लढाईची बखर मिळाली आहे; त्याप्रमाणें वरीलपेक्षां जुना पोवाडा मिळण्याचा संभव दिवसेंदिवस कमी होत आहे, ही खेदाची गोष्ट होय. या पोवाड्याची सुसंबद्ध रचना आणि ठेवण पाहातां शाहीराची कला त्या वेळीं पुष्कळच प्रगतीला पोंचली असली पाहिजे असें दिसून येतें. ज्ञानेश्वरींत मराठी भाषेचें आणि ओवीबद्ध रचनेचें पूर्णतेस गेलेलें स्वरूप दिसून येतें; तें येण्यास मराठी ओवीबद्ध रचनेची सुरवात ज्ञानेश्वरकाळापूर्वी निदान तीनशें वर्षांपासून तरी झालेली असली पाहिजे असें अनुमान काढल्यास तें धाडसाचें होणार नाहीं. तसेंच अज्ञानदासाच्या पोवाड्यांतील अंतर्गत प्रमाणांवरून शाहिरी कवनाला इतकें स्वरूप येण्यास निदान दीड-दोनशें वर्षांचा अवधि लोटला असला पाहिजे असें समजण्यास हरकत नाहीं. गोंधळी आणि शाहीर यांचें अस्तित्व जरी शिवछत्रपतीच्या काळापूर्वीपासून होतें तरी शिवाजीनें मराठी राज्याचा पाया घातला तेव्हांच शाहिरी काव्य भरास आलें व खऱ्या शाहिरी कवनाचा उगम झाला त्यांत शंका नाहीं. कारण पोवाडे गाण्याला खरें स्फुरण देण्यासारखे विषय शाहिरी काव्याला शिवरायाच्या पराक्रमानेंच पहिल्यानें मिळवून दिले. मराठी राज्याचें वैभव जसें वाढत गेलें, तशी पोवाड्याची साधी व गद्यसदृश रचना अपुरी पडूं लागली. वैभवाबरोबर विलासीपणा वाढला. वीररसाला दिवसेंदिवस श्रृंगाराची जोड अधिकाधिक प्रमाणांत मिळूं लागली. त्याचा परिणाम शाहिरी कवनावरही झाला. साधा, सरळ,परंतु जोरदार असा पोवाडा मागें पडून लावणीची रंगेल, मुरकेबाज तान मान्यतेस चढली. लावणीच्या रंगढंगांत कसकसे फरक होत गेले, मराठी राज्याच्या घडामोडीचीं प्रतिबिंबें शाहिरी काव्यांत कशीं दिसून येतात याचें विवेचन पुढें येणारच आहे. त्यापूर्वी इतर मराठी कवितेहून निराळे असे जे कित्येक गुणदोष शाहिरीकाव्यांत आहेत त्यांचें दिग्दर्शन करणें आवश्यक आहे.

मराठींतील सर्वांत जुने उपलब्ध ग्रंथ मानभावी पंथाचे असून ते इसवी सनाच्या अकराव्या शतकांतील आहेत असें रा. राजवाडे यांनीं सांगितलें

आहे. रा. रा. चिंतामण विनायक वैद्य, महाराष्ट्र–सारस्वतकार रा. भावे वगैरे विद्वानांना हें विधान मान्य झालेलें आहे. तथापि ज्याला महाराष्ट्राचा पहिला सर्वमान्य राष्ट्रीय ग्रंथ म्हणतां येईल तो ज्ञानेश्वरी होय. ज्ञानदेव, नामदेव आणि मुकुंदराज यांना समकालीन मानतात. ज्ञानेश्वरीची रचना इ. स. १२९० त झाली. त्यानंतर लवकरच म्हणजे इ. स. १२९३ पासून मुसलमानांच्या स्वाऱ्या दक्षिणेंत होऊन इ. स. १३१२ सालीं देवगिरीचें राज्य अल्लाउद्दीन खिलजीच्या हस्तगत झालें. हरिहर आणि बुक्क यांनीं विद्यारण्य स्वामींच्या सल्ल्यानें इ. स. १३१५ च्या सुमारास विजयानगरच्या राज्याची स्थापना केली. परंतु विजयानगरचें राज्य वस्तुतः महाराष्ट्रीय नसून तुंगभद्रेच्या दक्षिणेस कर्नाटकांत होतें. विजयानगरच्या राज्याची स्थापना झाली त्याच सुमारास बहामनी राज्याचीही स्थापना झाली. सोळाव्या शतकाच्या सुरवातीस बहामनी राज्याचीं पांच शकलें झालीं. ती संधि साधून कृष्णदेवरायानें विजापूर आणि कलबुर्गा हीं शहरें काबीज केलीं. कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधील ज्या सुपीक प्रदेशासाठीं बहामनी सुलतान आणि विजयानगरचे राजे यांच्या दरम्यान नेहमीं युद्धें चालत तो टापू हस्तगत करून रामराजानें कृष्णा नदीपर्यंतचा मुलूख काबीज केला. परंतु इ. स. १५६५ सालीं तालिकोटच्या लढाईंत रामराजा मारला जाऊन विजयानगरचें राज्य नष्ट झालें.

महाराष्ट्राचा इतिहास आणि मराठी वाङ्मय यांचा फार निकट संबंध असल्यामुळें हा इतिहास लक्षांत घेणें आवश्यक आहे. ज्ञानेश्वरीच्या रचनेनंतर दोनतीन वर्षांतच महाराष्ट्रावर मुसलमानांच्या स्वाऱ्या होण्यास सुरवात झाली आणि ज्ञानेश्वरीच्या रचनेनंतर अवघ्या वीस वर्षांनीं महाराष्ट्र मुसलमानांनीं पादाक्रांत केलें. त्यानंतर जरी विजयानगरच्या राज्याची स्थापना झाली तरी महाराष्ट्राचा बहुतेक भाग मुसलमानी सत्तेखालींच होता. परकीय अंमल आणि लढायांची धामधुम यामुळें मराठी भाषेची वाढ खुंटली व पुढें निदान अडीचशें वर्षेपर्यंत चांगला मराठी कवि अगर ग्रंथ झाल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. फार काय, पण ज्ञानेश्वरीदेखील लुप्तप्राय होऊन गेली, तिचें पुनः एकनाथांना अडीचशें वर्षांनंतर संशोधन करावें लागलें. महाराष्ट्रांतील मुसल-

-मानी राज्याची पूर्ण स्थिरस्थावर झाल्यानंतर शांतता प्रस्थापित झाली, त्या वेळीं मुसलमानी राज्यांतही हिंदु सरदारांचें प्राबल्य वाढलें. हिंदु महाराष्ट्र पुन: उदयोन्मुख होऊं लागला; व शिवजन्मापूर्वी सुमारें पाऊणशें वर्षांपासून मराठी वाङ्मय पुन: डोकें वर काढूं लागलें.

या अडीचशें वर्षांत मराठी वाङ्मयाची आबाळ होण्याचें कारण देशांतील अस्वस्थता हेंच बहुश: असावें. दक्षिणेंतील मुसलमान राजांनीं मुसलमानी धर्माचा करडेपणा फारसा गाजविल्याचें दिसत नाहीं. संभाजीच्या निधनानंतर सत्तावीस वर्षें महाराष्ट्रांत जी राजकीय अस्वस्थता उद्भवली, तिचे परिणाम मराठी वाङ्मयाला पुढच्या चाळीसपन्नास वर्षांपर्यंत जाणवले किंवा पेशवाईच्या अखेरीनंतरच्या राजकीय घडामोडीमुळें, देशांत स्वास्थ्य असतांही पुढच्या पन्नाससाठ वर्षांत मराठी वाङ्मयाची वाढ खुंटली, यावरून महाराष्ट्रांतील राजकीय उलाढालींचा मराठी वाङ्मयावर कसा परिणाम होत गेला हें अजमावतां येण्यासारखें आहे. पेशवाईनंतर सुयंत्रित आणि सुव्यवस्थित आंग्ल राज्यकारभार सुरू झाला असतांही सुमारें साठ वर्षेंपर्यंत मराठी वाङ्मयाची प्रगति जर कुंठित झाली, तर ज्ञानेश्वरानंतर मुसलमानी अमलाच्या अंदाधुंदींत अडीचशें वर्षें महाराष्ट्र सारस्वत दडपून गेलें याचें आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. ज्ञानेश्वरापासून एकनाथापर्यंतच्या काळांत मराठी वाङ्मयरचनेला अगदींच खंड पडला होता असें मात्र नाहीं. ज्ञानेश्वरापासून शिवदिनकेसरी व नरहरी, महीपतीपर्यंत म्हणजे सुमारें पेशवाईच्या अखेरपर्यंत पांच साडेपांचशें वर्षें मराठी भाषेंत ग्रंथरचना करणाऱ्या नाथसांप्रदायाची परंपरा अव्याहत चालू होती. परंतु ज्ञानेश्वरानंतरच्या अडीचशें वर्षांत नांव घेण्यासारखा ग्रंथकार झालेला आढळत नाहीं, याचें कारण तत्कालीन अस्वस्थता हेंच असलें पाहिजे. या अडीचशें वर्षांनंतर एकनाथ, मुक्तेश्वर, तुकाराम, रामदास, अशी मालिका सोळाव्या शतकाच्या अखेरीपासून सतराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत लागून राहिली असून पुढें अठराव्या शतकाच्या अखेरीपर्यंतही श्रीधर, महीपती वगैरेंनीं तीच उज्ज्वल परंपरा चालविलेली दिसत येते.

तेराव्या शतकाच्या अखेरीपासून अठराव्या शतकाच्या शेवटापर्यंत हा जो मराठी वाङ्मयाचा इतिहास आहे त्यांत शाहिरी-वाङ्मय श्रीशिवाजी महाराजांपासून उदय पावलेल्या मराठी राज्याशीं एकजीव झालेलें होतें, हा शाहिरी काव्याचा पहिला विशेष होय. आंग्लपूर्व मराठी वाङ्मय विशेषत: पद्यमय आहे हें वर सांगितलेंच आहे. त्या वाङ्मयाचे ठोकळपणें तीन विभाग पाडतां येतील. एक संतकवि, दुसरे पंडितकवि आणि तिसरे शाहीर कवि. अशा तीन प्रकारच्या कवींत हें वाङ्मय विभागलेलें आहे आणि या तिन्ही प्रकारांत भिन्नत्वदर्शक विशिष्ट गुण आढळून येतात.

संतकवींचा ओढा भक्तिमार्गाकडे आहे. संतकाव्य भक्तिमय, निवृत्तिपर, वैराग्य-वृत्तीचें आणि अध्यात्मशील असें आहे. ज्ञानदेव, नामदेव, आणि मुकुंदराज यांच्या वेळीं हिंदु राज्य होतें. त्या वेळीं नुकत्याच म्हणजे बाराव्या शतकांत होऊन गेलेल्या रामानुजांनीं जैन मतांचा पाडाव करून भागवत धर्माचा पाया घातला होता. जैन धर्माची छाया या भागवतधर्मावर पडलेली दिसून येते. त्यामुळें ज्ञानेश्वर, नामदेव आणि मुकुंदराज या तिघांच्याही ग्रंथांत निवृत्ति, वैराग्य आणि अध्यात्म यांचा पगडा बसलेला आहे. शंकराचार्यांच्या वेळेपासून बौद्धमतांतर्गत संन्यासाची प्रतिष्ठा वाढली. प्रपंचाला गौणत्व येऊं लागलें. ही वृत्ति बळावत गेलेली ज्ञानेश्वरींतही आढळते. गीतेचा अंतिम उद्देश अर्जुनाला युद्धास प्रवृत्त करण्याचा आहे; परंतु गीताकथनाचा फायदा घेऊन वेदांताचा ऊहापोह करण्याचा मोह व्यासांना झाल्यामुळें भगवद्गीतेचें स्वरूप असें विचित्र झालें आहे कीं, कर्म, भक्ति, ज्ञान, सांख्य, संन्यास वगैरेवरील व्याख्यानांत तो मूळ उद्देश वाळवंटांत गुप्त झालेल्या सरस्वतीप्रवाहासारखा गडप होऊन गेला आहे.

इदं ते गुह्यमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।
विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥

असें सांगून अर्जुनाला विचारस्वातंत्र्याची मुभा दिल्याचा आभास जरी होतो, तरी त्यापूर्वीचें गुप्तकथन कोणालाही घोंटाळ्यांत घालण्यासारखेंच आहे.

मध्येंच विराट स्वरूपदर्शनासारख्या मेस्मेरिझमच्या प्रयोगानें तर्कशक्तीला भांबावून टाकण्यांत आलेलें आहे. आणि वरील '**यथेच्छसि तथा कुरु**' अशी विचारस्वातंत्र्याची सनद देऊनही लगेच '**सर्वगुह्यतमं वचः**' पुनः सांगितलें आहे. त्यांत ती सनद रद्द ठरवून '**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु–सर्व धर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज।**' हा अनन्यगतिकत्वाचा पूर्ण परावलंबी करणारा अत्यंत गुह्योपदेश आहेच. या श्रीभगवानप्रणीत ब्रह्मविद्येच्या ब्रह्मघोटाळयांतून पार पडणें सामान्य जनांना दुरापास्त आहें. श्रीशंकराचार्य, ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम किंवा टिळक यांच्यासारखे अलौकिक बुद्धिमत्तेचे पुरुष आपल्या प्रज्ञाचक्षूंनीं या गीतोपदेशाचें विराट स्वरूप पाहाण्यास समर्थ झाले असतील. या ब्रह्मविद्येच्या हत्तीचें शुंडाग्रापासून पुच्छमूलापर्यंत सर्वावयवी स्वरूप त्यांनीं तथातथ्य अवलोकन करून जाणिलें असेलही! परंतु सामान्य जनतेची दृष्टि इतकी व्यापक नसल्यामुळें, त्याची चांचपणी करून हातास जो भाग लागला त्याप्रमाणें हत्ती खांबासारखा, मुसळासारखा, सुपासारखा, गोणत्यासारखा किंवा खराटयासारखा आहे, असें ठरविणें सामान्य जनांना प्राप्त झालें. गीतामृतांत पोहोंचण्याचें सामर्थ्य अंगीं असल्यामुळें ज्ञानेश्वरादिकांनीं आध्यात्मिक जगताचा प्रपंच मोठया वैभवानें करून अक्षय कीर्ति संपादिली; परंतु सामान्य जनता ब्रह्मविद्येच्या मृगजलांत पोहण्याची धडपड करून निवृत्तीच्या वाळवंटांत मृतप्राय होऊन पडली. अलीकडे थिऑसफीच्या प्रसारानें जसें घडलें आहे, तसाच कांहींसा प्रकार भागवतधर्माच्या संतकवींनीं घडवून आणिला. स्वतः बिझांटबाई चान्ही खंडांत थिऑसफीचा संसार चालवीत आहेत. थिऑसफीच्या अध्वर्यूमध्यें कर्तबगार आणि उद्यमशील माणसांचा भरणा आहे. परंतु बहुतेक अनुयायीवर्ग बाईंचें आणि त्यांच्या निकट वर्तुळांतील थोर पुरुषांचें कौतुक करीत, व्यवसायविन्मुख होत्साता, मैत्रेयांच्या अवताराची परीक्षा करीत, कृष्णमूर्तीच्या डोक्याभोंवतालचें तेजोवलय हुडकण्यांत गर्क झालेला आढळतो. थिऑसफीनें नादावलेले बहुतेक तरुण, पुढाऱ्यांच्या बुद्धिवैभवानें चकित होत्साते, स्वतंत्र विचारास पारखे झालेले, महत्त्वाकांक्षेचा संन्यास केलेले आणि ऐहिक

सुखाविषयीं उदासीन असलेले असे आढळतात. भागवत धर्माच्या सामान्य अनुयायांची स्थिति अशीच झालेली होती. थिऑसफीनें हिंदुधर्मातील तत्त्वें विशद करून ख्रिस्ती धर्माच्या प्रसारास आळा घातला तसेंच काम भागवत धर्मानें केलें. थिऑसफीनें धर्मतत्त्वांची उजळणी केली, परंतु भाविक भोळ्या समजुती आणि धर्मांधता यांना उत्तेजन दिलें. तसेंच संतकविप्रणीत भागवतधर्मानेंही केलें. स्वत: एकनाथानें अस्पृश्योद्धार केला, पण त्याचे भक्त कोरेच राहिले! संतांची शिकवण निवृत्तिमार्गाला उत्तेजन देणारी, संसार-सुखाला फोल ठरविणारी, प्रापंचिक पुरुषार्थाला धुळीस मिळविणारी आणि अल्पसंतुष्टतेला पोसणारी अशी होती! एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनीं धर्माभिमानाला प्रोत्साहन दिलें,किंवा प्रार्थनासमाजानें भागवतधर्माचें पुनरुज्जीवन केलें, त्यामुळें राष्ट्रीयत्वाच्या भावनेला आणि आकांक्षांना जितका जोर मिळाला असेल, तितका देखील भागवतधर्माच्या वारकरी सांप्रदायापासून स्वराज्यस्थापनेला मिळाल्याचें दिसत नाहीं. 'ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें।' अशा तत्त्वाचा पुरस्कार केल्यानें हिंदु राज्य स्थापन करण्याची आकांक्षा उत्पन्न होणें अशक्य आहे. संताळ्याच्या वारकरी सांप्रदायामुळें स्वराज्याचा उदय झाला, ह्या कल्पनेंत सत्याचा अंश फारच थोडा आहे. शिवाजी, तानाजी, बाजी, येसाजी, चिटणीस, पिंगळे, धनाजी, संताजी किंवा प्रल्हाद निराजी यांपैकीं कोणी पंढरीच्या वाऱ्या करीत असल्याचा उल्लेख आढळत नाहीं; किंवा मराठ्यांच्या सैन्यांत वारकऱ्यांचें एखादें पथक असल्याचीही नोंद इतिहासांत नाहीं. संतकवींच्या काव्यानें मराठी वाङ्मयांत भर घातलेली आहे, पण त्यांपैकीं कोणीही एखादें राष्ट्र-गीत रचलेलें नाहीं. हिंदूंच्या भौतिक जीवनक्रमांत धर्माची किंवा धर्म गणलेल्या रूढींची भेसळ झालेली असल्यामुळें प्रत्येक व्यवहार धर्ममूलक असल्याचा आभास उत्पन्न होतो; ती वस्तुस्थिति नव्हे. मालोजीला आणि शहाजीला ज्या परिस्थितीमुळें राज्यवैभव मिळविण्याची महत्त्वाकांक्षा उद्भवली, त्याच परिस्थितीचा दुसऱ्या मार्गानें दृश्य झालेला परिणाम भागवतसंप्रदायाचें पुनरुज्जीवन हा होय. बहामनी अंमलाखालीं मराठ्यांची सरदार घराणीं टिकाव धरून

होती, परंतु त्याचें तेज व वैभव लुप्तप्राय झालें होतें. तालिकोटच्या लढाईनंतर मुसलमानी राज्याची घडी नीट बसल्यामुळें सुव्यवस्था होऊन बहामनी सत्ताधारी चैनींत आणि ख्यालीखुशालींत रमूं लागले, तेव्हां शहाजीच्या महत्त्वाकांक्षेस अंकुर फुटला. शहाजीच्या मनांत स्वतंत्र हिंदु राज्य स्थापन करण्याचा विचार असावा असें दिसत नाहीं. गोंवळकोंडें अथवा विजापूर यांच्या सत्तेखालीं स्वतःची प्रबळ सुभेदारी स्थापन करण्याचा त्याचा विचार दिसतो. शिवाजीच्या मनांतही सुरवातीस तीच कल्पना असून पुढें त्या कल्पनेचें रूपांतर होऊन रायगडास स्वतंत्र मराठी राज्याची मुहूर्तमेढ रोंवण्यांत आली. संतकवींची कल्पनाही जुन्या निवृत्तिपर भागवत सांप्रदायाचें पुनरुज्जीवन करण्याची होती; त्या कल्पनेंत फरक न होतां ती तशीच अमलांत आली. सुबत्ता आणि शांतता हीं वाङ्मयास पोषक असल्यामुळें सोळाव्या शतकाच्या अखेरीस एकनाथाचें वाङ्मय उदयास आलें. सारख्याच परिस्थितीचे हे दोन भिन्न परिणाम होते. त्यांत अन्योन्याश्रय फारच अल्प होता. ज्या अनुकूल परिस्थितीमुळें निवृत्तिपर भागवतधर्म वाढूं लागला त्याच परिस्थितीच्या अनुकूलतेमुळें हिंदु सत्ता स्थापन करण्याच्या प्रवृत्तीनें उचल खाल्ली. भागवतधर्मांतील निवृत्तीवर देखील या प्रवृत्तिपर भावनेचा छाप बसली आणि अंतरपाट दूर होऊन प्रपंचांत प्रवेश करण्याच्या ऐन मुहूर्तावर पळ काढणारे समर्थ रामदास "आधीं प्रपंच करावा नेटका। मग लागावें परमार्थविवेका॥" अशा शहाणपणाच्या गोष्टी सांगूं लागले. श्री शिवोदयानंतर प्रवृत्तिमार्ग बळावूं लागला; त्याचें प्रत्यंतर रामदासांच्या ग्रंथांत जागजागीं दिसून येतें. रजतमांचा निषेध करून सात्विक वैराग्याची महति गात असतां देखील राजस आणि तामस प्रवृत्तीशिवाय टिकाव लागणार नाहीं अशी कबुली समर्थांनाही द्यावी लागली आहे. तथापि संतकवींचा निवृत्तिमार्गाकडे मुळापासून असलेला ओढा पुढेंही तसाच राहिला.

रामदासांचा शिवाजीशीं प्रत्यक्ष संबंध आलेला होता. त्यामुळें त्यांच्या ग्रंथांत शिवाजी व मराठी राज्य यांचे ओझरते उल्लेख आढळतील.

परंतु इतर संत किंवा पंडित कवींच्या काव्यांत तत्कालीन स्वराज्यांतील उलाढालींचा निर्देश सांपडणार नाहीं. संतकवींचें जगच निराळें होतें. त्यांनीं महाराष्ट्रांतील जातिभेदाची तीव्रता कमी केली. धार्मिक पंथ आणि मतें यांच्या भिन्नतेमुळें वैष्णव, शैव, शाक्त वगैरे पंथांत असलेल्या वैमनस्यांची तीव्रता दूर केली. स्त्रिया आणि शूद्र यांची हेटाळणी कमी केली. असें धार्मिक आणि सामाजिक कार्य संतकवींनीं बरेचसें केलें. त्याचा मराठी राज्यास जो कांहीं अप्रत्यक्ष फायदा मिळाला असेल, त्याच्या मोबदल्यांत टाळकुटया निवृत्तिमार्गाचें प्रस्थ वाढविल्यामुळें झालेली हानि वजा घालणेंही जरूर आहे. प्रपंचाकडे दुर्लक्ष करून परमार्थांत मग्न होण्याची ही वृत्ति पेशवाईनंतर महाराष्ट्रांत आंग्ल सत्ता निर्वेध चालण्यास फार उपयोगी पडली. मराठी राज्य विलयास गेल्याबद्दलचे दुःखोद्गार शाहिरी कवींनीं काढिले आहेत; परंतु संतांच्या भागवत वाङ्मयांत अशा विचारांचा मागमूस आढळणार नाहीं! पंढरीची वारी करण्यास, वाळवंटावर टाळ कुटण्यास, दहिंकाल्याचे घांस भरविण्यास व पांडुरंगास मिठी मारण्यास जोंपर्यंत मोकळीक आहे, तोंपर्यंत राज्य कोणाचें आहे, राजा कोण आहे, भौतिक परिस्थिति कशी आहे, याचा विचार करण्याचें त्यांना कारण नाहीं! राजांचा राजा जो परमेश्वर त्याच्या प्रेमांत दंग झाल्यामुळें राजसत्ता चालविणाऱ्या ऐहिक बुद्रुकांची मातब्बरी त्यांना वाटत नाहीं! ऐहिक सुखोपभोगांचा नायनाट करून देहाची उपेक्षा करणें हेंच त्यांचें ध्येय असल्यामुळें देश भिकेस लागल्याची दिक्कत त्यांना कां वाटावी? मराठी राज्याच्या अखेरीनंतर नांव घेण्यासारखा संतकवि शिल्लक राहिला नव्हता हें खरें असलें तरी, त्यांचा सांप्रदाय व परंपरा हीं चालू होतीं व आहेतही! तथापि राजकारणासारख्या ऐहिक विषयांत औदासीन्य बाळगण्याची त्यांची परंपराही चालूच आहे. किंबहुना सत्ताधाऱ्यांना अवतारी ठरविण्याची वृत्ति या परंपरेंत अबाधित चालू आहे, हें उपासनीची वाक्सुधा वाचल्यास दिसून येईल! प्रख्यात संतकवींच्या ग्रंथांत देखील तत्कालिन राजकिय उलाढालींचा—प्रत्यक्ष तर राहोच, पण अप्रत्यक्ष देखील—उल्लेख मिळण्याची मारामार!

या काळच्या मराठी वाङ्मयाचा दुसरा विभाग म्हणजे पंडित कवींचीं काव्यें. मुक्तेश्वर, वामनपंडित, श्रीधर, रघुनाथपंडित व मोरोपंत यांची आणि कदाचित् महीपतीचीही गणना ठळक पंडित कवींमध्यें होते. या पंडित कवींवरही संतपणाचा शिक्का अगदींच बसलेला नाहीं असें मात्र नव्हे. त्यांची वाणी प्रासादिकच समजली जाते. त्यांच्या नांवावरही कांहीं किरकोळ चमत्कार खपतात. परंतु त्यांचा संतपणा अव्वल दर्जाचा गणला जात नाहीं. संतकवींच्या काव्यांत स्वतंत्रपणा आहे; प्रेमळपणा आहे; कल्पना आहे आणि प्रतिभाही आहे! त्यांच्या काव्यांत निवृत्ति उपदेशिली असली तरी त्यांचें चारित्र्य दांडग्या प्रवृत्तीनें ओतप्रोत भरलेलें आहे. त्यांचे अनुयायी व भक्त यांची वृत्ति मेंढरासारखी बनली तरी ते स्वतः कृतीनें आणि कर्तबगारीनें नरशार्दूल होते. त्यांचा आत्मविश्वास जबर होता. परंपरागत रूढीला आणि वेदांतालाही त्यांनीं स्वतः अनेक वेळां गुंडाळून ठेविल्याचीं उदाहरणें आहेत. परंतु पंडित कवींपाशीं यांपैकीं कांहीं एक नव्हतें. गीर्वाण वाङ्मयाचा मराठींत तर्जुमा करण्यापलीकडे त्यांनीं कांहीं एक कार्य केलें नाहीं. हें भाषांतराचें काम त्यांनीं फार उत्कृष्ट रीतीनें बजाविलें यांत शंका नाहीं. पंडित कवि केवळ भाषांतरे होते, ह्या सत्य विधानाची त्यांच्या भाविक भक्तांना चीड येते आणि वामन–मोरोपंतांच्या काव्यांतील अनेक सुंदर आणि हृदयंगम उताऱ्यांचीं अवतरणें देऊन आपल्या आवडीच्या कवींवरील आरोप उडविण्याचा ते प्रयत्न करितात. परंतु पंडित कवींवर हा आरोप करणारांना त्यांच्या काव्यांची किंमत मुळींच कळत नाहीं हें गृहित धरण्यांत ते घोडचूक करीत असतात. वामन–मोरोपंतांनीं केलेलीं संस्कृत काव्यांचीं रूपांतरें म्हणजे राजद्रोहाच्या खटल्यांत ओरिएन्टल ट्रान्सलेटरच्या ऑफिसांत होणारें शब्दशः भाषांतर नव्हे, इतकें कळण्याची अक्कल पंडित–कवींचे दोष दाखविणारांना आहे. गीर्वाण काव्यामृतांत डुबून त्यांतील माधुर्य मराठी कवितेंत आणणारे पंडित–कवि अगदीं निर्बुद्ध, नीरस किंवा गचाळ आहेत असें कोणाचेंही म्हणणें नाहीं. पंडित–कवींच्या हृदयांत मुरलेला काव्यरस त्यांच्या कृतींत पाझरला नसता तर तसल्या वाळूच्या

डिगांना मराठी वाङ्मयांत स्थानच मिळालें नसतें. त्यांनीं मराठी भाषेंत, महाराष्ट्र-सारस्वताच्या भांडारांत,महाराष्ट्र सरस्वतीच्या रूपलावण्यांत बहुमोल भर घातली आहे आणि मराठी वाङ्मयाच्या भक्तांनींहीं त्यांचा यथोचि किंवा कांहींसा वाजवीहून जास्तच गौरवही केलेला आहे.परंतु पंडित कवींच्या काव्यांतील विचार, कल्पना आणि प्रतिभा हीं संस्कृतापासून घेतलेलीं उसनीं वाणें आहेत. पंडितकवींचा वेदांत आणि विचार संतकवींप्रमाणें निवृत्तिपरच आहे. पंडितकवींच्या काव्याचें याहून जास्त विवरण करणें प्रस्तुत विषयास अप्रासंगिक होईल.

संतकवि आणि पंडितकवि या दोघांचेंही मराठी भाषेवर प्रेम होतें. मराठी भाषेला त्यांनीं वैभवास चढविलें. परंतु भाषेपलीकडे त्यांच्या कृतींत मराठे-पणा नाहीं. त्यांचा वेदांत, त्यांची विचारसरणी किंवा कल्पना यांत महा-राष्ट्रीयत्वाचें असें वैशिष्ट्य नाहीं. नामदेवाचे अभंग शिखांच्या ग्रंथसाहेबांत सहज सामावले, तसें कोणत्याही संतकवीचें किंवा पंडित कवीचें काव्य हिंदुस्थानच्या कोणत्याही प्रांतांत खपेल; अडचण येईल ती भाषेपुरती !

शाहिरी काव्याची गोष्ट तशी नाहीं. मराठ्यांच्या चालीरीति, मराठ्यांचे गुणदोष, मराठ्यांचा स्वाभिमान, मराठ्यांचे विचार, मराठ्यांचा इतिहास यांच्याशीं शाहिरी काव्याचें तादात्म्य झालेलें आहे. मराठी राज्याची आणि साम्राज्याची चढती–उतरती कळा त्यांत प्रतिबिंबित झालेली आहे. शाहिरी काव्य प्रवृत्तिपर आहे. त्याचा परमार्थाकडे ओढा नसून त्यांत प्रपंचाची उत्कट लालसा आहे. त्यानें संसाराला निःसार ठरविलें नसून सारसर्वस्वाचें निधान बनविलें आहे. त्यांत त्यागेच्छा नसून भोगेच्छा आहे. वैराग्य नसून अनुरागाचा रंगेलपणा आहे. त्यांतील सात्त्विकता पुळचट नसून पौरुषसंपन्न आहे. केवळ धार्मिकतेच्या नांवाखालीं तेजोहानि करणाऱ्या सत्त्वगुणाला त्यांत थारा नाहीं. धर्म, अर्थ आणि काम या तीनही पुरुषार्थांना चेतवून ऐहिक मोक्ष देणाऱ्या सात्त्विक, राजस आणि तामस अशा त्रिगुणात्मक सृष्टीचें खरें महाराष्ट्रीय स्वरूप शाहिरी काव्यांत दिसतें. नरदेह रक्तमांसाचा गोळा आहे; रूप क्षणभंगुर अशाश्वत आहे. या वस्तुस्थितीचा उपयोग निवृत्तिपर वेदांतांत

वैराग्याचा उपदेश करण्यासाठीं केला आहे; तर 'रक्तमांसभरित सुरूप मी हिरकणी जसी कोंदणी' असें दिमाखानें सांगून शेवटीं 'स्वरूपाची होइल माती। घडी ही लाखाची जाती॥' तिचा योग्य उपयोग करून घ्या; असें शाहीर गातात!

मराठेशाहीबरोबर शाहिरी-कवनांचा विकास आणि लय होत गेला. शाहिरी कवितेच्या गुणदोषांत मराठ्यांच्या गुणदोषांचे प्रतिबिंब दिसून येतें.

महाराष्ट्राच्या आत्म्याशीं शाहिरी काव्याचें तादात्म्य झालेलें आहे. आज जें शाहिरी काव्य उपलब्ध आहे त्याचा इतिहास महाराष्ट्राच्या इतिहासाशीं संलग्न आहे. शिवरायानें अफझुलखानास मारिलें आणि आपल्या राज्याचा पाया पक्का केला, तेथून शाहिरी पोवाड्याचा इतिहास आपणास मिळतो. श्रीशिवछत्रपतींच्या मृत्यूनंतर मराठी राज्यावर औरंगजेबाचा घाला आला. महाराष्ट्रांतील मराठी राज्याची दैना झाली. संभाजीचा वध झाला. बहुतेक किल्ले मोंगलांनीं घेतले. राजारामाला महाराष्ट्र सोडून कर्नाटकांत जावें लागलें. या काळांतील शाहिरी काव्याचा मागमूसही मिळत नाहीं. शिवशाहीनंतर आलेल्या पेशवाईत शिवशाहीची आठवण बहुतेक नाहींशी झाली. असें कां व्हावें याचा खुलासा मोठ्या चातुर्यानें रा. यशवंत नरसिंह केळकर यांनीं केला आहे. "समोर वहाणारी नदी असतां तींत क्रीडा करण्याचें सोडून त्या नदीच्या उगमस्थानीं जाण्याचा कोण विचार करणार?" असें रूपक योजून, पेशवाईत झालेले पेशवे आणि त्यांचे सरदार यांचें गुणवर्णन करणारे सुमारें दीडशें पोवाडे आज उपलब्ध असतां, पेशव्यांच्या अमदानींत शिवकालीन प्रसंगावर पोवाडे होऊं नयेत आणि शिवशाहीची आठवण बुजावी, या प्रकाराचें रा. यशवंतरावांनीं मोठ्या खुबीनें समर्थन केलें आहे. बंगाल्यांत दिसणारें भागीरथीचें विस्तीर्ण पात्र किंवा काशीक्षेत्रांत दिसणारें गंगेच्या घाटांचें वैभव पाहून मनाचें समाधान होत नाहीं; प्रयागाला भागीरथीच्या शुभ्र जलाशीं यमुनेच्या काळ्या पाण्याचा संगम झालेलें विस्तीर्ण पात्र पाहूनही तृप्ति होत नाहीं! या पवित्र जलाचा उगम कोठून झाला? हिमालयाच्या पायथ्याशीं असलेल्या मैदानांत पसरून संथपणें वहात असलेली भागीरथी

गंगोत्रीहून कशी निघाली असेल? बदरी, केदार आणि हरिद्वार वगैरे ठिकाणीं द्रुतगतीनें वहाणाऱ्या स्रोताखालीं गंगाजलानें हिमालयाचे पाषाणमय पहाड कसे फोडले असतील? त्या पवित्र प्रवाहाला दुसरे क्षुद्र नाले, ओढे किंवा नद्या यांचा संपर्क होण्यापूर्वी तें शुभ्र, शुद्ध, शीतल आणि पावन गंगोदक कसें दिसत असेल? त्या निर्मळ गंगोदकांत काय गोडी असेल? ही जिज्ञासा जर मनांत उत्पन्न होईल, आणि तिच्या तृप्तीसाठीं दऱ्याखोऱ्यांतून, हिमालयाच्या पहाडांतून आणि बर्फांतून गंगेच्या उगमाचें दर्शन घेण्याची ओढ लागेल, तरच भागीरथीच्या पावित्र्याचें आणि महात्म्याचें मर्म कळलें असें म्हणतां येईल! प्रयागांत, वाराणशींत, किंवा कलकत्त्याच्या हुबळींत डुंबून गंगास्नानानें पातकाचें क्षालन झालें, अशा समाधानांत गुंग होऊन गगोत्रीची उपेक्षा करण्याच्या प्रवृत्तीमुळेंच हिंदू यात्रेकरूंनीं आपल्या धर्माला हीनतेस नेलें आहे. शाहूच्या अमदानीपासून 'पेशव्यांच्या आणि पेशव्यांच्या सरदारांच्या पराक्रमाचे प्रत्यहीं नवे नवे निनाद उठत असत, त्यांच्या ताज्या पराक्रमाचे ताजे पोवाडे शाहीरांनीं रचावे व समाजाला तेच ऐकावेसे वाटावे;' 'शिवकालांतले—शिवशाहींतले पोवाडे पाठांतरांतून नाहींसे व्हावे;' 'ते मागें पडून कायमचे पारखे व्हावे;' 'शिवकालावर नवे पोवाडे करण्याची इच्छा होऊं नये;''पेशवाईच्या वैभवापुढें शिवशाहीची आठवण बुजावी;' हाच मराठ्यांच्या स्वभावांतील मोठा दोष! महाराष्ट्राच्या अवनतीचें बीज त्यांतच होतें! मराठी शाहीरांचें काव्य हें या दोषाचें ठळक उदाहरण आहे! पंडित–कवि रामायण–भारतकाळच्या कथा गाऊन हिंदुधर्माची आवड विद्वज्जनांत कायम असल्याचें दाखवीत होते;संतकवि हिंदु वेदांताचे गोडवे गात होते;परंतु मराठे शाहीर, मराठे सरदार, व मराठे मुत्सद्दी, स्वार्थी अहंतेनें आपल्याच वैभवांत गर्क होऊन मराठ्यांच्या पुरुषार्थाचा आणि सत्तेचा उगम असा जो शिवकालीन इतिहास त्याला पारखे होत चालले होते! फार काय,पण पहिल्या बाजीरावाची आठवण देखील मागें पडत चालला होती; त्याचे हिंदुस्थान व्यापणारे बेत व त्याच्या हिंदुपदपातशाहीच्या महत्त्वाकांक्षा दृष्टीआड होत होत्या; पानपतापूर्वीची भक्कम पायावरील मराठी राज्याची इमारत पुढील पिढ्यांना तुच्छ

वाटूं लागली होती ! पानपतानंतर जो पोकळ डोलारा उभा राहिला त्याच्या भपक्यानें मराठ्यांना दिपविलें. कर्नाटकांतील किरकोळ मोहिमांचें महत्त्व वाटूं लागलें. निजामानें आपल्या दरबारांत पेशव्यांची आणि नानाफडणीसांची चेष्टा केल्यामुळें झालेला अपमान भरून काढण्यासाठीं मराठेशाहींतील झाडून सारे सरदार जमा करून जो विजय मिळविला; ज्या विजयामुळें मराठेशाहीला मोठासा लाभ तर झाला नाहींच, पण जेथून उतरती कळा लागली, त्या खर्ड्याच्या लढाईवर सर्वांत जास्त पोवाडे होण्याइतकें, मराठेशाहीचें सर्व पुण्य खर्चून मिळविलेल्या त्या विजयास खरें महत्त्व नव्हतें. खर्ड्याच्या लढाईवरील पोवाडे, मराठेशाहींत पोकळ डौल कसा आला होता याची उत्तम साक्ष देतात. राजपुताना, माळवा, गुजराथ, वऱ्हाड, येथें मराठ्यांचें साम्राज्य चिरस्थायी करणाऱ्या लढाया नजरेआड व्हाव्या आणि खर्ड्याच्या लढाईंतील 'लांबहाते बुळे वाघ सवाई। वाघमारे कुळ धनगर भाई!' यांसारख्यांच्या याथा पोवाड्यांत नोंदल्या जाव्या हें मराठ्यांच्या त्या वेळच्या मनःस्थितीचें उत्तम निदर्शक आहे. शिवनिधनकालापासून शाहू छत्रपतीच्या वेळेपर्यंत मराठी राज्याची दैना झाली, त्या काळांतले पोवाडे उपलब्ध झालेले नाहींत. शाहू छत्रपतीच्या अमदानींत शाहिरी कवनांना पुनः अंकुर फुटला. आज जें शाहिरी काव्य उपलब्ध आहे तें बहुतेक पानपतानंतरचें आहे. मराठ्यांच्या इतिहासाचें आणि स्वभावाचें तत्कालीन स्वरूप त्यांत ओतप्रोत रेखाटलेलें आहे. शाहू छत्रपतीच्या कारकीर्दीच्या उत्तर भागांत म्हणजे पहिल्या बाजीरावाच्या निधनानंतर मराठ्यांची मर्दुमकी कमी झाली, पण त्यांचा मर्दानी बाणा कायम होता. त्यांत रंगेलपणाही शिरूं लागला; तशी पोवाड्याला लावण्यांची जोड मिळाली. पोवाडे आणि लावण्या रचणारे शाहीर प्रथम ब्राह्मणेतर होते. पुढें ब्राह्मणांनींही शाहिरी पेशा घेतला. त्यापूर्वी ब्राह्मणेतर शाहिरांच्या पोवाड्यांना जो मान होता तो त्यांच्या लावण्यांना नव्हता; परंतु ब्राह्मण शाहीर लावण्या गाऊं लागले तेव्हांपासून शाहिरी काव्याच्या या भागालाही शिष्टमान्यता मिळाली. त्या वेळीं ब्राह्मणी वर्चस्व इतकें झालें होतें कीं, 'मराठेशाही' मागें पडून 'ब्राह्मणी राज्य जोरदार'

असेंच शाहीर गाऊं लागले. मराठेशाहींतील हें स्थित्यंतर देखील शाहिरी काव्यांतून पहावयास मिळतें. सातारचा शिववंश मागें पडून पेशवेच 'नृपति,' 'भूप,' राजेंद्र' होऊन बसल्याचें शाहिरी काव्यांत गायिलें आहे.

अशा रीतीनें मराठ्यांचें राज्य. मराठ्यांचा स्वभाव व त्यांचे गुणदोष शाहिरी काव्यांत प्रतिबिंबित झाले आहेत. जुन्या मराठी वाङ्मय याचें सर्वांगीण परिशीलन करून महाराष्ट्र सारस्वतकारांसारख्यांनीं 'शाहीरांचीं गाणीं हीं मराठ्यांचीं खरीं गाणीं आहेत,' अशी साक्ष दिली आहे. ते म्हणतात, "ज्यांची प्रेमानें आठवण ठेवावी अशा प्रसंगांचीं चांगल्या शाहिरांनीं वर्णनें करून आपल्या देशास ऐकविलीं आणि आनंदानें व स्फूर्तीनें लोकांचे देह फुगवून सोडिले. बाकी जे टाळ कुटीत बसले, आणि मृत अशा संस्कृताच्या छंदाला अनुसरून भारतरामायणांतल्या कर्मकथांचीं पुराणें पुनः पुनः सांगत सुटले, जे लोक आर्यादिकांच्या उसन्या कसरतींत बांधले राहिले, त्याचें कांहीं नाहीं. त्यांना देश तरला काय आणि बुडाला काय !! तो हंसला काय आणि रडला काय ! ! एकच ! त्यांचीं तीं पुराणें संथपणें चालूच होतीं. त्यांच्या वाग्देवीला सगळे दिवस सारखेच होते. त्या सरस्वती देवीपुढें ते आपलीं पुराणें सांगत बसत व तीं ती ऐकत बसे."

रा. यशवंतराव केळकर लिहितात कीं, "शाहिरी वाङ्मयाचा कोणताही प्रकार पाहिला तरी त्याच्या समकालीनत्वामुळें त्यांत सत्य इतिहासाचे सुवर्णकण चोहींकडे विखुरलेले सांपडतात. तो पोवाडा असो किंवा लावण असो–फार काय, पण ज्याचा इतिहासाशीं अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं असा एखादा पौराणिक विषयावरचा पोवाडा असो त्यांत कर्त्याच्या काळाचें कोणतें ना कोणतें तरी सामाजिक व राजकीय चित्र थोडें तरी उमटलेलें दिसेल."

"आमच्या संस्कृतज्ञ कवींचीं किंवा त्यांच्याच धर्तीवर रचना करणाऱ्या कवींचीं कवनें हिंदुस्थानांतल्या कोणत्याही भाषांत भाषांरित केलीं, तरी तीं कोठेंही चालून जातील. मराठमोळ्याची खूण अशी त्यांत दिसणार नाहीं."

हें रा. भावे यांचें विधान पंडितकवींप्रमाणेंच संतकवींनाही बरेंच शोभेल. तुकारामाचे, नामदेवाचे, किंवा जनीचे अभंग टागोरच्या गीतांजलीपेक्षांही 'नोबेल प्राइझ' मिळविण्यास पात्र ठरतील; परंतु लावणीचें स्वारस्य कोणत्याही भाषांतरांत उतरणें शक्य नाहीं आणि मराठ्यांचें हृदय हेलावून सोडणाऱ्या पोवाड्यांतील भावनेची ओळख महाराष्ट्राबाहेरील परप्रांतीयाला होणें दुर्घट आहे.

जगांतील निरनिराळया देशांत ज्या राज्यक्रांत्या झाल्या आणि ज्या भिन्न-राज्यपद्धति अंमलांत आल्या, त्यांपैकीं बहुतेकांचीं उदाहरणें शिवराज्यारोहणापासून बाजीरावाच्या राज्यसंन्यासापर्यंतच्या उण्यापुऱ्या दिडशें वर्षांच्या मराठी इतिहासांत सांपडतात. मराठ्यांच्या इतिहासांतील यांपैकीं बहुतेक भागांवर शाहिरांच्या वर्णनाचा प्रकाश पडलेला आढळल. शेवटच्या रावबाजीच्या रंगेल अविचारामुळें 'देखत देखत घरांत शिरलेला फिरंगी बोका' जेव्हां घराचा स्वामी होऊन बसला, तेव्हां महाराष्ट्र 'आलिया भोगासी सादर' झाला. या बोक्याच्या पंजाच्या बोचकाऱ्यांनीं निघालेल्या वाभाड्यांवर फुंकर घालून त्याच्या केसांवरून हात फिरवीत 'किती हो मृदु हें शरीर!' अशी वाखाणणी करणारा महाराष्ट्र आणि राजारामाच्या वेळचा महाराष्ट्र यांत किती अंतर पडलें होतें तेंही तात्कालीन शाहीरी काव्यांत दिसून येतें! राष्ट्रांत उदयोन्मुख क्षात्रतेज असेल तेव्हां राष्ट्रकवि स्फूर्तिदायक कवनें गावून तें तेज चेतवितात; परंतु सामान्य जनता ज्या वेळीं हतबुद्ध होऊन सोन्याच्या शृंखला अभिमानानें मिरविण्यास तयार होते, तेव्हां कवींचीं काव्येंही पिंजऱ्यांतील पक्ष्यांप्रमाणें गोड आणि सुरेल ताना मारितात—त्यांतून स्फूर्तीचे तेजोद्गार सहसा निघत नाहींत. या नियमास महाराष्ट्र अपवाद नाहीं.

मराठ्यांच्या मनोवृत्तींचें श्राव्य रूप—तेंच शाहिरांचें काव्य! शाहिरी काव्य म्हणजे मराठ्यांच्या अंतःकरणाचे सहजोद्गार! शाहिरी काव्यांतील गुणदोष ते मराठ्यांच्या वृत्तीचे गुणदोष! पेशवाईच्या अखेरच्या प्रत्येक नांवाजलेल्या शाहिरानें रंगेल लावण्या रचल्या, तसेच मराठी राज्यावर किंवा

राज्यांतील घडामोडींवर पोवाडे गायिले! तें शाहिरी काव्य म्हणजे महाराष्ट्रीय अंतःकरणाच्या तारा छेडून निघालेला नाद! मराठी राज्याची इतिश्री होतांच त्या तारा तुटल्या! किंचित्काल बदसूर ध्वनि निघून चोहोंकडे सामसूम झालें! एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस महाराष्ट्राचें मूर्च्छित हृदय पुनः धडधडूं लागलें तशा त्या तारा जुळूं लागल्या! मोगरे, केशवसुत, टिळक, गोविंदाग्रज वगैरे शाहीर त्या तारा पुनः छेडण्याच्या प्रयत्नास लागले. अभिनव महाराष्ट्राचें अंतःकरण पुनरपि त्यांच्या कवनांत प्रतिबिंबत झालें आहे! शाहिरी काव्याचा शिवकालापासूनचा इतिहास असा आहे!

शाहिरी काव्यांत महाराष्ट्राचा स्वभाव प्रतिबिंबित झालेला आहे. दक्षिण हिंदुस्थानांत दिसून येणारा हेंगाडेपणा महाराष्ट्रांत नाहीं; तशीच उत्तर हिंदुस्थानांतली दरबारी रुबाबदार ऐटही नाहीं. युरोपखंडांत इंग्रज म्हणजे गर्विष्ठ, तुसडा, तुटक, आत्मसंतुष्ट समजला जातो; तसाच कांहींसा मराठ्यांविषयीं इतर हिंदी प्रांतांचा समज आहे. दुसऱ्याला मनांतून तुच्छ समजावयाचें व बोलतांना मात्र 'मी तुमचा बंदा गुलाम आहें; मी तुमच्या कुत्र्याचा कुत्ता आहें;" असें म्हणावयाचें, हा तोंडदेखला खुषमस्करी बाणा मराठ्याला प्रयत्न करूनही साधणार नाहीं. आपण एक वेळ सगळ्या हिंदुस्थानचें स्वामित्व गाजविलें होतें ही जाणीव या पडत्या काळांतही मराठ्यांच्या मनांतून मेलेली नाही; मग ज्या वेळीं वस्तुस्थितीच तशी होती त्या वेळच्या कवनांत ती दिसून आल्यास नवल नाहीं. "दिल्लीवर लावले झेंडे, फिरविली द्वाही!" हा अभिमान त्या वेळीं वाटणें साहजिक होतें. आजच्या जगांत जसा इंग्रजांविषयीं मत्सर पसरला आहे, तसा त्या वेळीं हिंदुस्थानांत मराठ्यांविषयीं वाटत होता आणि तो अगदींच निष्कारण होता असें म्हणतां येणार नाहीं. मुसलमानांनाच नव्हे, तर हिंदूंनाही मराठ्यांचा छळ सोसावा लागत होता. "राखो बाजी लाज!" म्हणून त्रस्त हिंदू राजांनीं गजेंद्रांप्रमाणें मराठ्यांना आपले त्राते समजून त्यांचा धांवा करण्याचे दिवस गेले होते. आज रजपुतांवर खंडणी बसव, उद्यां बंगाल्यावर मोर्चा फिरव, परवां कर्नाटक लुटून आण, असा लुटीचा मामला मराठ्यांनीं चालविला होता; त्या कामीं हिंदू किंवा मुसलमान हा भेदाभेद

त्यांनीं ठेविला नव्हता. पानपतच्या संग्रामांत या बेमुर्वतखोरपणामुळेंच मुसलमानांच्या जुटीशीं मराठ्यांना एकटें तोंड द्यावें लागलें होतें; तरी त्यांचा तो क्रम चालूच होता. त्यामुळें कर्नाटकांतील कांहीं भागांखेरीज मराठ्यांविषयीं हिंदुस्थांत इतर कोणाला आपलेपणा वाटला नाहीं आणि मराठ्यांनींही कोणाविषयीं तसा आत्मभाव धरिला नाहीं. त्यामुळें मराठ्यांच्या चालीरीतींत आणि स्वभावांत जें महाराष्ट्री वैशिष्टय कायम राहिलें तें शाहीरांच्या कवनांत दिसून येतें. मराठ्यांच्या स्वभावांतील ताठरपणा आणि वीर्यसहज बेफिकीरी वीररसप्रधान पोवाड्यांत दिसून येते; तशीच शृंगाररसप्रधान लावण्यांतही दिसून येते. पोवाडे राजकारणी उलाढालींचा इतिहास सांगतात; राजपुरुषांचें वर्णन करितात; वीरपुरुषांची मर्दुमकी गातात. परंतु लावण्या सामान्य जनतेच्या हृदयाचा ठाव घेतात; स्त्री–पुरुषांच्या मनाचीं कोडीं सोडवितात; साधारण मनुष्यालाही बेफाम करून सोडणारा जो मनोविकार तो उच्छृंखल झाला असतांही नैतिक बंधनांचा दाब कायम होता कीं ढिलावला होता याची साक्ष देतात! पानपतानंतर देखील मराठमोळ्यांतील सामान्य जनतेंत विषयवासनेसारख्या मनोवृत्तीलाही कशीं बंधनें होतीं व दुसऱ्या बाजीरावाच्या अमदानींत तीं कशीं सैलावत गेलीं, तें शाहिरांच्या लावण्यांवरून कळतें. पेशवाईच्या अखेरीस आणि अखेरीनंतर नीतिभ्रष्टता कशी फैलावली असावी त्याचा प्रभाकर कवीच्या कित्येक लावण्यांवरून चांगलाच बोध होतो.

इंग्रजी रीतिरिवाजांचा व विशेषत: ज्याला ' व्हिक्टोरियन युग ' म्हणतात त्या काळच्या आंग्ल शिष्टपणाचा परिचय झाल्यामुळें जे शिष्टाचार, जी शिष्टमान्य भाषा आणि ज्या शिष्टपणाच्या कल्पना आज आमच्या समाजांत रूढ झालेल्या आहेत त्यांहून मराठेशाहींतील शिष्टमान्यता निराळी होती. शिरोभूषण, धोतर आणि उपरणें एवढें आच्छादन असल्यावर अंगाचा बहुतेक भाग उघडा राहिला तरी त्याची खिसगणती नसे. भाषा जोरदार करण्यासाठीं जे शब्द किंवा म्हणी उघडपणें नि:शंक वापरल्या जात, त्यांची आज अश्लील वाङ्मयांत गणना होते. बहुपत्नीकत्व किंवा एखादें दुसरें अंगवस्त्र असणें हें वैभवाचें लक्षण समजलें जाई. आज जी नैतिक शिष्टाचारांची प्रगति

झाली आहे, तिची पिच्छेहाट करून पुनः पेशवाईच्या वातावरणांत शिरावें हें इष्ट नाहीं; तथापि त्या काळाला आजच्या शिष्टतेच्या कल्पना लावणें योग्य होणार नाहीं. क्रॉमवेलच्या वेळच्या प्यूरिटनांच्या कडक नीतिमत्तेशीं तुलना केल्यास दुसऱ्या चार्लस्ल्या वेळची नीतिभ्रष्टता किळसवाणी वाटते; परंतु प्यूरिटन कडकपणाची ती प्रतिक्रिया होती हें विसरून चालणार नाहीं. तिसऱ्या जॉर्जच्या अमदानींत मोकाट सुटलेल्या नैतिक शैथिल्याची पुनः प्रतिक्रिया होऊन व्हिक्टोरियन नीतिमत्तेचा दांभिकपणा फैलावला. राष्ट्राच्या जीवनक्रमांतील ही नैतिक भरतीओहोटी लक्षांत घेतली पाहिजे. अडीचशें-तीनशें वर्षांच्या परधर्मी सत्तेला झुगारून देतांना शिवकालीन महाराष्ट्राची नीतिमत्ता बरीच शुद्ध असावी असा तर्क होतो. शाहूपूर्वीच्या औरंगजेबी इंग्याखालीं विलासप्रियतेला वाव मिळणें शक्य नव्हतें. शाहूच्या अमदानींत शांतता आणि समृद्धि वृद्धिंगत होतांच विलासप्रियतेवरील दडपण निघालें आणि वसईच्या लढाईंत ज्याची नीतिमत्ता कसास उतरली, त्या चिमाजी-आप्पाच्या ज्येष्ठ बंधूच्या घरांत उत्तर हिंदुस्थानी विलास मस्तानीच्या रूपानें नांदूं लागला. शीर हातावर घेऊन मर्दुमकीची मुशाफरी करणाऱ्या शिपाई-गड्याला महाराष्ट्रानें अशा धर्मभ्रष्टतेची किंवा नैतिक च्युतीची माफी करण्याचा प्रघात पाडला. होनाजीबाळाच्या कांहीं लावण्यांत या प्रघाताची छटा दिसते. परंतु “ आजची घडी येईल काय उद्यां ? ” अशा मर्दुमकीच्या व्यवसायांतील वीराला मिळालेल्या सवलतीचा फायदा घेण्यास रावबाजीसारख्या रंगेल ‘मंचकमल्ला’नें सुरवात केली, त्याचा परिणामही समाजाच्या नैतिक अधःपातांत झाला. नरानें मादीचा पाठलाग करावा, तिला रिझवावें, आणि वळवून, समजावून आपलेंसें करावें हा मनुष्येतर प्राणिसृष्टीचा धर्म आहे. ज्या राष्ट्रांत वीर्य असतें, मर्दुमकी असते, तेथें रमणीचे प्रेमकटाक्ष आपल्यावर पडावे म्हणून अहमहमिका करणारे वीर शौर्याची शर्थ करितात. पुरुषानें स्त्रीची मनधरणी करणें आणि तिनें त्याचें प्रेम कसोटीस लावणें हा एक पुरुषार्थाचा प्रकार आहे. शाहिरी कवनांच्या पहिल्या भागांत हें पौरुष दिसून येतें. परंतु रावबाजीच्या ढंगांनीं मराठ्यांच्या मर्दुमकीस ग्रहण लागत चाललें,

तसा विपरीत प्रकार होत गेला. पुरुषानें रुसावें, मुरकावें आणि स्त्रीनें समजावणी आणि मनधरणी करावी असा प्रघात पडूं लागला ! हें परिवर्तन मननीय आहे.

शाहिरी लावण्यांचा बराच भाग अशा स्त्रीपुरुषविषयक संबंधाच्या वर्णनानें भरलेला असल्यामुळें या वाङ्मयाची छाननी करण्यास लेखणी कचरते. शृंगार आणि उत्तान शृंगार हा या वाङ्मयाच्या बऱ्याचशा भागाचा विषय आहे. परंतु ‘ एकाच वीररसांचीं हीं दोन अंगें आहेत; ज्या राष्ट्रांच्या 'अंगांत सामर्थ्य आणि वीररस हीं दोन्ही खेळत असतील त्यांनाच हीं दोन्ही तऱ्हेचीं कवनें सुचतील; ज्यांना असलीं काव्यें आवडतनाशीं झालीं, अप्रयोजक वाटूं लागलीं त्यांच्यांतून वीररस जात चालला, जाईल किंवा गेला असें समजावें.’ हें महाराष्ट्र सारस्वतकाराचें म्हणणें मननीय आहे. मराठेशाहीची अखेर आणि आंग्लाईचा उदय या काळांतील मराठी मनोभावनांचा अभ्यास उद्बोधक आहे. रावबाजीच्या प्रोत्साहनानें आलेला अश्लील भाग सोडला तर शाहिरी लावणी आर्यसंस्कृती-सहज शालीनतेला सोडून नाहीं. होनाजीबाळानें वर्णिलेल्या ‘ धीर गंभीर स्नेहाळ ’ युवतीप्रमाणें

‘ नाजुक रुपडें बुंद मुखोटा नवतीची लाली । पदरांतुन वर नजर पाहसी सात्विकपणें खालीं ॥ ’ असा तिचा थाट आहे.

‘ मराठमोळा तुझा । जपुन चाल लोक छिनाल म्हणतील, नको नागी उडवूं भुजा ॥ ’ हा उपदेश पदोपदीं आठवल्यामुळें स्वैर जाण्याची कधीं क्षणभर लहर आली तरी शाहिरी लावणी दचकून भानावर येते. सगनभाऊ-सारखा ‘ रंगेला सुलतानी असमानी ’ संवगडी मिळाला किंवा “ गुंतला कर्जाच्या कमळांत । द्रव्यकृपेचा प्रकाश पडल्या सुटुन जाईल स्वकुळांत ’ अशा आशेनें लुंग्यासुंग्या यजमानांना खुलविण्याची पराकाष्ठा करणाऱ्या प्रभाकरासारख्या बुभुक्षिताच्या तावडींत सांपडून ‘ नार नखऱ्याची ’ होण्याचा तिला कधीं मोह पडला, तरी “ चाल तुझी मराठमोळ्याची ! ” हें वाक्य कानांत गुणगुणल्यासारखें होऊन ती लगेच भानावर येते ! आणि ‘ यांत मजा

तरि कोणती बरी असेल वाटली चित्ताला । सांगुन फेडा भ्रांत, योग्य या गोष्टी न होती चतुराला । कधीं नव्हते गुण असे, आज आणले कोठून या प्रसंगाला ? " असा, ' कांतासंमिततयोपदेशयुजे ' प्रश्न करून, बेफाम होऊं पाहाणाऱ्या शाहिराला त्याची वाग्वधूच ताळयावर आणते ! मराठमोळयाची नैसर्गिक शालीनता आणि पवित्रता लावणींत असल्यामुळें, ती एखाद्या प्रसंगीं उच्छृंखळ झाल्यासारखी दिसली तरी शेवटीं, " तूं पाक सुरत कामिना । कीं दाही बोटीं मीना । हातामध्यें वीणा । घेउनी गाती । तुला गुणीजन. अवघे चहाती ॥ गाण्यांत कुशल सर्वदा । पाहुन तुझा आदा । भुलुन झुकले । सुगर-जन नाग होउन डुलले ॥ " असेच शेवटीं उद्गार निघतात. तिच्याविषयीं मन कितीही पूर्वग्रहदूषित असलें, तरी सोंवळेपणाचा टेंभा मिरविणाऱ्या मोर-पंडिताला रामजोशाच्या लकेरीनें माडीवरून खालीं खेंचलें; तोच प्रकार बाल-गंधर्वाची ' नका टाकूनि जाऊं ' ची तान फोनोग्राफच्या प्लेटींतून अनेक शिष्टमन्यांच्या अंतर्गृहांत शिरून आजही करीत असलेली दिसते !

शाहिरी लावण्य दिवसेंदिवस लुप्तप्राय होत होत चालल्या आहेत. मोडींचें बालबोध रूपांतर, गोंधळ्यांचें अशुद्ध पाठांतर वगैरेंमुळें या वाङ्मयाचें रूप कसें विकृत झालें आहे, त्याचें सोपपत्तिक वर्णन रा. यशवंतराव केळकरांनीं फार चांगल्या रीतीनें केलें आहे. ज्या सहा शाहिरांच्या काव्याचें विवेचन करावयाचें आहे त्यांपैकीं परशरामाशिवाय, रामजोशी अनंतफंदी, होनाजी-बाळा, प्रभाकर व सगन या पांचाजणांचीं चरित्रें ' ऐतिहासिक पोवाडे ' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत शक्य तितक्या पूर्णपणें दिल्यामुळें तीं पुनः देण्याचें कारण नाहीं. विवेचनास अवश्य तितका त्यांतील भाग घेणें. साह-जिक आहे ! शिष्टाचाराच्या खोटया कल्पनांमुळें व कित्येकदा त्याहून दोषास्पद अशा कारणांमुळें या वाङ्मयाचा बुद्धिपुरःसर लोप करण्यांत येतो. पुष्कळ वर्षांपूर्वीं शिळाछापावर छापिलेलें एक लावण्यांचें पुस्तक एका गृहस्थाकडे होतें त्यांत अनेक सुरस लावण्य होत्या. परंतु नाना फडणीसांच्या विलासप्रियतेचें वर्णन केलेल्या कांहीं लावण्या त्यांत असल्यामुळें दुसऱ्या एका इसमानें तें पुस्तक नेऊन नाहींसें केलें. " राज्य डुबाया बम्मनका ! " हें

नाना फडणीसावरील कवनही लुप्तप्राय झालें आहे. पेशवे, फडणीस किंवा इतर ऐतिहासिक व्यक्ति यांची कीर्ति शाबूद ठेवण्यासाठीं अशा गौण उपायांचा प्रयोग करण्याची आवश्यकता नाहीं. सटरफटर संतकवींचें देखील संशोधन करण्यासाठीं जसे परिश्रम केले जातात, तसे शाहिरी काव्याचें संशोधन करून तें नष्ट न होऊं देण्यासाठीं झाले पाहिजेत. शाहिरी वाङ्मयाविषयीं असलेल्या गैरसमजामुळें त्याची फार अनास्था झालेली आहे. हा गैरसमज दूर करण्यास हातभार लावावा या हेतूनें उपलब्ध अशा सहा शाहीरांच्या काव्याचें विवरण करण्याचें योजिलें आहे.

---

# रामजोशी

## देवादिकांवरील लावण्या

**कविरायाचा बोल नव्हे कीं फोल डोल ध्यानीं समजा ॥**

—रामजोशी.

रामजोशी हा पंडित कवि आणि शाहिर कवि यांना जोडणारा दुवा आहे. मराठी काव्यवाङ्मयांत रामजोशींचा उदय होईपर्यंत त्या वाङ्मयाची स्थित्यंतरें कशीं होत गेलीं व त्या स्थित्यंतरांचा उगम मराठ्यांच्या राजकीय इतिहासाशीं कसा पोंचतो तें पाहिल्याखेरीज शाहिरी काव्यांतील गुणदोषांचें मर्म उमजणार नाहीं. यासाठीं रामजोशांच्या कवितेचा प्रत्यक्ष विचार करण्यापूर्वी तेथपर्यंतचा वाङ्मयेतिहास व राजकीय परिस्थिति यांचा परस्पर संबंध कसा होत गेला तें पाहिलें पाहिजे.

मराठी वाङ्मयाचा विचार करितांना ज्ञानेश्वरीपासून सुरवात कां करावयाची तें मागेंच सांगितलें आहे. ज्या भक्तिपर वाङ्मयामुळें मराठी भाषेला शिष्टमान्यता मिळण्याइतका तिच्या स्वरूपाचा विकास झाला त्या भक्तिपर भागवत वाङ्मयाचा म्हणजे संतकाव्याचा आरंभ ज्ञानेश्वरीपासून असून त्याच्या उत्कर्षाची परमावधि तुकारामाच्या अभंगांनीं झाली. भागवत धर्माच्या परंपरेचा अभिप्रायही असाच आहे.

संतकृपा जाली । इमारत फळा आली ॥
ज्ञानदेवें रचिला पाया । रचियेलें देवालया ॥
नामा तयाचा किंकर । तेणें केला हा विस्तार ॥
जनार्दन एकनाथ । ध्वज उभारला भागवत ॥
भजन करा सावकाश । तुका जालासे कळस ॥

या तुकोबाच्या अभंगांतील रूपक संतकाव्याचा इतिहास यथार्थतेनें दाखवितें. भागवत सांप्रदायांतील भक्ति आणि वैराग्य या दोन्ही तत्त्वासंबंधानें वर्णन करण्याचें तुकारामानंतर बाकी राहिलें नाहीं; हें एक कारण ! व तुकारामाच्या प्रयाणाच्या वेळीं महाराष्ट्राची बदललेली राजकीय स्थिति हें दुसरें कारण ! तुकारामाच्या अंतकाळीं शिवाजीचा उदय झालेला असून राजकीय परिस्थिति बदलली होती, ती वैराग्याला अनुकूल नव्हती. तुकारामानंतरही वारकरी भागवत सांप्रदायाची परंपरा आजतागायत चालू आहे; परंतु वरील अभंगांत वर्णिलेल्या चौकडींत शोभेल असा पुरुष त्या परंपरेंत पुढें निर्माण झाला नाहीं. ह्या बदललेल्या परिस्थितीचा परिणाम रामदासांच्या ग्रंथांत व चरित्रांत दिसून येतो. पूर्वी दर्शविल्याप्रमाणें शिवराज्यस्थापनेपासून झालेल्या प्रवृत्तिप्रवण महाराष्ट्रीय मनोवत्तीचीं लक्षणें रामदासांच्या ग्रंथरचनेंत दिसून येतात. परमार्थाइतकेंच प्रपंचालाही महत्त्व आहे, हें रामदासालाही पटूं लागलें. दासबोधाच्या उत्तर भागांत भौतिक प्रगतीची जी छटा दिसते तिचा उगम शिवकालीन राज्यक्रांतींत आहे. शिवकालीन क्रांतीचे परिणाम अनेकविध आहेत. त्यांची चर्चा अत्यंत उद्‌बोधक असल्यामुळें त्यांचें थोडेंसें दिग्दर्शन येथें केल्यास अनाठायीं होणार नाहीं.

भोंसल्यांच्या घराण्याहून जास्त खानदानीचीं मराठे घराणीं शिवकालीं होतीं. ईर्षा, असूया, स्वार्थ वगैरे कारणांमुळें त्यांपैकीं फारच थोड्यांनीं शिवकार्याला साहाय्य केलें; अनेकांनीं शिवाजीला विरोध केल्याचें आढळतें. त्यामुळें शिवाजीला दुय्यम प्रतीच्या मराठे घराण्यांचें साहाय्य घ्यावें लागलें. कित्येक तर नवीनच वैभवास चढलीं. पेशवाईंतही हाच प्रकार आढळतो;

पेशव्यांना ज्यांची मदत झाली व जीं मराठे घराणीं पेशवाईत वैभवास चढलीं तीं मुळांत हीन स्थितींतलीं होतीं. स्वराज्यारंभापासून मराठ्यामराठ्यांतसुद्धां लहानमोठेपणाच्या व मानापमानाच्या कल्पना कशा तीव्र होत गेल्या तें यावरून दिसून येतें. एकाच जातींत केवळ कुळाच्या खानदानीमुळें असा प्रकार घडला; मग भिन्न जातींत अभिमानाच्या भावना कशा वाढत गेल्या असतील त्याची कल्पना सहज होईल. आजच्या परिस्थितीवरून ही कल्पना चांगलीच होते. आंग्ल सत्तेचा कांहीं अंश अधिकारांच्या रूपानें हिंदी लोकांच्या हातीं येण्याचा संभव दिसूं लागतांच जातिप्रेम, जात्याभिमान वगैरे भेदभाव कसे तीव्र होत गेले, हा अनुभव सुधारणांचा कायदा झाल्यापासून आपणांस येत आहे, पारशीं, मुसलमान, ब्राह्मणेतर वगैरे समाज मॉंटफर्ड-सुधारणांपूर्वी जितक्या एकदिलानें राष्ट्रीयसभेंत भाग घेत, त्या मानानें आज घेत असलेले दिसत नाहींत. किंबहुना राष्ट्रसभा ही हिंदु उच्चवर्णीय आणि त्यांच्याशीं समरस झालेले इतर थोडेसे सुशिक्षित यांची संस्था बनली आहे. यावरून स्वराज्योदयावेळच्या परिस्थितीची कांहींशी कल्पना करितां येईल. एकनाथतुकारामादि वारकरी सांप्रदायिकांमध्यें जातिभेदाची तीव्रता कमी होण्याची सक्रिय चिन्हें दिसत होतीं. परंतु शिवकालाच्या सुरवातीपासून पालटूं लागलेल्या जातिविशिष्ट भावनांचा माग रामदासाच्या पुढील वचनांत आढळतो.

नीच प्राणी गुरुत्व पावला । तेथें आचारचि बुडाला । वेद शास्त्र ब्राह्मणाला । कोण पुसे ॥ ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले । गुरुत्व सांडूनि झाले । शिष्य शिष्यांचे ॥ गुरुत्व आलें नीच याती । कांहीं येक वाढली महंती । शूद्र आचार बुडवीती । ब्राह्मणांचा ॥ हें ब्राह्मणास कळेना । त्याची वृत्तीच वळेना । मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ॥

तुकाराम आणि रामेश्वर भटजीसारखे ब्राह्मण यांमधील गुरुशिष्याच्या नात्यास उद्देशून वरील खोंच नसेलच असें म्हणवत नाहीं. रामदास पंचाय-

तनांतील जयराम, रंगनाथ, आनंदमूर्ति व केशव स्वामी हे सर्व ब्राह्मणच होते हें लक्षांत घेण्यासारखें आहे. वरील वचनांत दिलेल्या भावनेला वारकरी सांप्रदायाचीं तत्त्वें अनुकूल नव्हतीं. त्यामुळें रामदासांसारख्या कर्तृत्ववान् पुरुषानें स्वतःचा नवीन सांप्रदाय काढावा, मठ वगैरे बांधून त्याची शिस्तवार रचना करावी आणि त्या सांप्रदायाला राजाश्रय मिळविण्याजी खटपट करावी हेंही साहजिक होतें. 'तुमच्या देशीं वास्तव्य केलें, परंतु तुम्हीं आमचा समाचार घेतला नाहीं,' असें पत्र लिहून शिवाजीला आपली व आपल्या सांप्रदायाची ओळख देणें; पुढें राजगुरु झाल्यानंतर 'आम्हीं काय कुणाचें खातों रे। तो राम आम्हाला देतो रे॥' असे समर्थपदाला योग्य उद्गार काढणें यांत जरी विसंगतपणा भासला तरी दोन्ही प्रसंगांतील कालावधि व समर्थसांप्रदायाचें वाढतें महत्त्व लक्षांत घेतां, त्यांत कांहीं अनुचित आहे असें म्हणतां येणार नाहीं. रामदासांच्या मनोभावनेंत कसे फरक होत गेले, शुद्ध निवृत्तिमार्ग बदलत जाऊन प्रवृत्तिमार्गाविषयीं सहिष्णुता रामदासांच्या ठिकाणीं कशी उत्पन्न झाली, याचीं प्रत्यंतरें दासबोधांत मिळतात. या बदलत्या भावनेमुळें दासबोधांतच अनेक परस्पर विसंगत वचनेंही आढळतात. याविषयीं इतरत्र ऊहापोह झाला असून तो प्रस्तुत विषय नसल्यामुळें झालें इतकेंच दिग्दर्शन पुरेसें आहे. रामदास हे संतकवि असले तरी त्यांचा सांप्रदाय ज्ञानेश्वर–तुकारामांच्या सांप्रदायापासून भिन्न असण्याचें कारण समजण्यापुरताच ऊहापोह वर केला आहे.

शिवनिधनानंतर महाराष्ट्रावर अवरंगजेबानें जी प्रचंड स्वारी केली तिचे परिणामही असेच महत्त्वाचे घडले. त्या स्वारीच्या लाटेंत जातिविशिष्ट भावनांच्या वाढत्या दुहीवर कांहीं वेळ दडपण पडलें. दक्षिणेंतील मुसलमान राज्यांच्या आश्रयास असलेलीं कित्येक मराठे घराणीं आश्रयहीन होऊन स्वराज्यांत मिळालीं. मराठी राज्यावर हें गंडांतर आलें नसतें तर रामदासी सांप्रदायाचा विकास होऊन त्यांतील प्रवृत्तिपर भागाला महत्त्व आलें असतें; राजनीति आणि भौतिक शास्त्रें यांचा जास्त विचार होत गेला असता; बागा-

ईत, इमारती, किल्लेबांधणी वगैरे विषयांवर ग्रंथरचना होत गेली असती, असें वाटतें. परंतु अशा प्रकारच्या शास्त्रिय, भौतिक आणि प्रापंचिक विषयांचा आणि वाङ्मयाचा रीतसर अभ्यास होण्यास पाहिजे तसें स्वास्थ्य मराठी राज्यास मिळालें नाहीं. अशा विषयांचा अगदीं तुरळक आणि ओझरता उल्लेख करणारे रामदास हेच पहिले व शेवटचे ग्रंथकार झाले; तसेच संतकवींच्या मालिकेंतील तेच शेवटचे थोर संतकवि झाले. त्यांच्यानंतर प्रवृत्तिमार्गाला योग्य दिशा देण्याचें सामर्थ्य असलेला कवि महाराष्ट्रांत झाला नाहीं आणि निवृत्तिमार्गाकडे कर्तृत्ववान् पुरुषाचें मन वळावें अशी परिस्थिति राहिली नाहीं. त्या वेळच्याप्रमाणें जातिविशिष्टत्वाला महत्त्व येण्याचा प्रसंग पुन: आला तेव्हां, रामदासानंतर निर्माल्यावत् झालेला समर्थ सांप्रदाय पुढें दोनशें वर्षांनीं पुन: टवटवी घेऊं लागला.

शाहू महाराजांच्या राज्यरोहणापासून मराठी साम्राज्याची वृद्धि आणि लय हीं अवघ्या शंभर वर्षांत घडून आलीं. मोंगल धाडीच्या वावटळींतून डोकें वर काढून मराठी सत्तेचा पाया दृढ करण्यांत बाळाजी विश्वनाथापासून पानिपतपर्यंतचा काळ लागला. त्या काळांतील अस्वस्थतेंत वाङ्मयवृद्धीस पाहिजे तशी अनुकूलता नव्हती. यामुळें त्या काळास अनुरूप अशा प्रवृत्तिपर सांप्रदायाची घटना झाली नाहीं. तथापि हिंदूंच्या अंगीं मुरलेली धर्मप्रीति आणि स्वराज्य असल्यामुळें मिळालेली थोडीशी अनुकूलता यांमुळें धर्मग्रंथांचा—संस्कृत ग्रंथांचा—अभ्यास कायम राहून श्रीधरासारखा पंडित कवि उदयास आला. संस्कृत अध्ययनाची परंपरा पूर्वीपासून चालू होती. एकनाथांचें नातू मुक्तेश्वर आणि रामदासांचा समकालीन वामनपंडित यांनीं हेंच कार्य केलें होतें. व पुढेंही पेशवाईच्या अखेरीपर्यंत पंडित कवि संस्कृताचें अध्ययन करून मराठी वाङ्मयांत भर टाकीत गेले.

पानिपतानंतर महाराष्ट्रांतील मराठेशाहीचा पाया डळमळीत झाला. पानिपतच्या घोर पराभवांतून निभावून मराठशाहीनें पुन: वर डोकें काढिलें; निजाम आणि हैदर यांचा मराठ्यांनीं एवढ्या पराभवानंतरही नक्षा उतर-

विला; यावरून मराठी राज्य हिंदुस्थानांत किती प्रबळ होतें तें दिसून येतें. अगदीं अपरिचित, नवीन आणि शास्त्रबुद्ध भौतिक प्रगति केलेल्या युरोपियन राष्ट्रांना तोंड द्यावें लागलें नसतें तर मराठ्यांनींच हिंदुस्थान व्यापिलें असतें असें अनुमान काढल्यास वावगें होणार नाहीं. परंतु पानिपताच्या पूर्वी चारच वर्षें प्लासीच्या लढाईनें आंग्लसत्ता बंगाल्यांत दृढमूल केली होती. पानिपताच्याच सालीं फ्रेंचांचा पुरा मोड करून इंग्रजांनीं कर्नाटक व्यापिलें आणि निजामाच्या राज्यांतही ठाणें बसविलें. पानिपतानंतर अवघ्या बारा वर्षांत मराठी राज्य पेशव्यांच्या घराण्यांतील गृहकलानें पोखरलें गेलें. हैदर व कोल्हापूरकर यांचा ससेमिरा सारखा मागें लागल्यामुळें मुंबईकर इंग्रजां-पुढें नमतें घेऊन १७७६ सालीं पुरंदरच्या तहानें साष्टी सोडून देणें मराठ्यांना भाग पडलें. तेथपासून इंग्रजांच्या सर्वव्यापी धोरणाशीं टक्कर देतां देतां शेवटीं महाराष्ट्राला त्यांच्या पचनीं पडावें लागलें. मध्यंतरीं इ. स. १७८२ पासून १८०२ पर्यंत वीस वर्षें इंग्रजांशीं प्रत्यक्ष युद्ध नव्हतें. तथापि महादजी शिंदे व नाना फडणवीस यांची चुरस, सवाई माधवरावाचा मृत्यु, शिंदे, होळकर वगैरे सरदारांतील वैमनस्यें, टिपू व निजाम यांजबरोबर झालेलीं युद्धें वगैरे धामधुमीमुळें तो वीस वर्षांचा काळही अवस्थतेचा गेला. इ. स. १७७३ त नारायणरावाचा खून झाला तेव्हां-पासून महाराष्ट्राची राजकीय, सामाजिक, धार्मिक व नैतिक अवनति झपा-ट्यानें सुरू झाली. ती थांबविण्यास पंडितकवि समर्थ झाले नाहींत किंवा एखादा संतकविही उदयास आला नाहीं. कवि किंवा लेखक हे राष्ट्राच्या मनोवृत्तींना वाचा देतात; राष्ट्राची प्रगति केवळ कवींकडून होत नसते, त्या काळाचें हुबेहूब चित्र मात्र शाहीरकवींनीं काढिलेलें पाहाण्यास मिळतें. शिवकालांतील व शाहू छत्रपतीपासूनची ऐतिहासिक परिस्थिति शाहिरांनीं पोवाड्यांत वर्णिली आहे, तशी त्या काळांतील समाजस्थिति उपलब्ध लाव-ण्यांत आलेली आहे. या काळांतील ज्या सहा शाहिरांच्या लावण्यांचा भाग आज प्रसिद्ध झालेला आहे त्यांपैकीं रामजोशी हा वयानें किंवा कालक्रमानें नसला तरी मान्यतेंत पहिला होय.

रामजोशांपूर्वीं शाहीर व गोंधळी होते. ज्या फडानें रामजोशाचें कवन पहिल्यानें प्रसिद्ध केलें त्या फडाचा नायक धोंडीबा शाहीर देखील चांगला कवि होता. परंतु विद्वता आणि जातिश्रेष्ठता यांच्या जोरावर रामजोशांनीं लावणीला प्रथम शिष्टमान्यता मिळवून दिली असें दिसतें. रामजोशाचा जन्म १७६२ सालीं झाल्याचें शालिग्रामांनीं सांगितलें आहे. हा सन चुकीचा असावा असें रा. यशवंतराव केळकरांचें मत आहे. रामजोशी व त्यांचे बंधु मुद्गलभट यांच्या मध्यें १७७८ त फारीखत झाली व त्या वेळीं जें साडेनऊशें रुपयांचें कर्ज होतें त्यांतील सहाशेंचें एकट्या रामजोशानें केलें होतें, असा उल्लेख आहे. सोळा वर्षांचा मुलगा भावाशीं भांडून विभक्त होईल किंवा त्याला इतकें कर्ज मिळेल या गोष्टी रा. यशवंतरावांना असंभाव्य वाटतात; परंतु रामजोशाचा स्वभाव लहानपणापासून हूड आणि स्वच्छंदी होता; भावापासून विभक्त होतांच घरासमोरच धोंडीबाच्या फडांतील टोळभैरवांची संगत धरून तो लावण्या गाऊं व रचूं लागला. अशा उनाड वृत्तीचीं पोरकीं मुलें किती लहान वयांत आपल्या पायावर उभीं राहाण्यास समर्थ होतात, त्याचीं अनेक उदाहरणें आज देखील पहावयास मिळतील! त्याकरितां अकबर, थोरले माधवराव, क्लाइव्ह वगैरे असामान्य पुरुषांचीं चरित्रें धुंडाळावयास नको! जोशीबुवांचें घराणें, इनाम, वर्षासनें, वृत्ति, वगैरे साधनांनी संपन्न असें असल्यामुळें अशा गुणी बाळाला कर्ज देणारे हरीचे लाल त्या काळांतही मिळणें फारसें कठीण असेलसें वाटत नाहीं. त्यांतून अज्ञानाचे करार रद्द ठरविणारा कायदाही त्या वेळी नव्हता हें लक्षांत घेतल्यास शालिग्रामांनीं दिलेलें साल चुकीचें ठरवून रामजोशांचा जन्म चार वर्षें किंवा त्याहून मागें नेण्यास रा. यशवंतरावांनीं दिलेलीं कारणें योग्य आहेत असें वाटत नाहीं. फारिखत १७७८ मधील आहे व वयाच्या विसाव्या वर्षी रामजोशाला मुद्गलजोशांनीं घरांतून काढून लाविल्यावर त्यानें पंढरपुरास पाध्येशास्त्र्यांकडे जाऊन अध्ययन केलें असा उल्लेख शालिग्रामांनीं केलेला आहे; त्यावरून रा. यशवंतराव केळकरांनीं रामजोशांचा जन्म १७५८ त किंवा त्यापूर्वीं झाला असावा असें अनुमान केलें असेल. परंतु फारखत १७७८ सालीं झाली असली, तरी पुन्या वांटण्या

आणखी चार वर्षांनीं म्हणजे १७८२ त व्हावयाच्या, अशी तजवीज ती फारखत करण्याच्या वेळीच झालेली दिसते. म्हणजे त्या चार वर्षांत दोन्ही बंधू पूर्णपणें वेगळे झालेले नसून फक्त हितसंबंधाचा वेगळेपणा झालेला असावा व खाणेंजेवणें वगैरे व्यवहार एकत्रच होत असावे. फारखतींतील व्यवस्थेप्रमाणें पूर्णपणें विभक्त झाल्यावर, विसाव्या वर्षीं स्वतःच्या संसाराचा सर्व भार एकट्याच्या शिरावर पडल्यामुळें सोलापूर सोडून, पंढरपुरास जाऊन रामजोशास विद्यार्जन करावें लागलें आणि पुराण सांगणें व कीर्तन करणें या कला शिकण्यास बाबा पाध्यांचें शिष्यत्व पतकरावें लागलें.

बाबूजी नाईक बारामतीकर यांच्या घरीं रामजोशांचा तमाशा चालला असतां रामजोशांच्या उपदेशपर लावण्यांतील अर्थगांभीर्य आणि पदलालित्य या गुणांनीं, तमासगिराला तुच्छ मानणाऱ्या मोरोपंतांना माडीवरून खेंचून आणिलें आणि पंतांच्या पायांशीं डफ फोडून रामजोशांनीं तमासगिराचा धंदा सोडून कीर्तनकाराचा पेशा स्वीकारिला अशी दंतकथा आहे. रा. यशवंतराव केळकरांना ही दंतकथा न रुचल्यामुळें बारामतीकरांच्या येथें एका कीर्तनाच्या प्रसंगीं मोरोपंत व रामजोशी यांचा परिचय होऊन रामजोशानें मोरोपंतांना काव्यरचनेंत गुरु केलें अशी स्वकपोलकल्पित कथा रा. यशवंतरावांनीं रचिली आहे. जुनी दंतकथा किंवा ही नवी कपोलकथा यांपैकीं कोणतीही खरी असो; मोरोपंतांच्या काव्यरचनेची छाया रामजोशांच्या कवनांत दिसते हें मात्र खरें. दोघांनाही एकमेकांविषयीं आदर होता. दोघेही चांगलें संस्कृतज्ञ होते. दोघेही पुराणीक होते. परंतु मोरोपंत हे एक पंडित, महाकवी, व शिष्ट होते; रामजोशी तमासगीर शाहीर होते. हा फरक दोघांच्याही काव्यांत दिसून येतो. मोरोपंतांचें आर्याभारत रामजोशांनीं एका चार चौकी लावणींत आणून ठेविलें आहे; आणि नुसत्या कृष्णशिष्टाईच्या प्रसंगावर तेवढीच दुसरी एक सबंध लावणी रचली आहे. मोरोपंतांचे भक्त विष्णुपंत चिपळूणकर यांना रामजोशांच्या लावणीनेंही मोहित केलें होतें.

रामजोशांचें मराठी भाषेवर प्रभुत्व होतें. संस्कृतांत रचलेल्या लावण्यांत जरी क्वचित् व्याकरणदोष आढळून आले, तरी त्याला संस्कृताचें ज्ञान चांगलेंच होतें यांत शंका नाहीं.

**'सुभगसखीयं नितांतपचला चलयति मम मानसं। कदा मे चुंबति मुखसारसं ॥'**

या लावणींत केवळ शृंगाररसच आहे असें नसून

**'चरणरणित निजनूपुरचकिता यत्पुरतः पामरी। सुराणामपि रंभा सुकरी। करिरिपुसमसुरुचिरकटीभागानतगुणजितगुर्जरी। सुरूपापदपद्धति कुंजरी ॥**

या कडव्यांत निव्वळ मराठी छापाच्या दोन कल्पना संस्कृत रचनेंत गोंवल्या आहेत. मराठी लावण्यांत शृंगाराप्रमाणेंच वैराग्योपदेश रामजोशानें जसा केलेला आढळतो, तसा व तितक्याच उत्कृष्टतेनें संस्कृतांतही केलेला आढळतो. हें वरील लावणी बरोबर '**अयि भज मानव रघुवीरं। निशिचररणधीरं ॥** ही लावणी पाहिल्यास आढळून येईल.

**तरुणि तवेयं कुचतटमतिगुरु कुरु मम हृदि सादरं। मनो मे भवति मनोभवदरं ॥**

ही रामजोशांची लावणी जयदेवाच्या गीतगोविंदाचीं आठवण देते! संस्कृत लावण्या छापण्यांत ज्या ढोबळ चुका झालेल्या दिसतात, त्यावरून व्याकरणदोष मुळांतले नसावे अशीही शंका येते. '**बाई यशोदे बाळ तुझा तान्हा। तुला वाटे परी नष्ट मोठा कान्हा ॥**' या लावणींतील मराठी, कानडी, हिंदी आणि संस्कृत अशीं चार भाषांचीं चार कडवीं, किंवा 'पाहि पाहि निज भुवनम्। प्रतीका बोलधि मुडदारा। निन्न मात ना केळू दिल्ला। चल छोड पल्लो मेरा ॥ ही त्याच चार भाषांतील

एक एक चरण रचून केलेल्या कडव्यांची लावणी यांवरून रामजोशांचा कानडी व हिंदी या भाषांशीं बराच परिचय होता असें दिसतें. हिंदी भाषेचा प्रचार मराठी राज्यांत बराच होता. ' पकडो लियो हकालो बे बिसवामितर भाग जावेगा ॥ ' असें आर्यार्ध रचून शबरशकांना ' तोबा ' म्हणावयास लावण्याचा मोह मोरोपंतांसारख्या पंडितालाही भारतकथा गातांना आवरला नाहीं. मोरोपंतांचे चहाते तो एक गुणच समजतात. मग अशा सरमिसळीच्या दोनचार लावण्यांवरून जोशीबुवांविषयीं रा. यशवंतरावांसारख्या रसिक चिकित्सकाचा ग्रह दूषित व्हावा हें योग्य नाहीं.

रामजोशी आणि इतर शाहीर यांच्या लावण्यांचे ठोकळ मानानें पुढीलप्रमाणें भाग पाडतां येतील. ( १ ) देवतांचीं आणि तीर्थांचीं वर्णनें. ( २ ) शृंगारिक लावण्या–यांतील कृष्णलीलांवरील लावण्यांचा विचार निराळ्या दृष्टीनें करावा लागेल. शाहिरी काव्याचा हा भाग विशेष मोठा असून वैशिष्ट्यदर्शक आहे. ( ३ ) उपदेशपर व नीतिपर लावण्या; रामजोशांच्या प्रसिद्ध झालेल्या काव्यांत अशा तेहतीस लावण्या आहेत. या लावण्यांत रामजोशांचा हातखंडा असून त्यांविषयीं त्यांचा लौकिकही फार आहे. लावणीला मोरोपंतांसारख्या शिष्याकडून मान्यता मिळण्यास हा भाग कारणीभूत झाला. (४) इतर प्रासंगिक व किरकोळ लावण्या. लावण्यांखेरीज याच शाहिरांनीं जे पोवाडे रचले आहेत; व अनंतफंदीनें कटाव, फटके वगैरे इतर काव्यरचना केली आहे त्यांचा विचार केल्याखेरीज या विवेचनाची पूर्तता होणार नाहीं. तरी जोशीबुवांच्या धर्मपर देवतावर्णनाच्या लावण्यांपासून त्यांच्या काव्याचा विचार करूं.

सर्व कार्यांच्या सुरवातीप्रमाणें तमाशाच्या सुरवातीस देखील गणेशस्तवन करण्याची वहिवाट आहे. जुन्या शाहिरांची पोंवाड्याच्या आरंभीं गण ( गणेशस्तुति ) म्हणण्याची वहिवाट होती. नंतर ती कमी होन नाहीशी झाली. परंतु तमाशाच्या आरंभीं ईशस्तवन करण्याची वहिवाट अद्यापही आहे. गणपतीचें स्तवन संस्कृत काव्यांतही झालेलें आहे. मराठी ग्रंथांत तें ग्रंथारंभीं असून प्रत्येक अध्यायाचा प्रारंभ ' श्री गणेशायनमः ' नें होतो.

गणेशस्तवन अशा रीतीनें अनेकवार झालें असतांही शाहिरांच्या 'गणां'त नावीन्य आणि वैशिष्ट्य दिसावें हें त्यांना फार भूषणावह आहे. 'विघ्नेश,' 'सुखकर्ता दु:खहर्ता,' 'विद्याकलांचा स्वामी' हें गणेशवर्णन आपल्या रोजच्या सरावाचें आहे; परंतु पेशवाईतील हत्तीखान्यांचा रोजचा परिचय असलेल्या कवीनें, सोंडेंत गवत घेऊन डोकीवर उधळण्याची हत्तीची संवय

शुंडादंडसुमंडित गंडस्थळीं दूर्वांकुर नवे। मधुपांचे फिरती थवे ॥'
असें केलेलें पाहिलें;

'पायस, मोदक, लाडू, खोबरें, खडिसाखरेचे रवे। हें भक्षायाची सवे ॥'
असा मराठी पद्धतीच्या नैवेद्याचा सराव गणरायाला पाडला, म्हणजे कौतुक वाटतें.

'अरे हा धणिवर ठाउक जगा। मोडल्या किती असुरांच्या रगा। अशाच्या पदकमळीं कर लगा ॥' हें वर्णन मराठेशाहींतील मर्दुमकीची आठवण देतें.

'सात्विक त्याला सत्व, तमासि तम, राजस राजसा।
हा जसा भाविला तसा।

या चरणांनीं 'ये यथा मां प्रपद्यन्ते' या गीतावचनांतील मर्म ओळखून 'खटनटासी खटनट' अशी रामदासांनीं वर्णिलेली आणि 'शठंप्रति शाठ्यं' अशी टिळकांनीं सूत्रग्रथित केलेली महाराष्ट्राची आवडती नीति आठवून 'दिधलें दु:ख परानें उसनें फेडूं नयेचि सोसावें,।' अशी वृत्ति महाराष्ट्राच्या पचनीं पडेल कीं काय, याविषयीं शंका वाटूं लागते. हिंदी राजकारणांत नवीन आलेला हा शुद्ध सात्विक मार्ग किती कालानें फलदायि होणार असा प्रश्न मनांत उद्भवतो, तोंच रामजोशांचे पुढील चरण सांगतात कीं,

'कार्यसिद्धिकर इतर दैवतें बारा वर्षें बसा!
हा आज आठ चौदिसा॥'

जोशीबुवांच्या एकाच लावणींतलें हें गणेशस्तवन किती महाराष्ट्र वृत्तीचें आणि उद्बोधक आहे!

सांबस्तवनाच्या लावणींतही असाच उल्लेख आढळतो.

काळकूट विष जाळित सुटलें जें ब्रह्मांडोदरा ।
हाचि घेतसे दुःसह गरा ।
आहे या कर्मीं भोळा न म्हणा, ती धूतमा ।
किती राजनीतिची यांत दाविली सिमा ।
हें दारुण विष यास्तव शिरीं धरी चंद्रमा ।
* * । ही प्रळय अग्नीवर ठेवी सरिदुत्तमा ।

सांबानें हालाहल प्राशन केलें आणि त्याची आग शमविण्यास जे उपाय केले त्यांवरून राजनीतीची आठवण व्हावी, हें केवळ महाराष्ट्राच्या परिस्थितीस युक्त आहे. सुरवातीपासून मराठ्यांनीं प्रचंड व्याप मांडला, तो वस्तुतः त्यांच्या आवाक्याबाहेर होता. तो आटोपण्यास पुरेशीं साधनें त्यांच्याजवळ नव्हतीं. पण अनेक युक्तिप्रयुक्ति करून त्यांनीं तो सांभाळला होता. शकराच्या विषशमनाच्या युक्त्या पाहून राजनीतीची आठवण मराठ्याखेरीज कोणाला होणार ?

मराठा स्वभाव, मराठी वैशिष्टय, महाराष्ट्राच्या चालीरीती यांच्या छटा रामजोशांच्या काव्यांत अनेक आहेत. रामाच्या बाळपणींच्या स्नानाचें वर्णन करितांना

'तो विश्वास प्रवसला तयाची टाळू हो ।
माखून म्हणती तान्हयासी भय न विटाळू हो ॥
जो दैत्यांच्या नुघडितो नेत्र हाकानीं हो ।
ह्याच्या कुर्र म्हणुनी फुकिती कानीं हो ॥

हें वर्णन अशापैकीच आहे. जोशीबुवांचें निरीक्षण सूक्ष्म व मार्मिक होतें. देवादिकांच्या वर्णनांतही निरीक्षणांतील सूक्ष्मपणा दिसून येतो. गिरीच्या व्यंकटरमणाचें वर्णन करितांना 'चिंच तिखट नैवेद्य तिखट तेलकट परि सुर झड घालिती । सुधेचे रस त्यापुढती लाजती ॥' हा नैवेद्यांतील विशिष्टपणा सांगण्यास ते चुकले नाहीत. बारशीच्या भगवंताचें वर्णन असेंच अप्रतिम आहे. तुकाराम महाराजांच्या प्रेमळपणा, देवाशीं सलगी, आणि खोंच यांना पदलालित्याची मिळालेली जोड या लावणींत दिसून येते. या लावणींतील खोंचदार सलगीच्या भावनेशीं केवळ आदरयुक्त पूज्यभावाची तुलना करण्यासाठीं 'भूतळांत जसि या स्थळांत यमुनाजळांत हिमनग बाळा ।

अशी भुवनत्रयीं कोणती दुजी वेल्हाळा ?' ॥ हें 'शिवाची राणी' तुळजापुरची भवानी हिचें वर्णन ताडून पाहावें. निवृत्तिमार्गी वारकऱ्यांना जसें पंढरपूर तसें प्रवृत्तीच्या मराठे गड्यांना तुळजापूर !

'इथें बसून जनावर रुसून पाहते कसून सधन लाचारी ।
दुबळ्याची भाकर म्हणे मला ही न्याहारी ॥
नित्य उठुनि छळति परि तुटुनि पडेना कुठुनि पुरविते ज्वारी ।
× × × जरब जगामधिं भारी ॥
छप्पन्न देशिंचे लोक लोळती द्वारीं । '

अशी ही महाराष्ट्रस्वामिनी 'कांचना जपुनि, किंचना म्हणुनि, वंचना करावी ज्याणीं । ही त्याला वंचिति माय मुलुखची शहाणी !' मराठ्यांची राष्ट्रदेवी झाली यांत नवल काय ? तिच्यामुळे तुळजापूर ही 'दक्षिण काशी' झाली.

'मिरविती छबीना नंदी, कधिं तुरंग !
कधिं मतंगजी छानंदी कधिं फिरंग ।
कधिं पंकज गरूड स्कंधिं, वहन रंग ।
कधिं हंस मयूर छंदी, धरि करंग । '

अशी महाराष्ट्र देवता शिवाजीच्या काळीं

'मातला दैत्यगण सारा, करि दुखंड !'

तिनें महाराष्ट्राला जें वैभव दिलें, त्यामुळें

'ही मनिं हो चिन्मय बाला, जरि शिरल ।
काय जुरत यमाच्या बाला ! पुढें फिरल ?'

असा विश्वास कां वाटूं नये ?

रामजोशांनीं पंढरपुराचेंही वर्णन केलें आहे, तसेंच होनाजी बाळा आणि प्रभाकर यांनीं केलें आहे. त्याचें तुलनात्मक विवेचन पुढें येईलच. परंतु रामजोशांच्या वर्णनांत ज्या विशेष गोष्टी आहेत त्यांचें दिग्दर्शन येथें केलें पाहिजे.

'क्षमातळीं दुज समान नाहीं उमामहेश्वर पुरी !'

असें सांगून, या वैष्णव क्षेत्राशीं कोणत्याही शैव क्षेत्राची तुलना करतां यणार नाहीं, हें जोशीबुवांनीं सुचविलें आहे. शैव सांप्रदायांतील प्रवृत्तिप्रवणता आणि भागवताच्या निवृत्ति मार्गाचें लोकांस वाटणारे पारमार्थिक श्रेष्ठत्व 'पुरे

पडेना काशी ' या विधानांत दिसतें. पंढरपुरांतील निरनिराळीं स्थानें वर्णन केलीं आहेत;

' पुढें समाधित दडे पदांबुजिं पडे न चोखा भवीं ।
असो महार जातिचा, याति ना, हरिचा भागवतोत्तम कवो ! '

हें चोखामेळ्याचें वर्णन करून,

'आनंद सांवता माळी कबिर मोमिणी । पुंडरिक चौधरी तुक्या वाणगट तक्या मारिपरि मुक्या परी दे दडी । मिराबाईचा प्याला नाम्याला भ्याला प्याला त्याची कढी । '

अशीं पांडुरंगाच्या 'खासगीच्या मंदिरीं' असलेल्या संतांचीं नामें गायिलीं आहेत.

देवादिकांच्या शाहिरी गाण्यांत देखील शाहिरांचें महाराष्ट्रीयत्व दिसून येतें, हें रा. यशवंतराव केळकरांचें विधान किती यथार्थ आहे, तें रामजोशांच्या लावण्यांत येथवर दाखविलें.

---

## कृष्णलीला

नव्या नवतीची बहर नूतन जी गोडी आली रसा ।
घ्या रस बरवेपणीं हो तुमच्या मर्जिस मानेल तसा ॥

—होनाजीबाळा.

शाहिरी काव्यांत शृंगार फार आहे, म्हणून तें त्याज्य असा एक समज प्रचलित आहे. आजकाल आंग्लविद्येच्या प्रसारापासून आमच्या समाजावर सभ्यतेचें दुहेरी दडपण पडलें आहे. व्हिक्टोरियन युगांतल्या सभ्यतेच्या कल्पना रूढ झाल्यामुळें पूर्वीच्या काळांत जे कित्येक शब्द घरीदारीं आणि राजदरबारीं देखील भाषेला जोर आणण्यासाठीं, अगदीं शिष्ट समाजांत देखील, वापरण्यांत येत, ते असभ्य समजले गेले. रीतिरिवाजांच्या बाबतींतही असेच फरक झाले. आंग्ल समाजाच्या शिष्टाचाराच्या कल्पना बोकांडीं बसल्या; आणि सभ्याचाराविषयींच्या आमच्या कित्येक जुन्या कल्पनाही कायम राहिल्या. ' क्वचिद्रानी पतिव्रता ' या सुभाषिताच्या मुळाशीं असलेल्या कल्पनेमुळे रंगभूमीवर स्त्रियांना मज्जाव झाला; आणि स्त्रीवषधारी पुरुषाचें मुखावलोकन देखील करणें पाप आहे या शिवलीलामृती शिष्टाचारानें नाटक-तमाशे हलक्या लोकांच्या हातीं गेले; चांगले लोक त्यांत पडल्यास त्यांना

देखील हीनपणा येतो असा समज पसरला. 'शृंगारवर्णनाला असा दुहेरी पेंच वर्तमानकाळीं पडला असल्यामुळें शाहिरी काव्याला असभ्यतेच्या आरोपांतून सोडविणें कठिण आहे. स्त्रीपुरुषांच्या देहरचनेंतील भेदाची जाणीव आणि तज्जन्य परस्परसंबंध जेथें म्हणून व्यक्त होतील, ती प्रत्येक गोष्ट असभ्य मानण्याची वृत्ति इतकी विकोपास गेली आहे कीं, एखाद्या गोहरजाननें गाणें करून मिळविलेला पैसा जर एखाद्या परोपकारी संस्थेनें स्वीकारला, तर ती संस्था देखील विटाळली आणि त्याज्य झाली असें समजून, तिच्याशीं असलेला संबंध ताड्कन तोडून टाकणारे नीतिबहादूर कधीं कधीं आढळतात! शाहिरांचें काव्य अशासाठीं नाहीं हें प्रांजलपणें कबूल करणें भाग आहे. संस्कृत साहित्यग्रंथ, नाटक व काव्यें ज्यांना आदरणीय वाटतात, त्यांना शाहिरी काव्यावर फारसा आक्षेप घेतां येणार नाहीं, हें विष्णु कृष्ण चिपळूणकरांच्या उदाहरणावरूनन दिसून येतें. ज्ञानेश्वरींतील शृंगारिक उपमा, एकनाथ–तुकारामांची कविता, वामनपंडितांचीं काव्य–प्रकरणें आणि मोरोपंती काव्य यांत ज्यांना कांहीं वावगें दिसत नाहीं, त्यांना शाहिरी वाङ्मयाच्या या भागावर करडी नजर करण्यासारखें कांहीं कारण दिसत नाहीं. तिर्यग्योनींतील क्रौंचांच्या जोडप्याच्या शृंगाराचा बिघाड झाला म्हणून आद्यकवीला रामायण आठवलें! तशाच प्रकारच्या प्रसंगांत शाहिरी कवनाच्या कांहीं भागाचा उगम आहे, म्हणून तें त्याज्य समजणें योग्य नव्हे. त्यांतून रामजोशाच्या लावण्यांत उत्तान शृंगार फारच कमी आहे. संभोगशृंगारापेक्षां विप्रलंभाचें वर्णन रामजोशी आणि होनाजीबाळा यांना जास्त खुलवितां येतें. साहित्यशास्त्रांत व्यंजनेनें युक्त अशा ज्या ध्वनिकाव्यास सर्वश्रेष्ठ गणलें आहे, असे प्रसंग या दोघांच्या लावण्यांत अनेक आहेत; परंतु त्यांच्या काळच्या ज्या सामान्य जनसमूहासाठीं त्यांनीं काव्यरचना केली त्याच्या रुचीला पोषक अशीं उत्तान वर्णनेंही बरींच आढळतात. होनाजी, सगन, प्रभाकर व परशराम यांना प्रत्यक्ष दुसऱ्या बाजीरावाच्या विलासांचीं वर्णनें करण्याची वेळ आली; तेथें तीं वर्णनें तत्कालीन शिष्टाचाराच्या देखील मर्यादेचें उल्लंघन करणारीं आहेत हें केव्हांही कबूल करावें लागेल. परंतु सदभिरुचीला धक्का देतील अशीं वर्णनें प्रभाकराखेरीज इतरांच्या प्रसिद्ध काव्यांत त्या मानानें कमी आढळतात.

मानवी विलासांच्या वर्णनावर येणारा सदभिरुचीच्या अतिक्रमाचा दोष कृष्णलीलेच्या वर्णनावर येऊं शकत नाहीं. कृष्ण आणि गोपी यांच्या लीलांचें वर्णन शृंगारिक नाहीं असें ठरविण्याचे प्रयत्न वेळोवेळीं झालेले आहेत. त्यासाठीं कधीं वेदांताची कांस धरून कृष्ण हा आत्मा व गोपी हीं इंद्रियें असें रूपक करण्यांत येतें. कधीं सूक्ष्म धात्वर्थ शोधण्यांत येतात. कधीं कृष्ण केवळ कुकुला बाळ होता म्हणून पीनल कोडाचे सर्व गुन्हे त्याला माफ अशा अपवादाच्या कलमाखालीं त्याचें समर्थन होतें. भागवतादर्शकारांनीं या सर्व कोटिक्रमांचें अवलंबन करून कृष्णाची अब्रू वांचविण्याचे केलेले हवालदील प्रयत्न पाहाण्यासारखे आहेत. परंतु अशा वकिलीपेक्षां 'एरव्हीं विषय जिणोनि जन्मले । जे शुकादिक दादुले । ते विषयोचि वानितां जाहले । भाट याचे ॥' ही ज्ञानेश्वरांची कबूली ग्राह्य वाटते. शुक–ज्ञानेश्वरांसारख्या आमरण ब्रह्मचाऱ्यांना सुद्धां कृष्णाच्या विषयी लीलांचा स्तुतिपाठ करण्यांत गोडी वाटे: मग 'राधाभुजंग' किंवा 'रासक्रीडा,' 'बालक्रीडा' वगैरे काव्यें रचण्याच्या अपराधासाठीं एका वामनाचे चार वामन करण्याची जरूर नाहीं, हें महाराष्ट्रसारस्वतकारांचें मत चुकीचें कां समजावें? आणि व्यास, शुक, जयदेव, वामन, मोरोपंत, तुकाराम यांनी कृष्णाच्या विषयी लीलांचें केलेलें वर्णन जर शिष्टतेला कलंक लावीत नाहीं, तर शाहिरांनाच तेवढी आडकाठी कां? त्यांतून कृष्ण-लीलेच्या वर्णनांत तरी कोणीही शाहीर जयदेवाइतका देखील वहावलेला क्वचितच आढळेल. अनंतफंदी वगळल्यास इतर कोणत्याही शाहिरापेक्षां रामजोशाच्या वर्णनांत शिष्टाचार पाळण्याची दक्षता विशेष घेतलेली दिसते. 'कारटा तुझा हा द्वाड यशोदेबाई । कां पडला आमुचे डाई ॥' या लावणींत आलेला एक शब्द वगळला तर सभ्यतेला बाध आणणारा ग्राम्य शब्द रामजोशानें आपल्या लावणींत कोठेंही वापरलेला आढळून येत नाही. ग्राम्य शब्दांचा भरणा कित्येक संतकवींच्या काव्यांत शाहिरी काव्यापेक्षां कांकणभर जास्तच आढळेल आणि तुकारामाच्या अभंगांत तर किती तरी पटींनीं आढळून येईल.

कृष्णलीलेवरील शाहिरी काव्यांतही मराठेपणा दिसतो. शाहिरांचा कृष्ण मराठा असून गोपीही महाराष्ट्रीय गवळणींच आहेत. 'दिली यशोदेनें तुप रोटी । बांधी पोटीं । घोंगडें शिंकें लंगोटी । काल्यानें भरली वाटी ।

न्याहरीसाठीं । डोईस लहान चिंधोटी । ' असा त्याचा वेष आहे. 'विटी-दांडु लगोऱ्या •गोटी । ' हे त्याचे खेळ आहेत. ' पसरितो सराटे भारी । कांटवण बोरी ' या त्याच्या महाराष्ट्रांतील गुराख्याच्या पोरासारख्या खोडया आहेत. तशाच गोपीही घागरा नेसणाऱ्या व्रजनारी नसून लुगडीं नेसणाऱ्या आहेत. ' श्रीरंग, गोपिकोत्संग धरुन करि रंग । ' या रासक्रीडेच्या लावणींत त्यांचीं नांवें देखील ' उमा, रमा, सखु, साळू, मैना, चिमणी ' अशीं दिलीं आहेत. त्यांच्या नाकांत नथ असून तिच्यांतील चमक शुक्राच्या चांदणीसारखी लकाकते. त्यांच्या हातांत चुडे असतात, त्या पिंगा घालतात; आणि संतापल्या म्हणजे ज्या शिव्या देतात त्या इरसाल मराठी असतात. त्या यशोदेला म्हणतात ' असा हा बिजवर । अग सये । सोशियलें गडे आम्ही आजवर । ही आली घोरपड तुजवर ।' तिला कधीं रागानें विचारतात, 'यास न शिशु-पणिं लागलि सटवी ? ' तर केव्हां आपसांतच म्हणतात, ' मस्त मेला । पैशी तोंडावर देईन, याच्या भिईन का मी बाला? ' त्याच्या खोडया यशोदेला सांगतांना निकरावर येऊन म्हणतात, ' तूं करसिल याचें कोड, मोड या बंडा । आम्ही शील आपुलें मिरवित होतों झेंडा । याणें केला गडबडगुंडा । पोरिला लांच देऊन चिकण्या खांडा ।' ' सांपडल्यावर म्हणति गोपाळा । मेल्याचें तोंड त जाळा । ' शेवटीं अगदीं निर्वाणीनें उपाय सांगतात, ' अग बये । × × । अशी काय वहिवाट नीतीची । ठेउन दे दासी । अग बये ! पाहुनियां सुरतीची । ' हा अखेरचा उपाय सरत्या पेशवाईच्या काळास साजेसा नाहीं काय ? रामजोशाच्या कवित्वाचा काळ ई. स. १७७८ पासून, शालिग्रामांच्या म्हणण्याप्रमाणें १८१२त किंवा भावे म्हणतात त्याप्रमाणें १८०८ त त्याचें देहावसान झालें तेथपर्यंतचा आहे. त्यानें प्रत्यक्ष बाजीरावावर कविता केलेली आढळत नाहीं. पण कित्येक लावण्यांत बाजीरावाच्या कृत्यांचा उल्लेख असावासें दिसतें.

' नका हरि दंगा करूं । या कर्मे नाहीं बरें; रयत ही धन्याचें लेकरूं ॥ × × सोसावे दुर्गुण किती । दैवानें दिली सुजन भोगितो रीतीनें संपत्ती, ही सोडुन दे दुर्मति । तूं म्हणशिल मी धनि नगराचा, वाईट आमुचे पति ॥ चाल ॥ कर जोडितों तुम्ही हे वस्ती पुरे पुरे बापा । सारि रयत सुखाची, कोण तुझ्या सोशि अशा तापा । या छंदामध्यें नको शिरूं। सांगतसों

हतक्यावर तुजला मारूं किंवा आम्हीं मरूं । × × × । काय चांगट तरि गोरटा । पुरुषाएवढा पुरुष असुनि तूं, खेळसि काय पोरटा । × × × । या नगरीमध्यें अशा रितीनें राही न पांखरूं । × × × काय वाढवसील हा कली । काय वदूं ही कीर्ति तुझी बा जगतामधिं फांकली । कांहीं रीति नच राखिली । पाप उघड करूं नये, भ्रमाची मूठ बरी झांकली ।' हें वर्णन तरी बाजीरावाच्या लीलांना उद्देशून दिसतें. ' कांहीं नाहीं लाज पोटीं । ' ही लावणी देखील उघड कृष्णाला उद्देशून असली तरी बाजीरावासारख्याच्या एखाद्या प्रिय पात्रानें आपल्याशीं लघळपणा करणाऱ्या सामान्य मनुष्याला उद्देशून म्हटल्याची झांक तिच्यांत दिसते. ' कृष्णा तुझी खोड खोटी । × × × × । खाशाची मी प्यार साळू भीतें काय तुझ्या बाला ? । गांठीसाठीं प्राण जातील, कोण्या झाडाचा तूं पाला ? '॥ यावरून तरी तसा उद्देश दिसतो. होनाजी, प्रभाकर वगैरेनीं बाजीरावाच्या विलासावर लावण्या केल्या आहेत. तशी थोडीशी झांक 'मज वाटे हरिसी आज होरी खेळावी । काय करूं गे रंगामध्यें तनु ही घोळावी । ' या लावणींत दिसते. परंतु केवळ ' दैव जिचें उघडतें तिला प्रभु बोलावी ' यासारख्या एखाद्या चरणावरून तसा निष्कर्ष काढणें योग्य नाहीं. कृष्णलीलेच्या लावण्यांत वरीलसारखी गोपींना कृष्णाशीं विलास आवडतो असें दाखविणारी लावणी क्वचितच आढळेल. बहुतेकांत कृष्णाच्या कागाळया आहेत. त्याच्या खोड्या आणि कुचाळक्या यांनीं गोपी संतापल्यासारखें दाखवितात. कधीं कृष्ण त्यांना समजावतो. कृष्णावर रागावणें, त्याला दटावणें, भीति घालणें हे प्रकारच जास्त आहेत. अशा लावण्यांत ' नंदात्मज मंदंमंदं माऽयाहि । तुज अबरूच नाहीं ॥ ' ह्या लावणींत संस्कृत आणि मराठी असे एका आड एक चरण बहारीनें साधले असून, अश्लीलतेचा लेशही नाहीं. ह्या लावणींतली गोपी म्हणते, 'नंदाच्या मुला असा लपूनछपून हलके हलके येऊं नको ! तुला अबरू नाहीं, पण माझ्या घरांत सारीं जणें जागीं आहेत; राजद्रोह्या, कंसशत्रो, तूं इथून जा ! ' (गेहादपसर स्वमित: कंसारे ! जन जागति सारे !) मनांत कांहीं असलें तरी संसारी स्त्रीला नवऱ्याला सोडून एकांत करणें योग्य नाहीं. ( कांतादेकांत: किमु संसारे ? हें नेणसि कां रे ? ) अनीतिमान पुरुषाला लज्जा नसते; पण माझ्यासारख्या कुलीन मुलीला असते ! तूं जा एकदाचा !

( कामादिह भयं न लज्जा जारे ! येथूनियां जा रे ! ) तुझ्या बापाच्या कोर्तीला बट्टा लावूं नको ! कुळाची अब्रू ध्यानांत आण ! ( लोके निजजनक-यशस्त्वं पाहि ! स्वकुळातें पाहीं ! ) माझें अत्यंत दक्षतेनें रक्षण होत आहे; केवळ नशीब थोर म्हणून तूं इथवर जगलास ! हें तुला कां कळत नाहीं ? ( दैवादिह जीवस्यहमति गूढा ! कां नेणसि मूढा ? ) माझ्यावर हल्लीं सासूबाईंचा अगोदरच राग आहे ! त्यांना हा तुझा हूडपणा कळला तर तूं मरशील ! ( श्वश्रूः संप्रति मयि कोपारूढा ! कां मरसी हूडा ? ) नव-वधू कधीं कुणाला आपल्या अंगास हात लावूं देईल का ? इतकें देखील तुला कळूं नये ? ( केषामपि करगा भवति नवोढा ? किती होसिल वेडा ? ) माझा नवरा सिंहाहून उग्र आहे, हें जाणून भानावर ये ! ( सिंहादप्युग्र-तरो मे भर्ता ! सावध हो पुर्ता ! ) तो तुझा जीव घेईल ! तुझा लोंचटपणा पाहून त्याला हांक मारावी असें मनांत येतें; पण तुझा जीव धोक्यांत पडणें बरें नाहीं ! तूं इथन वांचून जा बरें ! कारण मदनाच्याही हृदयाचा दाह करणारा–अंतराचा दाह करणारा–मदन तूंच आहेस हें मला कळतें ! कविराय देखील तसाच आहे. ( मन्येत्वज्जीवनस्य मथनकर्ता : बोलावूं आर्ता । मा भूत्ते जीवितसंशय वार्ता । वांचुनि जा पर्ता । जाने त्वं मदनांत-र्दाही । कविराय असाही । ) ही लावणी मनांतून कृष्णावर प्रेम करणाऱ्या, परंतु पातिव्रत्यानें वागणाऱ्या कुलीन मुलीला शोभणार नाहीं, असें कोण म्हणेल ? कृष्णाच्या धीटपणाचा व हूडपणाचा तिला राग येतो; पण तो आपल्यावर प्रेम करतो म्हणूनच असा हूडपणा करण्यास तयार झाला, या जाणिवेनें तिचें हृदय कठोरपणा धरण्यास समर्थ होत नाहीं. या लावणींत धाक दाखविणाऱ्या वचनांतूनही जसें प्रेम व्यक्त होतें तसें कृष्णाला रागावून, चिडून शिव्या देणाऱ्या लावण्यांतूनही होतें. 'पुरुषाचा होकार आणि स्त्रियांचा नकार यांचा अर्थ उलटा समजावयाचा;' या नागरिक नीतीची आठवण देणारे प्रसंग या लावण्यांत अनेकदा येतात !

गोकुळ सोडून मथुरेस जातांच कृष्णानें कुब्जेचा संग धरला, हें कळल्या-वर गोपींच्या तोंडीं जे उद्गार रामजोशांनीं घातले आहेत, ते मात्र असे प्रेम-गर्भित नसून अत्यंत निंदाव्यंजक आणि मनःपूर्वक चीड येऊन काढिलेले आहेत. आपल्यासारख्या कुलीन व सुंदर स्त्रियांचें प्रेम लाभल्यावर अशा

कुरूप बटकीवर त्याची आवड जावी यांत आपला भयंकर अपमान झाला ही जाणीव त्या उद्गारांत दिसून येते. ' बटकीनें आजि केला कीर्तीचा शिराडा । × × × आमच्या या हाडांचा चुराडा ! ' असें त्यांना वाटतें. ' बटकिशि रतला हरि तरी काय समजुनी । × × कुचकुच जन बोलत गाई, थुंकत तोंडावरी । कोण कुळ आपुलें बटकुर धरिलें उरी । अबरूच नाहीं तिळभरी । अपशय केवढें शिरीं । × × × । यानें घ्यावी काय तिची लातबुकी । अशि काय मना आली तरी हुकी । कांहीं तरी लाज कपटयाला । × × । आतां जरि येईल गोकुळीं । करकर करकर चाऊन खातों, तिच्या नरडिची नळी । देखत लंगडी खुळी । उचलुन द्या ना सुळीं ! × × × । आतां राहिल अब्रू कशी । अशि कां यानें बाळगिली मिशी । ' असा त्यांच्या जिवाचा तिळपापड होतो. ' त्याला आमची दया नसो, पण लज्जा नाहीं कशी ? या कपटयाची संगत करुनी पडलों आम्ही फशी ! पहिलेपासून ठाउक होता हा नंदाचा गुणी ! संगत यासी करूं नये परि मसलत पडली उणी । ' असा स्वतःला बोल लावून शेवटीं अगदीं त्वेषानें त्या म्हणतात, ' पांडवघरचा खासदार हा, ती. कंसाघरची दासी । योग्य जाहला संग म्हणावा, ' हें स्वभावचित्र फार मार्मिक आहे; तसेच इंग्लंडांत आजकाल जसें पोलिस व स्वयंपाकिणी यांचें मेथकूट तेथील विनोदी लेखक वर्णन करून सांगतात, तसें बुडत्या महाराष्ट्रांत खासदार आणि दासी यांचें सख्य व नाना फडणिसी राजकारणांत त्यांचा हेरासारखा होणारा उपयोग वगैरे प्रकारही आठवूं लागतात.

राधा आणि कृष्ण यांचें प्रेम सर्व कवींना इतकें स्फूर्तिदायक झालें आहे कीं, त्या वर्णनाच्या ओघांत बिचाऱ्या राधेच्या लग्नाच्या नवऱ्याचें नांव देखील कोठें पार वाहून गेलें त्याचा पत्ता नाहीं ! भागवतकारांनीं रासक्रीडेच्या वर्णनांत सांगितलें कीं, रासक्रीडा करितांना कृष्ण एका गोपीवर फारच फिदा झाला आणि बाकीच्यांना तशाच सोडून तिलाच घेऊन कोठें पळाला. तेव्हां इतर गोपी म्हणाल्या.

अनयाराधितो नूनं भगवान् हरिरीश्वरः ।
यन्नो विहाय गोविंदः प्रीतो यामनयद्रहः ॥

' हिणेंच भगवान् हरीश्वराला खरोखर प्रसन्न केलें, कारण आम्हांला टाकून गोविंद तिच्यावर खुष होऊन तिला एकांतांत घेऊन गेला, ' यांतील ' अन-

याराधितो ' ( म्हणजे ' हिनें प्रसन्न केलेला ' ) या शब्दावरून ' राधेचा नवरा अनया ' अशी कथा उभारण्यांत आली, असा ' भागवतादर्श'कारांनीं केलेला तर्क बराच सयुक्तिक दिसतो. तो खरा असेल तर राधेच्या नवऱ्याचें नांव अनया होतें या हरदासी शोधाला हाच काय तो आधार ! ' राधारमण' या समजावरून कोणी राधेच्या नवऱ्याचें नांव ' रमण ' असाही शोध लावला आहे ! परंतु एकंदरींत राधाकृष्णांच्या प्रेमांत राधेच्या नवऱ्याचें नांव लोप पावलें हेंच खरें ! या राधाकृष्णांच्या प्रेमलीलांचें वर्णन करण्यास रामजोशांनीं छेकापन्हुति अलंकारांत एक स्वतंत्र लावणी रचली आहे. पहिल्यानें राधेनें केलेल्या कृष्णाच्या श्लेषमय वर्णनानें त्यांची तृप्ति झाली नाहीं, म्हणून पुनः'छेकापन्हुति नवी' रचून तिच्यांत कृष्णाच्या तोंडून राधेचें तसेंच वर्णन केलें आहे ! छेकापन्हुतींत ' कविराय ' रामजोशांनीं आपलें भाषाप्रभुत्व सर्व ओतलें आहे. या लावणींतील प्रत्येक शब्द खुबीदार व अन्वर्थक आहे. ' अशी रचाया दुजी कुणाची माय व्यालि भूवरी ? ' या ' रामजोशांच्या प्रश्नाला नकारात्मक उत्तर देणें भाग पडेल ! ' असा महाराष्ट्र–सारस्वतकारांचा अभिप्राय आहे ! त्या अर्थी ही लावणी रसिक वाचकांनीं स्वतःच वाचून पाहावी !

---

## लौकिकविषयवर्णन.

कृष्णलीला हा जसा लावण्यांतील श्रृंगाराचा एक भाग, तसा सामान्य मानवी श्रृंगार हा इतर शाहिरी काव्याप्रमाणें रामजोशांच्या शृंगारिक लावण्यांचा दुसरा भाग होय. इतर शाहिरांपेक्षां रामजोशी व अनंतफंदी यांच्या लावण्या श्रृंगाराचें वर्णन फार जपून करितात. सगन आणि प्रभाकर यांखेरीज इतर शाहिरांनीं नीतिबाह्य प्रेमापेक्षां वैवाहिक प्रेमाचेंच वर्णन जास्त आवडीनें केलें आहे. परशुरामाच्या कित्येक लावण्यांना सुरवातीस उत्तान श्रृंगाराचें रूप असलें तरी त्याचें रूपांतर खुबीनें करून त्याला वेदांताचा वेष चढविण्यांत येतो. सात्विक श्रृंगार सजविण्यांत रामजोशांचा विशेष हातखंडा आहे. विप्रलंभ श्रृंगाराचें वर्णन करितांना रामजोशांनीं बहुधा विरहिणी पतिव्रतेचीच मूर्ति रेखाटलेली आहे. ' झालें दुःखाधीन आतां देह तयाचे चरणावरि ठेवीन । कधीं नेत्र भरुनि पाहीन । हा विलास त्याविण मजला देतो शीण । ' अशी

विरहव्याकुल झालेली, व ' सजणाविण झालें दीन । जसा तप्त वाळूमध्यें तळमळतो मीन । ' असा विलाप करणारी तरुणी ' या विरहसमुद्रापार । कधिं होइन बाई येति कधीं सरदार । ' अशी अधीर होऊन वाट पाहात असतां देखील बेफाम न होतां, विचारपूर्वक मनांत निर्धार करते कीं, ' नार पतिविण कसि बरि दिसल । परपुरुष घरामधीं घुसल । मग स्वकीय जन हा हसल । हा शुद्ध भाव जरि माझे मनिंचा असल । तरी सजण सखे मज लौकर नयनीं दिसल । ' तिची ही शुद्ध प्रेमाची शपथ कशी फुकट जाईल ? पतीचें ध्यान करीत ती डोळे मिटून बसते तोंच, ' स्वारी आलि बयाजी कडक । बागांत उतरले भडक । ' अशी वार्ता येते आणि शेवटीं तिची पुण्याई फळाला येऊन ' हर्षानें भेटली सजणाला बेधडक । ' इतकेंच वर्णन करून कवि थांबतो. सात्त्विक प्रेमाचें रामजोशांनीं केलेलें वर्णन केवळ मराठीच नव्हे तर संस्कृत काव्यांत देखील क्वचितच आढळेल. ' संग न हो, परि बोला मृदुवाणी । हास्य करुनि पहा, मी तुमची राणी । माझ्या कधिं न तुटे डोळयाचें पाणी । तव गुण गातें अभिनव गाणीं ' हें सात्त्विक प्रेमाचें वर्णन Platonic love च्या पाश्चात्त्य कल्पनेशीं किती जुळतें आहे ! रामजोशांच्या लावण्यांतील नायिका बहुधा ' सती, सुमति, गुणवती, सुकुलजा ' अशा असून, त्या काळच्या शिपाईपेशाच्या मराठेगड्यांना शोभणाऱ्या सहचारिणी आहेत. त्यांच्याकडे वाकड्या नजरेनें पाहून कोणी रंगेल बनशी किंवा आडमुठा धटिंगण लघळपणा करूं लागला तर भीतीनें कावऱ्याबावऱ्या होऊन, आगींतून निघून फोफाट्यांत पडणाऱ्या अशा त्या अनाथ अबला नाहींत. अशा अधमाची कानउघाडणी करून त्याला तेथल्या तेथें ताळ्यावर आणण्याचा पाणीदारपणा त्यांच्या अंगीं आहे. तितक्यावरही न उमजतां त्याचा लोचटपणा चेकाळला तर ' बुरी नजर तुझी गोष्ट काय बरी ? हासुनि जिरविसी । अरे निघूनि जा उगला, प्राण हा जगला, मानुन घे बहु संतोष मानसीं ॥ ' असें बजावून, प्रसंग आलाच तर त्याचा जीव घेण्यासही त्या कमी करणार नाहींत, अशी खात्री होते.

तत्कालीन चालीरीतीप्रमाणें शालीनतेचें उल्लंघन न करितां कुटुंबांत कुचंबणी सोशीत तरुण पत्नी कशी राहात असे, याचें मार्मिक वर्णन रामजोशांनीं ' कांताला एकांति कधीं पाहुं गे सखये । वाटतें असें पुढें जाउनि उभि राहूं

गे सखये ॥ ' या लावणींत केलें आहे. ' मजहुनि पति भिडस्त युक्ति कैसि गे करावी ? । कुठवर तरि मर्यादा वडिलांची याणीं धरावी ? । ' हे उद्गार आज देखील किती नवोढांच्या मनांतून निघत असतील !

नीतिबाह्य संबंधाचें वर्णन करणाऱ्या अशा रामजोशांच्या फारच थोडया लावण्या प्रसिद्ध आहेत. त्यांत देखील ' तुमची आमची झाली इमान क्रिया । अंतर नका मज देऊं स्वामिराया । ××× धनसंपत हा जीव करिन कुरबान । तुम्ही सजणा–सुजाणा–घ्या आदराचें पान । मज दुबळीचा राखा स्वाभिमान ॥ ' अशीच भावना दिसून येते. रामजोशांच्या वेळच्या नीतिकल्पना लक्षांत घेतां, या वर्णनांत फारसा दोष दिसणार नाहीं.

पुरुषांच्या संबंधानें मात्र हीं नीतिबंधनें बरींच ढिलीं असल्याचें एकदोन लावण्यांत दिसतें. ' किती गोड सुभग सुंदरी । दृष्टीला पडली रे । पंकजासनें करीं घडलीं रे । जिचें रूप चमकचांदणी । ' अशी स्त्री पाहून ' संसार कशाचा जरि न हाताला चढली । ' असें म्हणणारे उल्लू या लावण्यांत वर्णिले आहेत. ' सुंदरा मनामधिं भरली ' ' कोण्या ग सुभागाची मदनमंजरी ' अशा प्रकारचीं महाराष्ट्र सारस्वतकारांना किंवा विष्णुपंत चिपळूणकरांना देखील गुंग करणारीं वर्णनें शृंगारपर लावण्यांत येतात.

---

## नीतिपर लावण्या.

तितक्याच चित्ताकर्षक शब्दांनीं नीतिबोध करणें हा रामजोशांच्या काव्याचा विशेष गुण आहे.

देशियेचेनि नागरपणें । शांतु शृंगारातें जिणे ।
तरि ओंविया होती लेणें । साहित्यासी ॥

" देशी भाषेच्या सुंदरपणामुळें शांतरसही शृंगाररसाला जिंकील, व त्यामुळें ओंव्याच अलंकारशास्त्राला भूषण होतील ! ' ही ज्ञानेश्वरांची वाणी रामजोशांच्या नीतिपर लावण्यांनीं अगदी अन्वर्थक करून दाखविली आहे. रामजोशांच्या सुमारें तीस नीतिपर लावण्या प्रसिद्ध आहेत. त्यांतील बहुतेक अत्यंत हृदयस्पर्शी आहेत. ' नरजन्मामधिं नरा करुनि घे नरनारायण गडी । तरिच हे सार्थक मानवकुडी ॥ ' ' भला जन्म हा तुला लाधला खुलास हृदयीं बुधा । धरिसि तरि सेवक हरिचा सुधा ॥ ' ' बा काय घालिशी

संसृतिचा पिंगा । या मानवदेहीं भज रे श्रीरंगा॥' 'भज भज भवजलधि-माजि मनुजा शिवाला ॥' वगैरे लावण्यांनीं मोरोपंतांसारख्यांस वेड लावून त्यांच्याकडून रामजोशांनीं 'कविप्रवर' ही पदवी मिळविली. अशा लावण्यांतील भावनांशीं रामजोशाच्या वर्तनांत दिसन येणाऱ्या विरोधावर रा. यशवंतराव केळकर वगैरेनीं जी टीका केली आहे तिचा विचार करण्याचें सध्या बाजूस ठेवून या लावण्यांचाच विचार करूं !

महिकावतीच्या बखरीच्या वेळेपासून

'श्री देवि आद्यशक्ति जगदंबिका । महाराष्ट्र–धर्मरक्षिका । '

म्हणून प्रसिद्ध असलेल्या जगदंबेचें वर्णन रामजोशांनीं किती पूज्यभावानें व सहृदयतेनें केलें आहे, तें मागें सांगितलें आहे. तसेंच पंढरपूरचें वर्णन करतांना ' उमामहेश्वरपुरी पंढरीशीं समान नाहीं; काशीदेखील पुरी पडेना,' असें सांगून रामजोशी निवृत्तिमार्गी भागवत-धर्माला कसें श्रेष्ठत्व देतो, हेंही दर्शविलें आहे. तुकारामासारख्यांनीं बिंबविलेल्या ह्या निवृत्तीच्या उपदेशामुळें मराठी इतिहासाच्या अत्यंत वैभवशाली काळांत देखील वैराग्याची ओढ जनतेला होतीच ! किंबहुना हिंदु धर्मावर बौद्धांच्या तत्त्वज्ञानाचा जो पगडा बसला होता, तो अद्यापही कायम आहे ! बौद्धांचा उच्छेद करण्यासाठीं वैदिक धर्माच्या आचार्यांनीं त्यांच्या शिकवणींतील वैराग्यपोषक तत्त्वें आपलींशीं करून घेतलीं; त्यांना भागवत धर्मांत प्राधान्य मिळालें. रामजोशासारखे रंगेल शाहीर देखील या वैराग्याच्या पकडींतून सुटलें नाहींत. ' यौवने विषयैषिणाम् ' व ' वार्धक्ये मुनिवृत्तीनाम् ' वैदिक आर्यांचे वंशज शिशुवयांत देखील संन्यस्तवृत्ति ग्रहण करणें हेंच ध्येय समजूं लागले. या निसर्गविरोधी ध्येयाचा परिणाम व्हावयाचा तसाच झाला ! ' गाढवही गेलें, ब्रह्मचर्य गेलें ।' अशा स्थितींत ' तोंड काळें जालें जगामाजी । ' ही हिंदवासियांची दशा आज दिसून येत आहे ! या निवृत्तिप्रचुर भावना रामजोशांच्या काव्यांत कोठें कोठें दिसून येतात याचें नवल वाटावयास नको. तथापि त्यांतही मराठी शाहिरांचें वैशिष्ट्य आहे.

परशुराम कवीप्रमाणें रामजोशावर साधुत्वाचा आरोप झालेला नाहीं. त्याच्या आंगठ्याचें तीर्थ घेऊन एखाद्या अडलेल्या बाळंतिणीची सुटका झाल्याची चमत्कारपूर्ण आख्यायिकाही नाहीं. त्याची वृत्ति अशा आख्यायिकेला

पोषक नव्हती, परंतु त्याच्या भक्तिपर आणि उपदेशपर लावण्यांपैकीं कित्ये-कांत त्याची काव्यमाधुरी शिखरास गेलेली आढळते! तुकारामाचा सडेतोड मनमोकळा उपदेश आणि प्रेमळपणा या उपदेशपर लावण्यांत आहे; पण तुकारामासारख्या वैराग्यांत मुरलेल्या साधूनें विषयमग्न संसारी माणसांविषयीं दर्शविलेली तुच्छता मात्र या लावण्यांत दिसून येत नसून उलट वैराग्य किती बिकट आहे आणि संसारसुखाची ओढ किती जबरदस्त आहे, तें फार मार्मि-कपणें वर्णिलें आहे. 'या मदनावरि शुकासारिखे विरळ कुणी रुसले। बाकी नर या भवाब्धिमध्यें लोळति किति थकले ॥ ×××। जें झालें तें बरेंच झालें. अजुनि तूं सावध होई। दारधनाचा लोभ सोडशी तर साधल तुज कांहीं ॥' 'सुरपती मोहिले हो विषयगरानें।' 'हा प्राण कळनियां पिसा वयाची किती करिशिल माती।' वगैरे चरण ही जाणीव उत्तम प्रकारें दाखवितात.

वैराग्याच्या नांवावर माजलेलें थोतांड आणि ढोंग. यांचा जोशीबुवांनीं चांगलाच समाचार घेतलेला आहे. 'कलिराजाचें राज्य पहा हो यतिस बसाया घोडे। संत थोडे थोडे थोडे थोडे ॥' ही स्थिति आजच्याप्रमाणें त्या वेळींही होती. तुकाराम–रामदास गेले होते. त्यांची परंपरा सांगून आपली प्रतिष्ठा वाढविणारे सुबरावबावासारखे मठाधिकारी जिकडे तिकडे पसरले होते. 'हटातटानें पटा रंगवुनि जटा धरिशि कां शिरीं?' या भगव्या वेषाला 'मठाची उठाठेव कां तरी?' हा प्रश्न आज देखील विचारल्यास त्याचें उत्तर देण्यास अनेक राजयोगी आणि हठयोगी गुरूंची तारांबळ उडेल. 'दंडकमंड-लुचें बंड' माजवून 'पोटासाठीं करि खटपट भलतिशी' अशा साधूंचा सुकाळ त्या वेळींही झालेला होता. 'टिळा टोपी गोमुखी देवांचें गवाळें। खालीं वर आसनांचें घालुनि चवाळें। धनिकांचें भोंदुनियां काढिलें दिवाळें!' अशा साधूंना 'कधीं तरी सांग कांहीं उरीं उरलासी?' हा प्रश्न योग्य नव्हे काय? दुष्काळ आणि पेंढार यांनीं प्रजेला छळून हवाल-दील केले होतें. जनसमाजावर अशी आपत्ति आली असतां बुवाबाजीचें कसें फावतें याचें वर्णन दुष्काळाच्या लावणीवजा पोंवाड्यांत रामजोशांनीं रेखा-टलें आहे 'मनीं धरुनि कामिनी, मठामध्यें मुनी विनयचातुरी। जगीं दाविती [illegible]वा, परि आंतुनि कावा, भोंदुनि खाती पुरी। लेश नसे उपदेश, आपुला [illegible]रा, टाकुनी दुरी। केशवार्चन करती वरती परि आंतुनि कर्में नाना–

परी । असे धूर्त जे तूर्त जगामधिं मूर्त पापचौधरी । पूर्तिमखादिक यांची क त्यांचीं कर्में म्हणूं नका हो खरीं । वित्त हरिति निर्निमित्त ठेउनि चित्त अर्थ यावरी । ' अशी दुष्काळांत स्थिति होती.

रामजोशांची शब्दसंपत्ति आणि अर्थवैभव त्यांच्या उपदेशपर लावण्यांत दिसून येतें. अगदीं अन्वर्थक अशा शब्दाची योग्य ठिकाणीं योजना करणारे त्यांच्यासारखे मराठी कवि फारच थोडे ! त्यांच्या उपदेशपर लावण्यांतील कित्येक चरणांवर व्याख्यानें होऊं शकतील. ' कोणावांचुनि कोणी अडेना । ' या केवळ तीन शब्दांच्या चरणावर केवढें व्याख्यान होईल ! मनुष्याच्या गर्वावर केवढा उतारा या शब्दत्रयींत भरलेला आहे ! मुत्सद्दी, वीर, साधु, राजे हेच काय, पण मोठमोठीं राष्ट्रें, राज्यें आणि साम्राज्यें रसातळास गेलीं तरी सृष्टीचा क्रम अडला नाहीं, हें या दशाक्षरी मंत्रांतील तत्त्व फाजील आत्मप्रौढीनें मगरूर झालेल्या मनुष्याला ताळ्यावर आणणारें आहे. साधे वाक्प्रचार, सोपे शब्द, आणि रोजच्या व्यवहारांतलीं उदाहरणें देऊन आपलें म्हणणें पटविण्याची शैली रामजोशांना फारच उत्कृष्ट साधली होती. त्याचीं अनेक उदाहरणें उपदेशपर लावण्यांत मिळतात. ' शितें तंवर तीं भुतें भोंवतीं; ' ' जोंवरि पैसा, तोंवरि बैसा मंचकिं म्हणतिल; ' वगैरे वाक्यें अर्थपूर्ण आहेत. रामजोशांनीं मोरोपंतांचें अनुकरण केल्यामुळें त्यांची भाषा संस्कृतप्रचुर झाली आहे, या आक्षेपाचा फोलपणा पुढील उदाहरणांवरून दिसून येईल.

' कृतांतकटकामलध्वजजरा दिसों लागली ।
पुरःसर गदांसवें झगडतां तनू भागली ॥ '

या मोरोपंती केकेचाच अर्थ ' यमदूताची ढाल बिनीवर बाल सफेदी देखाना । पुढें यमाचे खडे दूत हे बडे हरामी समजाना ॥ ' किंवा ' जरेनें कच होतिल खडका । शरीरीं गद देतिल धडका ॥ ' या चरणांत आलेला आहे. मोरोपंतांचा संस्कृतप्रचुर नारिकेलपाक आणि रामजोशांची साधी रसवंती यांतील फरक सहज जाणवतो. ' दों दिवसांची तनु हे साची । ' हें पद अशा साध्या, सुबोध वाक्यांनी अथपासून इतिपर्यंत भरलेलें आहे. ' मूल कुणाचें भूल तुम्हांला चूल चालती तंवर म्हणा । ' या एकाच चरणांत अनंतफंदीनें वर्णिल्याप्रमाणें उपासमार होत असल्या वेळीं पोटचीं मुलें देखील जठराग्नीला बळी देण्यास माता कशा तयार होतात याचें चित्र समोर उभें राहातें;

तेंच याहून भडकपणें " करितील काय हो अन्नाविण गांजली । ही दुनिया सारी जठराग्नींत भाजली ॥ " अशा रीतीनें दुष्काळावरील लावणींत रंगविलें आहे. ' हरिरस सांडुनि घेसी दुधा । ' ' भक्तिरसाविण हरि भेटेल काय तुशीं । ' ' लटक्या साऱ्या गपा । ' ' उदरासाठीं दुर्धनिकांच्या पुढें पसरिशी पसा । किती उगाळशिल कोळसा ? ॥ ' ' हा लोभ देहिंचा सुख बाहेर अंगा । बा आंतुनि लागला का भिरडभुंगा ॥' ' मृगमद हे टाकुनि घेशिल हिंगा ॥ ' ' भगवें गुंडाळितां खवळती सहाही ॥ ' ' या रामा अति वावडया मानितां वडया साखरेच्या स्वमनीं ।' ' चित्रगुप्त यमदूत सभेप्रति येउन तुज पापें । पुसतिल जेव्हां काळरूपि ते मग होईल फें फें । ' अशा अगदीं सुबोध भाषेंत रामजोशांनीं जसा उपदेश केला आहे, तितक्याच उत्कटतेनें ' सांडुनियां विषय वमन । झडकरि करिं षडरिदमन । ' अशा पंडिती भाषेनेंही त्यांना आपला उपदेश पटवितां येतो.

पुराण आणि कीर्तन हे व्यवसाय असल्यामुळें अशा तऱ्हेचें वैराग्यपर कवन रामजोशांनीं बरेंच केलें आहे. तितकें इतर शाहिरांनीं केलेलें नाही. परशुरामानें मात्र हरदासी सुलभ वेदांत बराच गायिला आहे. तरीही रामजोशांची तडफ त्यांत नाहीं. रामजोशांचें वर्तन या उपदेशाशीं विसंगत असल्यामुळें त्यांना असा उपदेश करण्याचा हक्क पोंचत नाहीं या आक्षेपाचा विचार त्यांच्या कवितेवरील इतर आक्षेपांचा विचार करतेवेळीं करण्यांत येईल.

देवतावर्णन, कृष्णलीला, शृंगार, आणि वैराग्य या चौकडीबाहेर रामजोशांच्या किरकोळ लावण्या फार थोडया प्रसिद्ध आहेत.

" सैरंध्रीशीं कीचक वांछी कामुक सेनापती । रमाया जंबुक सिंहीप्रती ॥" ही लावणी अपुरी दिसते. ' म्हणे रुक्मिणी सुदेव बाई पाठविला म्यां खरा ।' ही लावणी रामजोशांची असावीसें वाटत नाहीं. कृष्णशिष्टाईच्या लावणींत विशेष स्वारस्य नाहीं. कौरव-पांडव युद्धावरील लावणींत मात्र रामजोशांचें वैशिष्ट्य आढळतें. अठरा अक्षौहिणींचा हिशोब लावण्यांत टीकाकारांचा जो घोटाळा उडतो त्याचा मासला रा. वैद्यांच्या महाभारत उपसंहारांत पाहावयास सांपडतो. रा. वैद्य म्हणतात, ' अक्षौहिणींची संख्या खरोखर किती होती याचा मेळ बसत नाहीं. अक्षौहिणी, चमू इत्यादि शब्द अनिश्चित होते, असें म्हणावें लागतें. टीकाकारही येथें हतवीर्य झाला आहे ! ' या गोंधळाचें

वर्णन रामजोशी करितात: ' अठरा क्षोणी म्हणती परी एकाचें एक ऐकून । कुणी न पाहती शोधून । काय बोल ग्रंथाला, वाचिक अर्थ काढिना नीर । पदार्थी काय फिरून × × × । दोन्ही दळें किती क्षोणी होत्या याची चौकशी करा । शोधुनिया तरी लावावा बरा । गज रथ घोडे कुंजर वीर गणती पायदळाची करा ।' भीष्मार्जुन-युद्धाचें वर्णन रामजोशी करितात, ' एकच गर्दी कडकड उसळली मिळालीं दोन्ही दळं । मांडली हातघाई तुंबळ । वीर वीरास भिडती उडती चेंडुसारखीं शिरं । रक्तलोहांत वाहती कुंजर ॥ ' भारतकथेवर रामजोश्यांच्या आणखीही लावण्या असाव्या असें वाटतें; परंतु त्या प्रसिद्ध नाहींत.

---

## पोवाडे.

रामजोशांच्या काव्यापैकीं आणखी एक भाग राहिला तो म्हटला म्हणजे पोवाडे. त्यांपैकीं ' ब्राह्मणी राज्य जोरदार घोड्यावर स्वार होते शिपाई । जबर सही कैकांनीं पाहिली शत्रु ठेविले नाहीं ॥ ' हा पोवडा फार प्रसिद्ध आहे. यांत पुण्याचें वर्णन आलेलें आहे. पुणें आणि पेशवाई यांच्या पूर्ण वैभवाचें गायन या पोवाड्यांत केलें आहे. हें वैभव येईपर्यंतच्या महाराष्ट्रांतील धार्मिक, राजकीय आणि सामाजिक परिवर्तनांचें सिंहावलोकन केल्यास तें उद्बोधक होईल

' ज्ञानदेवें रचिला पाया ' असें ज्या वारकरी भागवत पंथाचें वर्णन तुकोबांनीं केलें आहे, तो पंथ म्हणजे कर्मठ, वर्णविशिष्ट हिंदुधर्माविरुद्ध एक बंडच होतें. संन्याशाचीं मुलें म्हणून हेटाळलेल्या निवृत्तिनाथाच्या भावंडांनीं त्या पंथाला महत्त्व दिलें. शिंपी, वाणी, कुंभार, चांभार, महार, आणि एकनाथासारखे सुधारकी ब्राह्मण यांनीं त्या पंथाचें महात्म्य वाढविलें. समाजांतील अध्वर्यु व शिष्ट त्यांना हलके समजत. वर्णविषमतामूलक कर्मठपणाला गचांडी देऊन त्यांनीं भक्तीला श्रेष्ठत्व दिलें. तरीही जुन्या धर्ममतांशीं फटकून न वागतां त्यांनाच चिकटून राहाण्याची त्यांची वृत्ति असल्यामुळें जातिविषमता पूर्णपणें दूर करणें त्यांना शक्य झालें नाही. समाजगृहांत जातिभेद न मानतां व्यवहारांत मात्र कायम ठेवणाऱ्या प्रार्थनासमाजिस्टांप्रमाणें वारकरी पंथाची गत होती । हे चंद्रभागेच्या वाळवंटांत

काला एकमेकांच्या तोंडीं भरवितांना दूर पळालेला जातिभेद पंढरपूरच्या शिवेबाहेर वारकरी जातांच त्यांना पछाडतो. तथापि त्या सांप्रदायाची उभारणी मात्र तत्त्वतः भेदनिरसनार्थ झालेली आहे, हें संतवाङ्मयांत दिसून येतें.

शिवराज्यारोहणाबरोबरच महाराष्ट्रांत जातिविशिष्ट भावना कशा वाढत गेल्या त्याचें दिग्दर्शन प्रास्ताविक लेखांत केलें आहे. रामदासांच्या ग्रंथांत या भावनेला कसें तोंड फुटलें तेंही दाखविलें आहे. शिवनिधनानंतर औरंगजेबाच्या स्वारीमुळें मराठी राज्यावर दडपण पडल्यामुळें वारकरी सांप्रदायापासून फुटून निघालेला समर्थसांप्रदाय मागें पडला. शाहूच्या कारकीर्दींत मराठशाही पुनः जोरावली; परंतु पूर्वीपासून ज्यांचा वरचष्मा होता ते देशस्थादि ब्राह्मण मागें पडून, त्यांनीं हलकी मानलेली ब्राह्मणांची चित्पावन ही उपजाति वैभवास चढली. द्रवीड ब्राह्मणांत देखील चित्पावनांस नानासाहेब पेशव्यांच्या वेळेपर्यंत स्थान नव्हतें. शंकराचार्यांच्या द्रवीड ब्राह्मणी गादीवर अद्याप चित्पावनाची स्थापना झालेली नाहीं. बाळाजी विश्वनाथापूर्वी चित्पावन ब्राह्मण शाखेला सामाजिक महत्त्व नव्हतें. बाळाजी विश्वनाथ आणि बाजीराव यांनीं आपल्या अंगभूत गुणांनीं आणि तेजानें राजकीय वैभव संपादन करून सर्वांत उच्च स्थान मिळविलें. या राजसत्तेचा फायदा घेऊन ब्राह्मणांचें वर्चस्व स्थापून, इतर ब्राह्मण जातींहून श्रेष्ठ स्थान मिळणें शक्य नसेल तर निदान त्यांच्या बरोबरीचें तरी कायमचें स्थान मिळवावयाचें, अशी पेशव्यांची मनीषा होती. जुन्या रूढींना पूर्ण पाठिंबा दिल्यानें ही मनीषा साध्य झाली नसती. त्यामुळें रामदासी सांप्रदायासारख्या जुन्या पद्धतीनें ब्राह्मणांच्या वर्चस्वाचें पुनरुज्जीवन करणाऱ्या सांप्रदायांचा पेशव्यांना उपयोग होण्यासारखा नव्हता. ब्राह्मणांमध्यें व विशेषतः घाटमाथ्यावर वर्चस्व असलेल्या द्रवीड ब्राह्मणांमध्यें, रोटी–बेटीव्यवहाराच्या सामाजिक सुधारणा घडवून आणून आपला दर्जा वाढवून घेणे पेशव्यांना कर्तव्य होतें. राजसत्ता आणि वैभव यांच्या जोरावर पेशव्यांनीं हा रूढीविरुद्ध जातिसंकर घडवून आणिला. तेलंगी द्रवीड ब्राह्मणांना इतरांच्या बरोबरीचें वर्चस्व पेशव्यांच्या अमदानींत मिळण्यास सुरवात झाली. नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दींत ही सुधारणा पूर्णपणें यशस्वी होऊन चित्पावन ब्राह्मण हे द्रविड ब्राह्मणांत बरेच समरस झाले. मिळालेल्या प्रतिष्ठेचा जास्त अभिमान मूळच्यापेक्षां उपऱ्याला

अधिक वाटतो व तोच जास्त कट्टर असतो; हाच अनुभव पेशव्यांसंबंधानें आला. देशस्थांहून चित्पावन जास्त कट्टर झाले. पेशवाईनंतर देशस्थ, कऱ्हाडे वगैरे ब्राह्मणांनीं चित्पावनांना पुन: कनिष्ठ ठरविण्याचा यत्न केल्याचीं तुरळक उदाहरणें आढळतात; परंतु एक शतकापर्यंत राज्यवैभव भोगिलेल्या चित्पावन ब्राह्मणांची तडफ व तेजस्विता इतकी वाढली होती कीं, त्यांना खालीं ओढण्याचा प्रयत्न यशस्वी झाल्यास सर्वांचाच अध:पात झाल्यावांचून राहिला नसता. ब्राह्मणांचें—विशेषत: द्रवीड ब्राह्मणांचें—वर्चस्व चित्पावनांच्या सहाय्याशिवाय राहाणें अशक्य आहे, असाच अनुभव त्यांना आला. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस महाराष्ट्रांत पुन: राजसत्ता मिळविण्याच्या आशेला-अंकुर फुटूं लागले, तेव्हां प्रथम शिवाजीच्या कार्याला महत्त्व देण्यांत येऊं लागलें. त्या वेळीं देशस्थ, कऱ्हाडे आणि चित्पावन यांतील भेदभाव लुप्तप्राय झालेले होते. ज्या कारणानें शिवाजीचें महत्त्व एकोणिसाच्या शतकाच्या अखेरीस वाढलें, ज्या कारणानें वारकरी पंथापासून फुटून रामदासांनीं समर्थसांप्रदाय काढला, त्याच कारणानें—म्हणजे वाढत्या वैभवाच्या अपेक्षेबरोबर बळावणाऱ्या जातिभावनांच्या उत्कटतेमुळें समर्थ सांप्रदायाचें महत्त्व ब्राह्मणवर्गाच्या ध्यानांत येऊन, त्या सांप्रदायाचा बोलाबाला होऊं लागला, आणि त्याच कारणामुळें सत्यशोधक समाजाचाही उगम झाला. सतराव्या शतकाच्या अखेरीस रामदासी सांप्रदाय मागें कां पडला आणि एकोणसाव्या शतकाच्या अखेरीस त्या पुनरुज्जीवन होऊन समर्थांच्या शिकवणांत राजकारण हें एक प्रधान अंग आहे असें कां वाटूं लागलें, त्याचा उलगडा होण्यासाठीं शाहिरांच्या काळापासून एक शतकाच्या अंतरावर पुढें घेतलेली मजल एवढ्यावरच थांबवून मागें परतणें जरूर आहे. कारण तो या पुस्तकाचा विषय नाहीं. तथापि सदरील पोवाड्याच्या काळीं राज्य मराठ्यांचें ही भावना नामशेष होऊन पेशव्यांचें राज्य—ब्राह्मणी राज्य अशीच भावना दृढमूल झाली होती. ही भावना केवळ ब्राह्मणांतच नव्हती. होनाजी बाळानें देखील ‘ ब्रह्म—बादशाई ’ असेंच वर्णन केलें आहे. महादजी शिंद्यानें सातारकर महाराजांसाठीं दिल्लीपतीकडून कांहीं आणलें नाहीं. सनदा आणल्या त्या पेशव्यांसाठीं ! पेशवेच आपले धनी ही महादजीसारख्या सरदाराची देखील दृढ भावना ! महादजीला पायबंद देण्यासाठीं आणि त्याचें वर्चस्व

कमी करण्यासाठीं, नाना फडणिसाला मात्र सातारकर महाराजांच्या वर्चस्वाची आठवण झाली आणि महाराजांना कमीपणा आणण्यासारखी सनद सवाई माधवरावानें घेऊं नये,असें त्यानें सुचविलें.पण ती केवळ सबब होती;सातारकर छत्रपतीला जपानच्या मिकयाडोप्रमाणें त्याची खरी सत्ता देऊन स्वतःचें वैभव घालविण्याचा विचार मराठेशाहींतल्या शोगुनांच्या मनांत केव्हांही आला नाहीं. पेशव्यांचे सेनापति पटवर्धन यांनीं सातारच्या सिंहासनाचा अपमान केला; व या ब्राह्मणी राज्याच्या मुळावर शेवटीं खुद्द छत्रपतीच उठले आणि ब्रह्मबाच्छाईच्या मागोमाग मराठयांची हिंदुपदपातशाहीच नव्हे, तर सातारचें सिंहासन देखील कोलमडून पडलें!

'ब्राह्मणी राज्य जोरदार' या पोवाडयांत पुणें राजधानीचें वैभव वर्णिलें आहे. नानासाहेब पेशव्यांनीं पुण्याला त्या वैभवास कसें चढविलें होतें, याचें रा. यशवंतराव केळकरांनीं फार सुरस वर्णन केलें आहे. "ह्यांच्या (नानासाहेबांच्या) कारकीर्दीच्या सुमारास पेशवाईच्या उत्कर्षाचा परमोच्च बिंदु झाला. महाराष्ट्रांतील गरीब रहाणी बदलून जाऊन सुखपभोग व ऐषआराम वृद्धि पावले. उत्कृष्ट घोडे, उत्कृष्ट शास्त्रास्त्रें, नाना प्रकारच्या पोथ्या, पुस्तकें व ग्रंथ, नाटकशाला वगैरे महाराष्ट्रांत आणण्याबद्दल त्या वेळच्या पत्रांतून उल्लेख आहेत. पुणें शहरावर नानासाहेबांचें अतोनात प्रेम होतें. त्याची सुधारणा करण्याकडे त्यांचें सदैव लक्ष असे. हिंदुस्थानभर शेंपन्नास वर्षें चाललेल्या त्यांच्या (?) संचारांत जे जे प्रकार त्यांच्या नजरेस येत ते पुण्यांत शक्य तितके उठवून देण्याचा त्यांचा हव्यास होता. × × × × पर्वतीची स्थापना, पर्वतीचें तळें, सारसबाग, कात्रजचे नळ वगैरे अनेक गोष्टी नानासाहेबांच्या स्मारकरूपच आहेत.× × × × शेवटच्या दोन तीन वर्षांत नानासाहेब रंगेल बनून त्यांना नाचरंग वगैरेंचा शौक उत्पन्न झाला होता. वाडयांत रंगाची चाल त्यांनींच चालू केली."

हा पोवाडा नानासाहेबांच्या मृत्यूनंतर निदान तीस वर्षांनीं लिहिला गेला. 'घोडयावर स्वार होते शिपाई' यांतील भूतकाळ आणि त्याहूनही 'सद्दी कैकांनीं पाहिली' हा भूतकाळवाचकच नव्हे, तर कांहीं जणांनीं ती सद्दी पाहिली, असा पाहाणारांची संख्या नियमित करणारा उल्लेख यावरून हा पोवाडा वसईच्या तहानंतर लिहिलेला असावा असें वाटतें. 'रागोपंत, देव-

राव, विठ्ठल नाना काळ । शहाण्यांत साडेतीन शहाणे बुद्धीचे सबळ । सेवेंत सर्वदा श्रीमंतांच्या जवळ ।' ह्याचा अर्थ शब्दशः खरा घेतल्यास हा काळ फारच मागें न्यावा लागेल. तरीही साडेतीन शहाणे पेशव्यांना अनुकूल होते हें खोटेंच ठरेल. विठ्ठल सुंदर हा निजामाचा दिवाण, शव्यांचा वैरी असून १७६३ मध्यें राक्षसभुवनाच्या लढाईंत मारला गेला होता' साडेतीन शहाण्यांच्या वर्णनाप्रमाणेंच ' शिरकेल कोणता काळ कोरण्या भुंगा ।.सहजांत जिरविती सर्व तयाचा भुंगा ॥ ' हें पेशवाईच्या दराऱ्याचें वर्णनही पोवाड्याच्या वेळीं खरें नसावें. परंतु ' गोखले बापू तलवारबहाद्दर लढाईत जाई । शत्रूंची फौज जरजर करितसे लवलाही । ' या उल्लेखावरून हा पोवाडा वसईच्या तहानंतर १८०६।७ च्या पूर्वी रचलेला असावा असें वाटतें कारण १८०२ मध्यें देखील बापू गोखल्याचें नांव विशेष प्रख्यात नव्हतें. त्याच सुमारास त्यानें धोंडी वाघास मारिलें; परंतु तें इंग्रजांच्या सहाय्यानें ! १८०६ मध्यें ताई तेलणीचा पाडाव करून त्यानें प्रतिनिधीचें बंड मोडलें. त्याच सुमारास त्याचें चोख वर्तन पाहून बाजीरावानें त्याला बारा लाखांचा सरंजाम दिला. १८०७ सालीं त्यानें प्रतिनिधीचें बंड पुरें मोडलें. भावे यांनीं रामजोशांच्या वंशजाचे सांगीवरून त्यांचा मृत्यु इ. स. १८०८ (शके १७३० चैत्र शु० १ ) असा दिला आहे. शालिग्राम इ. स. १८१२ देतात व रा. यशवंतराव केळकरांस तो मान्य आहे. इ. स. १८१२ हाच रामजोशांचा खरा मृत्युकाल असेल तर त्या सालीं चतरसिंगीचें बंड मोडून बापू गोखल्यांनीं आपल्या कीर्तींत भर घातली होती. बापू गोखल्यांच्या उल्लेखावरून १८१२ सालीं पोवाडा लिहिला व त्यानंतर रामजोशी वारले असें दिसतें.

पर्वतीवर उमामहेश्वराच्या ' पीतवर्ण सोन्याच्या मूर्ति ' असल्याचा उल्लेख पोवाड्यांत आहे, पण पोवाड्यांच्या वेळीं त्या तेथें नसून होळकर दंग्यांत लुटल्या गेल्या असाव्या, असें ' नव्हे या बाडा ' ' या थापा नव्हत बरें ' असा सांगतां सांगतां लगेच शपथविधि करावा लागला त्यावरून वाटतें.

रामजोशांवर रा. यशवंतराव केळकरांची मर्जी खप्पा कां झाली आहे तें कळत नाहीं. रा. केळकर व भावे यांच्या मनांत रामजोशांच्याविषयीं ज्या भावना दिसतात त्यांचा छत्तिसाचा आंकडा आहे. रा.भावे महाराष्ट्रसारस्वतांत म्हणतात, "जसें श्रृंगाराचें तसें रामजोशांच्या पवाड्यांतील वीररसाचें

चित्रही केवळ अद्भुत आहे. 'ब्राह्मणी राज्य' हा पोवाडा एक वेळ अवश्य वाचण्याजोगा आहे. त्यांच्या हयातींत पडलेल्या दुष्काळाचें यांनीं काढिलेलें शब्दचित्रही फारच हृदयद्रावक आहे व यांच्या काळच्या धामधुमीचें यांनीं केलें वर्णनही इतकें सरस उतरलें आहे कीं, तें वाचीत असतां ती धामधूम आपल्या डोळ्यांपुढें प्रत्यक्ष उभी राहाते."

'ब्राह्मणी राज्य जोरदार' हा पुणें वर्णनाचा पोवाडा व दुष्काळाचा पोवाडा हे दोन्ही रा. केळकरांनीं आपल्या 'ऐतिहासिक पोवड्यां'त संपादित केले आहेत. (होळकराच्या धामधुमीचा पोवाडा मात्र दिलेला नाहीं.) रा.केळकर भाव्यांच्या अभिप्रायाविषयीं लिहितात कीं, "रामजोशांचे पोवाडे अवघे सबंध दोन आहेत. ते म्हणजे पुणें-वर्णन व दुष्काळाचा पोवाडा. 'ब्राह्मणी राज्य जोरदार' इ० पुणें-वर्णनाच्या पोवाड्यांतला वीररस केवळ अद्भुत आहे असें भावे दडपून सांगतात; परंतु पहिल्या अक्कड कडव्या-खेरीज त्यांत वीररस कोठेंच नाहीं. नुसतें पुण्याचें ठराविक वर्णन आहे. त्याचप्रमाणें 'दुष्काळाचा पोवाडा फार हृदयद्रावक आहे' असें भावे सांगतात; परंतु 'प्रासानुप्रासाच्या मौजेखेरीज त्यांत कोठेंही करुणरस नाहीं. उलट हा पोवाडा वाचकाला शब्दांची मौज म्हणूनच वाचावासा वाटतो.'

रामजोशांवर रा. यशवंतरावांची वक्रदृष्टि असण्याचें मुख्य कारण काय असेल तें पुढें पाहातां येईल. परंतु रा. भावे यांच्यावर त्यांची जी करडी नजर आहे, तिचाही कांहींसा परिणाम त्यांच्या रामजोशांकडे पाहाण्याच्या तऱ्हेंत झाला असावा. रा. भावे यांच्या मृत्यूनंतर अल्पकाळांतच त्यांच्या शीलावर व चारित्र्यावर त्यांनीं जे आरोप केले आहेत ते करण्याचें कांहीं कारण नव्हतें. 'महाराष्ट्र-सारस्वतकारां'च्या खासगी चारित्र्याची माहिती प्रस्तुत लेखकाला नाहीं; परंतु वीररस नसेल तेथें आहे म्हणणें, अथवा प्रासा-नुप्रासाच्या मौजेला करुणरस म्हणणें, अशासारखा अप्रयोजकपणा करण्याइतके रा. भावे अरसिक होते असें वाह्यात् विधान करणें अत्यंत धाष्टर्याचें असून, तें करणारावर 'देवदूत देखील जेथें पाऊल ठेवण्यास कचरेल तेथें मूर्ख बेशक घुसतो;' या इंग्रजी म्हणीचा प्रयोग केल्यास तो गैरलागू होईल असें मानण्यास कारण दिसत नाहीं. शालिग्राम, शितुत वगैरे संशोधकांवर रा. यशवंतरावांनीं कठोर टीका केली आहे; परंतु टीका-

विषयक आक्षेप व दाखविलेले दोष खरे असतांही पुस्तकाच्या अर्पणपत्रिकेंत त्यांचीं नांवें गोंवून त्या कठोरतेचें परिमार्जन रा. यशवंतरावांनीं कांहीं अंशीं केलें आहे. परंतु त्यांनीं रामजोशांची स्तुति करण्याच्या घोर अपराधाबद्दल रा. विष्णुपंत चिपळूणकरांवर अज्ञानाचा, रंगाचार्य रड्डी शास्त्र्यांवर अभिमानवशतेचा आणि रा. भाव्यांवर अरसिकतेचा. आणि असत्याचा असे आरोप करून रा. भाव्यांच्या खासगी चारित्र्यावरही शिंतोडे उडविले आहेत. रा. भाव्यांच्या मतें रामजोशाला शाहीर वाङ्मयांत अग्रस्थान देण्यांत आलें; रा. यशवंतराव तें प्रभाकराला देऊं इच्छितात. एवढ्याच मतभेदाचें समर्थन करण्यास इतक्या गौण मार्गाचें अवलंबन करणें वाजवी नव्हतें. प्रभाकराच्या योग्यतेविषयीं विवेचन पुढें येईलच; पण रा. भाव्यांना अनुलक्षून रामजोशांसंबंधीं जें मत रा. यशवंतरावांनीं प्रदर्शित केले, तें कितपत ग्राह्य आहे तें पाहूं. ' ब्राह्मणी राज्य जोरदार ' या लावणींत अक्कड कडवें म्हणजे पहिलेंच कडवें खेरीजकरून वीररस कोठेंच नाहीं; भाव्यांचें विधान दडपेगिरीचें आहे, असें रा. यशवंतराव म्हणतात.'ब्राह्मणी राज्य' या पोवाड्यांत वीररसाचें चित्र अद्भुत आहे असें रा. भाव्यांनीं म्हटलेलें नाहीं. दोन निरनिराळ्या वाक्यांची सांगड घालून रा. यशवंतरावांनीं भाव्यांच्या तोंडीं 'पुणें–वर्णनाच्या पोवाड्यांतला वीररस केवळ अद्भुत आहे ' असें वाक्य दडपून जी दडपेगिरी केली आहे, तितकीच ' पहिल्या अक्कड कडव्याखेरीज त्या पोवाड्यांत वीररस कोठेंच नाहीं ' ह्या त्यांच्या विधानांतील दडपेगिरी अद्भुत आहे. ' शिद्यांचा ज्यान बत्तीस ( जीन बॅप्टिस्ट ) ना लुंगा ( लुंगासुंगा नव्हता )। गाईकवाड सरदार येति प्रसंगा । धांवती रणांगणीं मानकऱ्यांचा चुंगा । शिरकेल काळ कोण कोरण्या भुंगा । सहजांत जिरविती सर्व तयाचा मुंगा । गोखले बापू तरवारबहाद्दर लढाईंत जाई । ' शत्रूची फौज जरजर करितसे लवलाहीं । ' तसेंच ' साक्षात विष्णु अवतार पेशवे कूळ । संपूर्ण महीचे भूप कांपती धाक दरारा प्रबळ । होळकर, भोसले, शिंदे, मानकरी सकळ । तलवारबहाद्दर करिति शत्रुची राळ । स्वारीच्या भोंवतीं पटवर्धन मंडळ । युद्धांत रणांगणिं जसा आगिचा लोळ । बहु नामी पल्लेदार तोफांचा कल्लोळ । जेजाल जंबुरे बाण करी दळवळ ।' हें वर्णन रसहीन कां समजावयाचें ? त्यांत रस असेल तर तो वीररसाहून दुसरा कोणता ? याचा रा. यशवंतरावांनीं

खुलासा कल्यास साहित्यशास्त्राला मोठी महत्वाची टीप जोडली जाईल ! कदाचित् वरील कडवीं हेंच पहिलें अक्कड कडवें असा त्यांचा अभिप्राय असेल तर नकळे ! रा. यशवंतराव पुढें म्हणतात कीं, '( या पोवाड्यांत ) नुसतें पुण्याचें ठराविक वर्णन आहे.' 'ठराविक' या शब्दाचा अर्थ कोशांतून काढणें नलगे इतका तो सर्व मराठी जाणणारांस परिचित आहे. पुढील वर्णन 'ठराविक' आहे कीं काय तें वाचकांनींच ठरवावें. 'लंकाच पुण्यामधिं लेश न दारिद्र्याचें । ×××× पुणें शहर अमोलिक रचना अशी दुसरी नाहीं । ××× । भले भले धनत्तर वाडे हवेल्या जागा । आळोआळीं झळकती एकसारख्या रांगा । ××× शहरांत सुखी अवघे, क्वचितचि भीक-मागा । तेहि गेले कुठें धर्मास करिना रे जागा ॥ ××× । पर्वतावरति पर्वतिस्थान त्यावरति चौघडा । तळापर्यंत पायऱ्या जावें धडधडा । अनुष्ठान पंचपक्वान्न पडेना खाडा । पुजारी पुजती उमामहेश्वर जोडा । पीतवर्ण सोन्याच्या मूर्ति नव्हे या बाडा । पाहाऱ्यास शिपायी उभे पेटवूनी तोडा ! पुढें तळें त्यामध्यें लहान बेटाचा तुकडा । गणपती त्यांत पलिकडे आंबिल ओढा । ××× । जागोजाग मौज अनिवार नसे अंतपार वर्णु तरि काई ।' हें वर्णन जर 'ठराविक' म्हणावयाचें तर वर्णनात्मक 'बिनठरा-विक' काव्य तरी कोणतें ? रा. यशवंतरावांचें यापुढील विधान 'प्रासानु-प्रासाच्या मौजेखेरीज त्यांत ( दुष्काळाच्या पोवाड्यांत ) कोठेंही करुणरस नाहीं,' असें आहे. त्याची यथार्थता पाहूं. 'ही दुनिया सारी जठराग्निंनत भाजली' हा एकच चरण या विधानाचा फोलपणा पटविण्यास पुरेसा आहे. परंतु अशीं हृदयद्रावक वर्णनें या पोवाड्यांत किती तरी आहेत. दुष्काळाचें कारण, त्याचा लोकांच्या वृत्तीवर परिणाम, दुष्काळाच्या यातना व भावि परिणाम यांचें यथातथ्य वर्णन या पोवाड्यांत रामजोशांनीं किती सहृदयतेनें केलें आहे तें दाखविण्यास संबंध पोवाडाच उतरावा लागेल. परंतु शाहिरी काव्य वाचण्याची जिज्ञासा व्हावी आणि या ग्रंथांतील उताऱ्यांवरच त्या जिज्ञासेचें निराकरण होऊं नये, असा प्रस्तुत लेखकाचा उद्देश आहे. यासाठीं सर्व पोवाडा न देतां त्यांतील वर्णनाचे कांहीं भाग तेवढे येथें देऊन रा.यशवंतरावांच्या विधानाची परीक्षा करणें वाचकांवर सोंपविणें इष्ट होईल ! वर्णन जर करुणरस उत्पन्न करणारें असेल तर त्यांत प्रास, अनुप्रास, उपमा,

रूपक, वगैरे अर्थालंकार किंवा शब्दालंकार आल्यानें उणेपणा येतो, असा शोध अद्याप लागलेला नसून साहित्यशास्त्राचा अभिप्राय उलट आहे. वरील पुणें–वर्णनाचा पोवाडा आणि हा पोवाडा असे दोन्ही 'ऐतिहासिक पोवाडे' या पुस्तकांत रा. यशवंतरावांनीं संपादिले आहेत व अर्थस्पष्टीकरणार्थ मोठ्या मार्मिकतेनें टीपाही दिल्या आहेत. रामजोशांनीं केलेल्या दुष्काळ वर्णनास अनंतफंदीच्या ग्रंथांतील त्यासंबंधींच्या वर्णनाचे आधारही त्यांनीं दिले आहेत. त्या अर्थी त्यांनीं केलेलीं विधानें वेडेपणाचीं नसून घालवेडेपणाचीं असावीं असा बळकट संशय येतो. असें वेड पांघरण्यांत त्यांचा उद्देश काय असावा याचें अनुमान करणें फार कठीण आहे. तथापि कारणाशिवाय कार्य होत नसतें. यासाठीं कांहीं तरी अनुमान तर्कानें बसविणें प्राप्त आहे.

## पेंढार व दुष्काळ

रामजोशांची पोवाडेवजा लावणी आणि अनंतफंदीच्या कित्येक लावण्या व त्याचप्रमाणें अनंतफंदीकृत माधवग्रंथाचा सहावा अध्याय, यांत ज्या दुष्काळाचें वर्णन आहे तो दुष्काळ निसर्गाच्या प्रकोपामुळें आलेला नसून राजकीय बंडाळीमुळें उद्भवला होता. त्या दुष्काळाच्या पाठीशीं मराठी राज्याच्या कैक प्रसंगांची कारणपरंपरा उभी होती. त्यांतील कित्येक प्रसंगांचा त्या दुष्काळाशीं प्रत्यक्ष संबंध पोहोंचत नाहीं. तथापि त्याच्या कारणांच्या पूर्वपीठिकेत ज्यांची गणना होते अशा प्रसंगांचा ऊहापोह केला नाहीं तरी निर्देश करणें आवश्यक आहे.

नारायणराव मारला गेल्यावर राघोबादादासारखा शूर, महत्त्वाकांक्षी आणि मराठी राजकारणांत जन्म घालविलेला पुरुष पेशव्यांच्या गादीवर बसता तर काय अनर्थ झाला असता? खरा कायदेशीर वारस अल्पवयी असला तर घराण्यांतील वडील पुरुषानें गादीवर बसावें, अशी चाल जंजिऱ्याच्या हबशी घराण्यांत परवांपर्यंत होती. नारायणरावाचा खून राघोबानें करविला असें धरून चाललें तरी वाममार्गानें सत्ता मिळविणाऱ्यांची कारकीर्द राज्याला लाभदायक झाल्याचीं उदाहरणें थोडींथोडकीं नाहींत. बारभाईंच्या कारभारामुळें मध्यवर्ति मराठी सत्ता कशी कमजोर झाली; नाना फडणविसासारखा केवळ लेखणीबहाद्दर मुत्सद्दी मराठी राज्यांत फाटाफूट होण्यास कसा कारण

झाला; आपली सत्ता कायम ठेवण्यासाठीं भेदनीतीचा उपयोग त्यानें घरच्या घरीं कसा केला; वगैरे गोष्टींचा दुष्काळाशीं प्रत्यक्ष संबंध नाहीं. १७९५ त सवाई माधवरावानें आत्महत्या केल्यामुळें बारभाईचें कारस्थान परिणामीं वायफळ ठरलें ! मराठ्यांच्या दुर्दैवानें त्या वेळीं हरिपंत फडके, महादजी शिंदे, जिवबादादा बक्षी हे देखील नुकतेच वारले होते; रामशास्त्री प्रभुणे सहा वर्षांपूर्वी निधन पावले होते; अहल्याबाई होळकरीण सवाई माधवरावाच्याच मृत्यूच्या सालीं वारली. शेवटीं ज्या राघोबादादाच्या वंशाला मुजरा करावयाचा नाहीं, अशी नारायणरावाच्या चितेला साक्ष ठेवून शपथ घेतली होती, त्या वंशांतील ज्या पुरुषाला नानानें स्वहस्तें पेशव्यांच्या गादीवर बसविलें, तो रावबाजी नानाच्याच धोरणामुळें रणभीरु आणि नादान बनलेला होता. हातची सत्ता कायम राखावी म्हणून या कामीं जें महाडचें कारस्थान रचण्यांत आलें त्याच्या युक्तायुक्तेचा विचार येथे कर्तव्य नाहीं. या कारस्थानाच्या हकीकतीची ' कथा बाजिरायें । आपुले हस्तें लिहिली स्वयें । त्या प्रभूच्या लेखाअन्वयें । ' अनंतफंदीनें लिहिलेल्या माधवग्रंथाच्या पहिल्या पांच अध्यायांचा समावेश अनंतफंदीच्या काव्यवर्णनांत होईल. नाना फडणविसाची ही सर्व खटपट कामास न येतां त्याला १७९७ त नगरच्या किल्ल्यांत कैद भोगावी लागली. नानाला कैद करण्यासाठीं शिंद्याला देऊं केलेल्या दोन कोटींची भरपाई करण्यासाठीं बाजीरावानें शिंद्याकडून आपल्याच पुणें राजधानींतल्या शेठसावकारांस लुटविलें. त्याच सालीं तुकोजीराव होळकर मृत्यु पावला व त्याच्या मुलांत भांडणें लागलीं, याचा फायदा घेऊन शिंद्यानें मल्हारराव होळकरास आणि बाजीरावानें विठोजीस मारलें. मल्हारराव लढाईत पडला; पण विठोजीला बाजीरावानें हत्तीच्या पायीं दिलें. दौलतराव शिंदे आणि यशवंतराव होळकर यांनीं एकमेकांच्या इंदूर व ग्वाल्हेर या राजधान्या लुटल्या. विठोजीच्या मृत्यूनें चिडलेला यशवंतराव पुण्यावर चाल करून आला. बाजीरावानें पळून जाऊन इंग्रजांचा आश्रय धरिला. व ३१ डिसेंबर १८०२ रोजीं वसईच्या तहावर सही करून त्यानें मराठी सत्तेवर पारतंत्र्याचें काळें निशाण चढविलें. यशवंतराव होळकरानें पुणें लुटविलें व त्याच्या हत्तीघोड्यांनीं पिकें तुडवून त्यांची नासाडी केली. त्यामुळें १८०३ सालीं पुणें प्रांतांत पहिला दुष्काळ

पडला. १७९७ सालापासून बंडाळीच सुरू होती. १८०२ पासून पेंढाऱ्यांच्या टोळ्या उठल्या. ह्या टोळ्यांत हिंदु व मुसलमान असे दोन्ही धर्मांचे लुटारू एकमेकांशीं सहकारिता करून सर्व प्रजेस लुटीत होते. परप्रांतीयांची लुटालूट करण्यास सोकावलेले मराठे आतां आपल्याच देशांत आपलें कसब चालवूं लागले. बेबंदी होऊन मुलूख उध्वस्त झाला. शेतांची लागवड बिलकूल झाली नाहीं. त्यामुळें १८०४।५ या दोन सालीं भयंकर दुष्काळ पडला. रामजोशी आणि अनंतफंदी या दोघांनींही या बेबंदशाहीचें व दुष्काळाचें वर्णन केलें आहे. माधवग्रंथाच्या ज्या सहाव्या अध्यायांत दुष्काळाचें वर्णन आलें आहे, तो अध्याय महाराष्ट्र-सारस्वतकार भावे ठरवूं पाहातात तसा प्रक्षिप्त नाहीं, याचीं रा. यशवंतराव केळकरांनीं दिलेलीं कारणें सयुक्तिक आहेत.

रामजोशी जसा विद्वान् आणि रसिक होता तसा तो व्यवहारचतुरही होता. 'ब्राह्मणी राज्य जोरदार' हा पोवाडा त्यानें मागील लेखांकांत दाखविल्याप्रमाणें १८१२ त लिहिलेला असो किंवा त्यापूर्वीं पांच वर्षें लिहिलेला असो, त्याच्या पहिल्याच कडव्यावरून हें ब्राह्मणी राज्य कमकुवत होत चाललें आहे, त्याला उतरती कळा लागली आहे आणि कैकांनीं पाहिलेली त्याची जबर सद्दी आटत आहे, हें दुःस्वप्न त्याला पडलें होतें. दुष्काळावरील लावणींत हा बेबंदशाहीचा कलि राज्य खाणार हें स्पष्ट भाकित त्यानें वर्तविलें आहे. जोशीबुवा पेशवाईची इतिश्री होण्यापूर्वीं कित्येक वर्षें वारले, पण फंदीबुवांनीं तो प्रसंग प्रत्यक्ष पाहिला. माधवग्रंथाच्या पांचव्या अध्यायाच्या शेवटाच्या सुमारास असलेल्या 'मग शिंद्यांनीं आणोनि बाजीराव । राज्यासनीं केला गौरव । पुढें माजले जसे कौरव । कोणास कोणी न मोजिती ॥ ४७ ॥ एकमेकांनीं आपआपसांत । एकमेकांचे योजिले घात । मसलत एकही न ठेविली पोक्त । म्हणूनि बैदा जाहला ॥ ४८ ॥ शिंद्यानें वधिला मल्हारराव होळकर । बाजिरायें वधिला त्याचा सहोदर । कापट्य करुनी शास्त्री गंगाधर । देवद्वारीं मारिला ॥ ४९ ॥ आपणही जाहले राज्यभ्रष्ट । एकही न केला शेवट । धरिली उत्तरपंथेंची वाट । ब्रह्मावर्तीं बैसले ॥ ५० ॥' या ओंव्या प्रक्षिप्त तरी असाव्या. किंवा मागाहून अनंतफंदीनेंच जोडल्य असाव्या. कारण ५१ ते ५५ ओंव्यांत प्रत्येक अध्यायाचा सारांश दिला आहे, त्यांत चिमणाजी रघुनाथाच्या दत्तविधानाची हकीकत इतकाच पांचव्या

अध्यायाचा सारांश दिला आहे. पहिले पांच अध्याय बाजीराव गादीवर येईपर्यंतच्या हकीगतीचे असून बाजीरावानें स्वहस्तें लिहून दिलेल्या मजकुरावरून लिहिले असल्याचा 'बाजी रघुनाथ पत्राधार' प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं सांगितला आहे. हे पांच अध्याय बाजीरावाच्या खास सांगण्यावरून व 'त्या प्रभूच्या लेखाअन्वयें' असून ते बाजीरावाच्या हुकुमावरून लिहिलेले आहेत. त्यांत त्याच्या राज्यभ्रष्टतेचा उल्लेख येणें संभवनीय नाहीं, म्हणून तो उल्लेख मागाहून जोडला असावासें दिसतें. सहावा अध्याय बाजीरावानें पाहिलेला असावा असें 'जे जैसीं कर्में आचरिती । तदनुसार फळें भोगिती । निमित्त मात्र भूपति । त्याजकडे दोष नाहीं ।' अशा वर्णनांत दुष्काळाच्या आपत्तींस कारण झाल्याच्या दोषांतून बाजीरावाला आरंभींच मुक्त केलें आहे, त्यावरून दिसतें. त्यापुढील दुसऱ्या ओवींत मागील कथेचा संदर्भ जोडला आहे, अनंतफंदीच्या वर्णनांत पेंढाऱ्यांनी केलेल्या छळाचा तपशील १४ व्या ओवीपासून ६८ ओवीपर्यंत दिला आहे. तो रामजोशांच्या वर्णनापेक्षां कांहीसा जास्त खुलासेवार आहे. परंतु रामजोशांचें वर्णन जास्त पद्धतशीर आहे. रामजोशांच्या पोवाड्यांचे चार चौक आहेत. पहिल्या चौकांत बंडाळीचें वर्णन आहे. दुसऱ्या चौकांत बेबंदशाहीमुळें जनता कशी नीतिभ्रष्ट बनली त्याचें वर्णन आहे. तिसऱ्या चौकांत दुष्काळामुळें लोकांचे हाल कसे झाले त्याचें वर्णन आहे. चौथ्या चौकांत जिनसांचे भाव कडाडल्यामुळें वाढलेल्या महागाईच्या दरांचा तपशील दिला आहे.

या लावणीवजा पोवाड्याचें ध्रुपद रामजोशांची दूरदृष्टि दाखवितें. हें ध्रुपद असें, 'उगा भ्रमसि वाउगा कशाला ? युगांत खळ हा कली ! । कली मातला सारा; धनदारा इच्छी; राज्यासहि हाकली ! ॥'

'सर्व युगांत दुष्ट जें कलियुग त्यांत कलह ( बंडाळी ) माजून धनदाराच नव्हे, तर राज्य देखील चाललें;' ह्या रामजोशानें दिलेल्या कारणापुढें 'पूर्वी भाकीत होते जाणत जोशी । कीं पुढें येईल रुद्रवंशी । काळ पडेल दक्षिण देशीं, वर्णसंकर होईल ॥ ३ ॥ × × × × × ॥ जें जें कथिलें वाल्मिकें । तें तें सत्य केलें रघुनायकें । तैशीं ह्या जोशाचीं वाक्यें । ह्या बंडलोकीं सत्य केलीं ॥ १३ ॥' हें अनंतफंदीचे केवळ ज्योतिषावर विसंबून दिलेलें कारण किती पुळचट दिसतें !

पुढें बेबंदशाहीचें रामजोशांचें वर्णन:, 'कुणा न कुणि धनि ! मना ये तसें ॥ जनासि जन वंचिती । धनानिमित्तें मरति किती; गरती धरुनि यवन अन्न चारिती । आठां दिवसांमधिं पठाण तिनदां लुटावया धांवती । ××× । दार, वित्त, घरदार दिलें तरि मार चुकेना रती । फार वदूं मी काई ? वधिल्या हो गाई ! बाटविल्या द्विजसती ! । ××× । खंड कुणाचा ? गांव कुणि घ्यावा कुणि द्यावा ? कुणाला किती ? । असा न कोणी पुसावयाला ! कसा काळ ! कशी गती ! । ××× । चिका आंत ज्या निका पढविल्या; पिकाशिं गळ लाविती । विकावया त्या नेल्या; किती मेल्या अबला; उरल्या जन चुंबिती । फांस गळ्यामधिं; बांस ( लोखंडी सोटे ) पाठिवर लोह हुडा लाविती । मांस विप्र लोकांचें, तोकांचें ( अर्भकांचें ) वेंचिति (तोडिती ) सांडस घेउनि हातीं । चीर ( वस्त्र ) नसे हो अंगा; ××× किती सांगावा तो ताप ? जीभ लाजती ! । ××× । कैकांनीं हिरे, बचनाग, कैक चावले । ××× । किती ब्राह्मणी-गालही यवनांनीं चावले । ××× कयास मज हा; लया रुद्र करि; दया-दृष्टि झांकली । भयानका क्षिति झाली; घरघाली रुद्रविंशति जगिं फांकली ।' येथें शेवटच्या दोन चरणांत मात्र भवितव्यावर कांहींसा हवाला दिला आहे. साठ संवत्सरांपैकी पहिलीं वीस ब्रह्मदेवाचीं, व दुसरीं वीस विष्णूचीं, हीं सुखाचीं वर्षें जाऊन शेवटचीं वीस रुद्राचीं दुःखमय संवत्सरें सुरू झालीं, असा 'कयास' म्हणजे केवळ कविकल्पना म्हणून सांगितली आहे.

या बंडाळींतील छळाचें वर्णन अनंतफंदीनेंही केलें आहे.

'××× । घरधनी मारितां आरोळी । त्याजला आधीं चोपावें ॥ मग त्याची गृहस्वामिणी । करीत भोंवतीं शंखध्वनी । तों तिची बांधोनियां वेणी । मार देतां फरमासी ॥ लावूनियां दरवाजा । यथासांग घालिती पूजा । तेथें ईश्वराखेरीज दूजा । कोण त्याला वांचवी ॥ ××× । तावूनियां तप्त तवे । उभे करावे; त्यावरी ॥ ×× । शें-दोनशांस करावे ओणवे । उडूनियां त्यांवरी बैसावें । राख मिर्ची घालूनि द्यावे । तोबरे मुखीं घोड्यांच्या ॥ खटमार म्हणजे विख्यात । वरकड मार त्याचे आश्रित । ही टूम ईश्वरें अनुश्रुत । कोठूनि काढिली कळेना ॥ ××× । एक मोचा सुद्धां हाणिती मुखावरी ब्राह्मणाच्या ॥ पायांस बांधावीं चर्‍हाटें । झाडांशीं टांगिती उफराटें । मग ते ब्राह्मण अथवा मराठे । कोण तेथें निवडितो ॥ ××× । एक उड-

नियां बैसती । घोड्यापरी माणसावरी ॥ एक म्हणती आमचा घोडा । मोडा याचिया माकडहाडा । × × × ॥ मार मारूं भरावें भोत । बताव ऐसें बोलतात ॥ जरी कोटयावधी दिधलें द्रव्य । तरी बताव ऐसी राहूं नये । आणीकही दाखवा कोठें आहे । बताव कांहीं न सरेचि ॥ मग बताव त्याची सरावी केव्हां । प्राण त्याचा जाईल जेव्हां । द्रव्य नाहीं समजावें तेव्हां । असतें तरी कां मरता हो ? ॥

ह्या दोन्ही वर्णनांत जोशीबुवांचें वर्णन करुणरसयुक्त नाहीं असें कोण म्हणेल ? अनंतफंदीच्या वर्णनांत जी विनोदाची झांक आहे, तींतील हास्यरस्य करुणरसाला बाधक आहे !

पुढें दुसऱ्या चौकांतील जनतेची नीतिभ्रष्ट वृत्ति ! मनोभाव आणि मानवी स्वभाव यांचें अंतरंग रेखाटण्यांत रामजोशांची बरोबरी होनाजी बाळा कांहींशी करूं शकतो.इतर शाहीर त्याच्या तोडीस यत नाहीत.या बंडाच्या छळानें लोक तीव्र निराशेनें बेफाम होऊन वाटेल तें पातक करण्यास तयार झाले. 'धर्म गेला, अधर्मराजाची अफतरी ( कारकीर्द ) सुरू झाली,' असें रामजोशी वर्णन करितो. ब्लॅक डेथची सांथ युरोपांत आली तेव्हांचीं अशींच वर्णनें आहेत. ' बाप तयाला ताप वृद्धपणिं पाप पुत्र हा करी । × × × × । होय कशाचा बेटा तो पेटाऱ्यांतुनी साप काढिला वरी ॥ ' भोंदू गुरूंची बुवाबाजी कशी बोकाळली तें मागें दिलेंच आहे त्याशिवाय ' सती निजपती त्यजुनी नांदतीं पराचे घरीं । जिवें मारिती भर्ते, त्यावरते दुसरे करिति कितिक सुंदरी ॥ × × । कुणी विधवा ठेविती घरामध्यें पाणकी । मित्रास वंचिती मग कोठुनि भावकी ? । अशीं किती पापें जगीं कुणा ठाउकीं ? ॥ '

हा ' सबंध दुसरा चौक म्हणजे कलिप्रळयाचें काल्पनिक चित्र वाटतें. ' असा रा. यशवंतराव केळकरांचा अभिप्राय आहे, तो चुकीचा आहे ! माधवग्रंथांत दुष्काळाबरोबर अनाचार बोकाळल्याचें वर्णन नसलें तरी मनुष्यस्वभावाचा तो प्रकार खरा असल्याचें इतिहास सांगतो. दुष्काळावर अनंतफंदीच्या लावण्या आहेत, त्यांत कांहीं वर्णन असेंच आहे.

पुढें ' दुष्काळाचा घसरा ( जोर ) घ्या पाहुनी । ' ' किती भरती पोटीं श्वानें कंटाळुनी । × × ×। पाक हो न हो हाक मारिती मज भाकर द्या म्हणुनी । टाक मुखामधिं कांहीं, अन्न मज नाहीं म्हणती पंधरा दिनीं । × × । गळां

पडुनि किती रडती मरती बालक मुडदे कवटाळुनी ॥ करितील काय हो अन्नाविण गांजली। ही दुनया सारी जठराग्नित भाजली। नच माधुकरीला कोणी तदा लाजली। वेंचिती शितें चिखलांत राड माजली। × × ×। कैकांनि कुटुंबें वीष पाजुनि निजविलीं।'

'प्रासानुप्रासाच्या मौजेखेरीज ह्या वर्णनांत कोठेंही करुणरस नाहीं;' हा अभिप्राय वाचून 'अरसिकेषु कवित्व निवेदनं' म्हटलें असतें, पण रा. यशवंतराव केळकर अरसिक आहेत असेंही म्हणवत नाहीं! मग म्हणावयाचें तरी काय; तें पुढें पाहूं!

अनंतफंदीच्या वर्णनांत करुणरसाशीं बीभत्साचें मिश्रण आहे! 'जननी आपुलिया बालकातें। हिरवेंच लागे भक्षावया ॥ वृषभ, धेनु, सूकर, श्वानें। मत्स्र, मंडुक, गणपती वाहनें। सर्वही भक्षिले भिकाऱ्यानें। शेवटीं प्राण गेले हो ॥ जैसे दाणे काढती कणसाचे। तैसें मांसरक्त भक्षावें प्रेतांचें ॥ अभिमानि देखण्या नारी। त्या घरोघर लागल्या दाण्यावारी। घरधनी वरुनि काठ्या मारी। अभिमान कोठें राहिला? ॥ बंड आणि महर्गतेचा संयोग। या उभयतांचा घडतां योग। प्रलय झाला यथासांग।'

इतकें म्हणून शेवटीं फंदीबुवा निष्कर्ष काढतात कीं, "स्वामीचा जे घात योजिती। शेवट त्यांच्या ऐशा गती। सत्क्रियेशीं न जागती। ते अधोगती मरती की ॥" पळपुट्या बाजोरावावर स्वारी करणारा यशवंतराव होळकर गेला सुखरूप निघून! आणि व्यर्थ पीडिलेल्या प्रजेला गांजणूक होऊन वर हा उपदेश! एकदां ज्याची रावबाजीवर इतकी अंध भक्ति, त्यानेंच पुढें त्याला 'जुन्याची तिंबुनि कणिक। राज्य आपुलें हारविलें।' असा टोला देणें योग्य नव्हतें.

रामजोशांनीं चौथ्या चौकांत 'मणास रुपये तेरा तेलाला, तुपाला बारा शपथ वाहिली।' वगैरे महागाईची धारण दिली आहे, तिचें आजच्या काळांत आश्चर्य वाटण्यासारखें नसलें तरी त्या काळांत होतें. 'नवे मऊ जे दाणे बेदाणे झाले। ××। सार हिऱ्याला गार म्हणति सोनार देत पावली। ×××। पैशाचा एकच मुळा एक दोडका। पैशास मक्याचा कंद एक मोडका। हा कांदा दोपैशांस एक बोडका। जळणास रुपायाला एक लहान खोडका।' वगैरे वर्णन देऊनही पुढें रामजोशी म्हणतात, 'अजातरिपु हे

प्रजा, इत:पर मजावृष्टि शिरकली ॥ ' ज्यांनीं आपली ही दशा केली त्या शत्रूंचें पारिपत्य करण्याचें मनांत न आणतां, रावबाजीच्या रंगढंगांत, समाराधनांत, जेवणावळीत, आणि विलासांत जनसमाज लवकरच गर्क झाला, त्यावर ही टीका किती भेदक आहे ? हिंदी प्रजेचा धिमेपणा ' अजातरिपु ' या एका शब्दांत किती यथार्थतेनें येतो ! दुष्काळाच्या छळाचा अतिरेक दाखविण्यासाठीं ब्राह्मण किंवा त्यांच्या स्त्रिया यांचा देखील छळ झाला, असें जें वर्णन या दोन्ही शाहिरांनी केलें त्यावरून या ब्राह्मणी राज्यांत ब्राह्मण म्हणजे अगदीं अनुल्लंघनीय ही भावना कशी कळसास गेली होती तेंही दिसून येतें. होळकरांच्या दंग्याचें वर्णन करणाऱ्या रामजोशांच्या पोवाड्यांत ही भावना फार उत्कटतेनें नजरेस येते. ' द्विज घालुनि बंदीं । × × × । पायीं यवनाच्या ब्राह्मण वंदी । मांसमद्याच्या भरल्या तुंगा । त्या द्विजोत्तमांगावर; त्यांही बिगार ? केवढा दंगा ! । ' इत्यादि पोवाड्यांतील उद्गार त्या भावनेचे दर्शक होत. त्या काळांतील परिस्थितींत, हिंदु राज्यांत ब्राह्मणांचे हाल व विटंबना होणें म्हणजे बेबंदशाहीचा कळस होय. केवळ ब्राह्मणांचाच छळ झाला नाहीं, तर ' भंगिल्या शिवाच्या पिंडी । किती गणपती चंडी । ' असा अनर्थ झाला. हा पोवाडा रा. यशवंतराव केळकरांच्या नजरेआड कसा आला तें कळत नाहीं. यशवंतराव होळकराचा पोवाडा अनंतफंदीनें रचला आहे, त्यांत पुण्यावर स्वारी करणाऱ्या लष्करांत पठाण लष्कर किंवा पेंढार असल्याचा उल्लेख आहे. त्यांनीं हे अत्याचार केले असावे. ' यवनांचा चुंगा । हिंदु लागलेच त्या अनुषंगा ।' असें वर्णन रामजोशांनीं केलें आहे, त्यावरून पठाणांचें अनुकरण हिंदु पेंढाऱ्यांनींही केलें असावें.

बंडाळी व दुष्काळ यांचें अनंतफंदीनें व रामजोशांनीं केलेलें वर्णन ताडून पाहातां, रामजोशांचें वर्णन जास्त सहृदयतेनें केलेलें आढळून येतें.

वरील प्रसंगाचें वर्णन जसें या दोन शाहिरांनीं केलेलें आढळतें, तसेंच इतर कित्येक विषयांवर या सहांपैकीं अनेक शाहिरांनीं कवनें केलेलीं आढळतात. रामजोशांप्रमाणेंच इतर शाहिरांनीं वर्णिलेले कांहीं विषय आढळतात; ते क्रमश: घेऊन, रामजोशी व इतर शाहीर यांमधील फरक काय तें पाहूं. सामान्यत: सांगावयाचें म्हणजे या सहाही शाहिरांत रामजोशांची विद्वत्ता

सर्वांत ज'स्त असल्याचें अढळून येतें. त्यांची रचना जास्त शिस्तवार आणि व्यवस्थित असते; तशीच ती तर्कशुद्धीही असते. केवळ श्रद्धेपेक्षां बुद्धीचा जोर जास्त असतो. रामजोशांची दृष्टि जास्त अंतर्मुख व दूरवर पोंचणारी असते. त्यांची वर्णनशैलीही इतरांपेक्षां जास्त उठावदार असते.

## तुलनात्मक विवेचन

नांव लावणी । रूप लावणी । केलि तत्वाची लावणी ।
चतुर भाग्यवान त्यांना । उकिरडिं चिंतामणि ॥

—परशुराम.

पंढरपूर हें महाराष्ट्रचें अत्यंत मान्य असें तीर्थ होय ! मागें अनेकदा विवेचन केल्याप्रमाणें निवृत्तिमार्गाची छाप हिंदु संस्कृतीवर जास्त असल्या कारणानें वारकरी पंथाचें हे प्रमुख तीर्थ अत्यंत मान्यता पावलें आहे. पंढरपुरावर रामजोशी, होनाजीबाळा, परशुराम व प्रभाकर या चौघांच्याही लावण्या आहेत. उत्तर हिंदुस्थानांत राधा–कृष्णाची भक्ति जितकी उत्कटतेनें आहे तितकीच महाराष्ट्रांतील धार्मिक संप्रदायांत विठ्ठलभक्ति उत्कट आहे. रखुमाईला महाराष्ट्रांत मिळालेलें महत्त्व केवळ विठ्ठलाची अर्धांगी यापलीकडे फारसें नाहीं. उलट महाराष्ट्रीय संतांविषयींच्या आख्यायिकांत विठ्ठल आणि त्याचे भक्त यांच्यामधील प्रेमाचा रखुमाईला हेवा वाटत असल्याचें दिसतें. कृष्णाचें राधेवरील प्रेम आपणांस मिळावें या इच्छेनें राधाकृष्णांच्या महाराष्ट्राबाहेरील भक्तांना राधेसारखा स्त्रीवेष घेऊन तरी देवाला खूष करण्याचा प्रयत्न करावा असें वाटतें. परंतु महाराष्ट्रीय संतांनी विठ्ठलाला अशी जबरदस्त मोहिनी घातली आहे कीं, विठ्ठलाचा एखादा प्रेमाचा शब्द लाभावा म्हणून प्रत्यक्ष रखुमादेवी सुद्धां तुकारामाच्या जहांबाज जिजाईचे वाग्बाण सोसण्यास तयार होते; आणि सखूची भक्ति प्रत्यक्ष विठोबालाच स्त्रीत्व देऊन तिच्या भ्रताराची व सासूसासऱ्याची सेवा करावयास लाविते. ईशप्राप्तीकरितां स्वतः स्त्रीवेष न घेतां उलट विठोबाला विठाई बनविण्याचें महाराष्ट्रांतील जुन्या संतांचें सामर्थ्य शाहिरांत सुद्धां वसत असल्याचें ' गे माझे पाडसे सांवळे ऊठ कृष्णाबाई । ' या होनाजीबाळाच्या भूपाळीच्या चरणांत दिसून येतें. स्त्रीवेष धारण करण्याची अलीकडे कित्येक महाराष्ट्रीय संतांची आवड आणि विलासकाळी

स्त्रीजनोचित वेष आणि चेष्टा करण्याची प्रभाकरानें वर्णिलेली दुसऱ्या बाजी-रावाची आवड यांतील साम्य महाराष्ट्रांतील पौरुषाच्या ऱ्हासाचें निदर्शक चिन्ह होय ! खडकाळ आणि डोंगराळ अशा मराठी मुलखांत उत्तरेकडील दरबारी थाटाचें राधाकृष्णाचें मैदानी प्रेम फैलावलें नाहीं. भागवत कथेला अनुसरून कृष्णाच्या गोकुळांतील लीला महाराष्ट्रीय कवींनीं गायिल्या; परंतु महाराष्ट्रीय संत भक्तीच्या भरांत देखील राधेच्या पायीं लागले नाहीत; पंढरपुरीं विठोबा–रखुमाई कशीं आलीं त्याची कथा प्रभाकरानें सांगितली आहे. 'कोण एके दिवशीं नटनटून आली राधा नग लेवुनी, अवलोकुन भगवान बैसले अंकावर घेउनी। रुक्मिणीस साहिना गेली सगळेंच दुःख पिउनी. कितीक सख्या सांवरिती स्वहस्तीं मंदिरांत नेउनी। करुनि जिवाचें रान निघाली चरणीं भाळ ठेवुनी, अति संतापें श्रमुनि राहिली ही दूर वनीं येउनी। घेऊन शुद्ध वैराग्य चालली पाहात प्राणवल्लभा ॥ हरी आलिंगुनि धरी विनोदें सकल वेग साहुनी, शब्दांचा सये निकर करुन कां आलिस आण वाहुनी। सोळा सहस्र जरि सुरुप रुक्मिणी तूं वरिष्ठ त्यांहुनी, अंतःकरणापासुन अवडंबरें घेतलेंस पाहुनी। पुंडलिकाची भक्ति उभयतां निष्कलंक पाहुनी। सुखावलें मन तिथेंच केला मुक्काम उभें राहुनी। भावार्थाचा परम भुकेला जात असो आशुभा ॥ चंद्रभागेचे तिरीं विटेवर कटिं कर ठेवुनि उभा, भक्तांचा कैवारी सांवळा त्रैलोक्याचा सुभा ॥'

प्रभाकरानें वरीलप्रमाणें पंढरीची कथा सांगून भीमातट,वाळवंट,यात्रा यांचें थोडक्यात वर्णन केलें आहे. त्यापुढील साधूंचें व पांडुरंगाचें वर्णन केलें आहे तें असें:—'ध्वजा पताका सोडुनि साधू नाचतात देवळीं, चरणीं रूळ, करिं चिपळया, वदति मुखानें नामावळी। पीतवसन कासेस कसुनी वर शालजोडी पीवळी, तुळसीहार शुभ आपाद मिरवे तनु सुंदर कोंवळी। धर्माघरीं जी काढि हातानें उच्छिष्ट पत्रावळी। तीच मूर्त ही विटेवर नटली घनःश्याम सांवळी। जन्मोजन्मींचें दुःख विसरलों पाहुन मुखाची प्रभा ॥ चंद्र० ॥' यापुढील वर्णनात कोणी प्रातःकाळची पंचारति ओवाळतात, लिंबलोण उतरतात, चामरें ढाळतात, न्हाण घालतात, श्रृंगारतात आणि पंचामृताचा नैवेद्य दाखवितात इतकेंच सांगितलें आहे. 'प्रभाकराचें कवन ऐकुनी मान डोलवी सभा।' इतके गर्वोद्गार काढण्याइतकें हें वर्णन सुरस नसलें तरी उठावदार वर्णन करण्याची प्रभाकराची हातोटी यांत थोडीशी दिसून येते.

भूवैकुंठ म्हणून गाजलेल्या या तीर्थाचें वर्णन करण्यासाठीं प्रभाकर, परशुराम, होनाजी आणि रामजोशी या चौघांही शाहिरांनीं आपली करामत खर्चिली आहे.

परशुराम म्हणतो, 'साक्षात देव पंढरी दिगंबर मूर्ति। जडमूढां तारितो रोकडा त्तींतूर्ती ॥' हें पंढरीचें झटपट मोक्षदायित्व वर्णून पंढरीचें अक्षयत्व सांगतो कीं, 'जेव्हां नव्हती चराचर पंढरी होती। भूवैकुंठ हें अविनाश निवडिलें संतीं। ब्रह्मांड जळून होती रक्षा प्रळया अंतीं। तेव्हां सुदर्शनावर अभंग आक्षय रहाती। ×××। झालीं कितीक युगें न कळे कोणाला गणती।' पुढें वारकरी सांप्रदायाच्या संत चौकडीचें वर्णन तुकारामाच्या अभंगांप्रमाणेंच तंतोतंत आहे, तें असें:—'जो ज्ञानेश्वर तो विठ्ठल मूर्तिमंत। बोलाविले वेद रेड्यामुखीं चालविली भिंत। बारा वर्षे वाहिलें पाणी नाथाघरीं तंत। स्वर्गीचे आणिलेपितर ,करुनि जिवंत। उठविलो गाय नामयाची धाद्दांत। देऊळ फिरविलें अजून आहे साक्षांत। तुक्याच्या तारिल्या वह्या करूनि प्रीत। वैकुंठीं लाविल्या ध्वजा अजुनि जन झरती ॥' यापुढें 'बोधल्याचें शेत,' 'दामाजीची रसीद' 'गोऱ्याचें बाळ आणि हात' 'मिराबाईचें विष' या चमत्कारांची यादी देऊन, 'ज्यानें जैसें घ्यावें तैसी प्रचीत। खळ कुटाळाशीं सहसा नसे स्वप्नांत।' असें तात्पर्य काढून परशुराम मोकळा होतो.

होनाजी बाळाच्या लावणींत पंढरीचें वर्णन फारसें नसून पंढरीनाथाचा महिमा गायिला आहे. 'निशिदिनिं तिष्ठत भक्तांचा सखा वैकुंठपुरींचा सुभा।' 'हरिनामाचा गजर पताका वाळवटिं फडकती। ठायीं ठायीं कीर्तनीं संत आपणची नटला श्रीपती। ××× श्रोता वक्ता आपण होऊनि रंग कीर्तनीं भरी।' ही होनाजीची कल्पना हृदयंगम असून हरिदासाच्या रूपानें विठ्ठलच 'कोठें सांगे ब्रह्मज्ञान, कोठें राजनीति, कोठें प्रपंच वित्पत्ति, कोठे गोकुळांतील बाळपणाच्या स्थिति, कोठें गोपींचे विषय प्रेमयुक्त बहुधा रीति,' अशा वर्णनानें ती कल्पना सजविली आहे. 'कृतयुगांत ध्यान, त्रेतायुगांत यज्ञ, द्वापारांत राजोपचार' असें अर्पण करूनही 'परब्रह्म सांवळे' 'याची पदप्राप्ति नये;' पण कलियुगांत 'नामीं धरितां आवडी। दर्शनीं मुक्ती रोकडी। तो गोपाळांचा गडी। आठवितां घडोघडी। देतसे पद अचल अंबरीं।' असें 'होनाजीबाळा म्हणे, तरी रमवा निजहृदयमंदिरीं ॥'

परशुरामाप्रमाणें रामजोशांनीं पुराणांतरींचें पंढरीमहात्म्य देऊन किंवा संतांचे चमत्कार गाऊन आपलें वर्णन भरून काढलें नाहीं. होनाजीबाळाप्रमाणें त्यांनीं केवळ पांडुरंगाचें महात्म्य गाइलेलें नाहीं. आणि प्रभाकराप्रमाणें कृष्णमहात्म्य सांगून, पंढरीची कथा देऊन किंवा पांडुरंगाचें आणि नित्य पूजाक्रमाचें वर्णन करूनही रामजोशी समाधान पावले नाहींत. रामजोशांची लावणी म्हणजे पंढरपूर क्षेत्राचें शिस्तवार, व्यवस्थित, व्यापक आणि सुरस असें वर्णन आहे.' क्षमातळीं इज समान नाहीं उमामहेश्वर पुरी। पुरी पडेना काशी मग इतर दासी न कोण असी हो पंढरी ॥' हें वारकरी पंथाला वाटणारें पंढरीचें महत्त्व त्यांनीं सुरवातीसच सांगितलें. त्यानंतर ' पांडुरंग जगद्‌तरंग जीमाजी रंगला धणी।' या चरणांत 'जगद्‌तरंग' या एकाच शब्दांत पांडुरंगाचें महात्म्य गाऊन, तो जिच्यांत रंगला ती पंढरी किती श्रेष्ठ ? हें पर्यायानें ध्वनित झालेंच ! इतकें झाल्यावर रखुमाई, राई, व्यंकटेश, दक्षिणद्वारचा गणपति, बाळकृष्ण, अतिवामा सत्यभामा, केदारलिंग, गरुडस्तंभ, मारुति, गरुडपार वगैरे देवता व स्थानें यांचें वर्णन थोडक्यांत दिलें आहे. त्यांतही कोठें 'भामा अतिवामा विभूच्या नायिकांत हिरकणी ! ' ' दार धरुनि सरदार उभा केदारलिंग अंगणीं ' वगैरे त्रोटक, पण खुबीदार वर्णनाचे प्रकार आहेतच. 'हा मंडप नोहे विमानवर थाटला । × × । कीं भवार्णवीचें गलबत मज वाटला। × × × । क्षण यामधिं शिरतां वाटे भव आटला।' हें मंडपाचें केवळ वर्णन नसून त्यांत शिरणाऱ्या भक्तांच्या मनोभावनांचें चित्र आहे. महाद्वार आणि चौघडा या वर्णनांतून सुटला नाहीं. चोखामेळ्याचें वर्णन मागें आलेंच आहे. ' रुका वेंचितां दुकान जवळिंच बुका माळ लाघवी। देति माळिणी ' ही माहिती देण्याची विनोदी चुणुक मध्येंच चमकते. ' जे महार्णवाची जगदद्भुत कामिनी ती भीमरथी या स्थळीं दक्षिणगामिनी। श्री शंकरजीची शिरोवंद्य स्वामिणी ! ' यांत भीमा व गंगा यांची एकात्मता ध्वनित होते. प्रदक्षिणेचें वर्णन ' लोट घेति पोट खरडति, **ओंठ भजनिं हलविती** । नवे भागवत थवे प्रदक्षिण-सवें किती धांवती। पंगु लागती रांगूं, किती सांगूं आंधळे भुजभुजा कवटाळिती।' असें केलें आहे. त्यांत ओंठ हाललेले दिसतात, पण शब्द तेवढे भजनाच्या दणक्यांत जिरून ऐकूंच येत नाहींत, ही व्यंजना आहेच ! ' फळांत किंवा जळांत, तुळसीदळांत वशता खडी। 'असें पंढरींतील फळ,

पाणी किंवा पान यांचें महात्म्य आहे. देव तेथें असल्यामुळें 'ती वैकुंठींची-पेठ वोस हांकिली ।' 'ही अपरा द्वारावती ठाकिली' पण द्वारकेबरोबर गोकुळही येथेंच आहे, 'मंडळी व्रजांतिल कोठें नच फांकली ।' वासुदेव देवकी, नंद वगैरे गुप्त रूपानें आहेत त्यांचा पत्ता लागला नाहीं; परंतु 'येती राउळीं अवघे ते बडवे यांचे गोप; गोपिका घरीं !' हा रामजोशांनीं लाविलेला शोध मनास कसा काय पटतो तें पंढरीच्या यात्रेकरूंनीं पाहून घ्यावें ! आषाढांतील पावसाचा पूर वर्णनांत वाहत आलाच ! 'भूवैकुंठ 'असें ठराविक वर्णन न करितां रामजोशी म्हणतात, 'फार वदात्रें काई ही बाई वैकुंठींचा मालवी दिवा !' इतकें वर्णन करून 'नारदमुनिला कवटाळुनि बाहुनीं !' 'गोपाळपुरीं मग दधिकाला लाहुनी !' जोशीबुवा म्हणतात, 'पृथ्वींत पंढरी एकच घ्या पाहुनीं !' इतकें व्यापक, समर्पक काव्यमय वर्णन केल्यावर 'पायीं धरिल कविराय दुजा अशी काय लावणी करी । माय कुणाची व्याली या गगनाखालीं कविता सोलापुरी ? ।' असा सवाल रामजोशांनीं टाकिला हा त्यांचा अभिमान अनाठायीं आहे असें म्हणणें किती चुकीचें आहे ?

रामजोशी आणि प्रभाकर यांची तुलना करावयाची असेल तर दोघांच्याही एकाच विषयावर, जवळ जवळ सारख्याच शब्दांच्या व भावनांच्या लावण्या आहेत. त्यांत प्रभाकरानें रामजोशांचें उघड अनुकरण केलें असतांही त्याला पदलालित्य, शुद्धता आणि स्वभावानुकूल वर्णन करण्याची हातोटी साधलेली नाहीं, हें पुढील विवेचनावरून कळून येईल.

रामजोशांच्या लावण्यांत 'पाहून सख्या मी भुललों रमलों अघटित करणी ब्रह्माची ॥ नार नवी तरुणी काय सांगुं रमणी जशी नागिण देवाघरची ॥' अशी लावणी आहे; तिच्या शेवटीं 'शाहिर धोंडीनें केली पाही लावणी बहार कुणा कविची ? घडेल तरी मी कच्च्या घड्यानें वाहिन पाणि शपथ साची ॥' अशी प्रतिज्ञा आहे. त्यावरून ही धोंडी शाहिराची लावणी असूं शकेल; परंतु रामजोशांनीं कित्येक लावण्या धोंडी शाहिराच्या नांवावर केल्या होत्या; व या लावण्यांतील शब्दवैभव व कल्पना हीं रामजोशांच्या रचनेशीं जुळतात. तसेंच 'साजणी समयिं घरधणी नसत किती उणी, छावणी अजुनि कुणिकडे' ? या लावणीशीं वरील लावणीचें फार साम्य आहे आणि 'साजणी समयिं घरधणी' या लावणीच्या शेवटींहीं अशीच प्रौढी

कवीनें मारली आहे कीं, 'कविराज काव्य सिरताज, करिल कुणी आज याजहुनि साज निवळ चोखडें। तरि आदर, नाहिं तरि संदर, भरावें उदर, विकुनी लाकडें॥' अशा प्रकारचें या दोन्ही लावण्यांतही साम्य आहे शालिग्रामांनीं रामजोशांच्या लावण्यांत त्यांच्या नांवावर भलत्याच कवीच्या लावण्या दडपून दिल्या आहेत त्यांची यादी रा. यशवंतराव केळकरांनीं दिली आहे. या यादींत 'पाहून सख्या' ही लावणी नाहीं. त्या अर्थी ती रामजोशांचीच असावी असें त्यांचेंही मत असल्याचें दिसतें.

जोशीबुवांच्या या दोन्ही लावण्यांचें अनुकरण प्रभाकरानें 'स्वरूप रूप सवाई गेली फार आवाई जशि स्वच्छ हवाई सुटली। चाले कांहीं, मागें पाही, उभी राही ठायीं ठायीं, अमोल नार नटली॥' या लावणीत केलें आहे. या लावण्यांवरून दोन्ही कवींची तुलना करतां येईल.

'चटपट अणवट, जोडव्यांची झटपट, दाहि बोटीं मेंदि रंगली। वदन-रदन, रंगितमदन, तिचे रति सख्या जणूं बुंद खुलली॥' या रामजोशांच्या चरणांशीं प्रभाकराच्या वर्णनांतील 'जोडव्यांचीं सणसण, मासोळ्यांची झणणण, दणणण, पाय धमके। मोठ्या आनंदांत, मदनाच्या फुलांत, खूब छदांत ठमके॥' हे चरण ताडून पाहाण्यासारखे आहेत. 'नयनाचे मारी बाण,' 'नयनाचे हाणी भाले' हें दोघांच्या लावण्यांतील साम्य कदाचित् कल्पना-सादृश्यामुळें असेल; परंतु 'देउनि उदंड धन, मोहवूनि तिचें मन × × ×। पाहुनि तियेसि मग झाला गडि डगमग, तगमग सुटलि तया॥' यांतील कल्पना व शब्द आणि 'वेडे झाले जन, इणें मोहून मन, धनपतिची मति खुटली॥' यांतील सादृश्य केवळ आकस्मिक असेलसें वाटत नाहीं. प्रभाकराचे ध्रुपदांतील 'स्वच्छ हवई सुटली। × × अमोल नार नटली॥' हेच शब्द रामजोशांच्या लावणीच्या पहिल्या चौकाच्या अखेरीस 'बहु झटक्यानें नटली। जशी हवयी सुटली॥' असे आले आहेत. रामजोशानें वर्णिलेली स्त्री पण्यांगना आहे. 'नयनाचे मारी बाण, सख्या गेला होता प्राण' हें वर्णन तिच्याविषयीं विसंगत नाहीं. परंतु 'हिच्या भ्रताराचें धन्य भाग्य, व्यर्थ वैराग्य, अशी सौभाग्यवती वरली। काय केलें त्यानें तप, गार नव्हे महाजप, जपुन पणीं धरली। त्याचेंच हें फळ, झालें सुफळ, सखी फोफळ फळीं भरली॥' अशी 'वय बारा तेरांत, आली ऐन भरांत, नाहीं

पाणी किंवा पान यांचें महात्म्य आहे. देव तेथें असल्यामुळें 'ती वैकुंठींची-पेठ वोस हाकिली।' 'ही अपरा द्वारावती ठाकिली' पण द्वारकेबरोबर गोकुळही येथेंच आहे, 'मंडळी व्रजांतिल कोठें नच फांकली।' वासुदेव देवकी, नंद वगैरे गुप्त रूपानें आहेत त्यांचा पत्ता लागला नाहीं; परंतु 'येती राउळीं अवघे ते बडवे यांचे गोप; गोपिका घरीं!' हा रामजोशांनीं लाविलेला शोध मनास कसा काय पटतो तें पंढरीच्या यात्रेकरूंनीं पाहून घ्यावें! आषाढांतील पावसाचा पूर वर्णनांत वाहत आलाच! 'भूवैकुंठ'असें ठराविक वर्णन न करितां रामजोशी म्हणतात, 'फार वदावें काई ही बाई वैकुंठींचा मालवी दिवा!' इतकें वर्णन करून 'नारदमुनिला कवटाळुनि बाहुनीं!' 'गोपाळपुरीं मग दधिकाला लाहुनी!' जोशीबुवा म्हणतात, 'पृथ्वींत पंढरी एकच घ्या पाहुनीं!' इतकें व्यापक, समर्पक काव्यमय वर्णन केल्यावर 'पायीं धरिल कविराय दुजा अशी काय लावणी करी। माय कुणाची व्याली या गगनाखालीं कविता सोलापुरी?।' असा सवाल रामजोशांनीं टाकिला हा त्यांचा अभिमान अनाठायीं आहे असें म्हणणें किती चुकीचें आहे?

रामजोशी आणि प्रभाकर यांची तुलना करावयाची असेल तर दोघांच्याही एकाच विषयावर, जवळ जवळ सारख्याच शब्दांच्या व भावनांच्या लावण्या आहेत. त्यांत प्रभाकरानें रामजोशांचें उघड अनुकरण केलें असतांही त्याला पदलालित्य, शुद्धता आणि स्वभावानुकूल वर्णन करण्याची हातोटी साधलेली नाहीं, हें पुढील विवेचनावरून कळून येईल.

रामजोशांच्या लावण्यांत 'पाहून सख्या मी भुललों रमलों अघटित करणी ब्रह्माची॥ नार नवी तरुणी काय सांगुं रमणी जशी नागिण देवाघरची॥' अशी लावणी आहे; तिच्या शेवटीं 'शाहिर धोंडीनें केली पाही लावणी बहार कुणा कविची? घडेल तरी मी कच्या घड्यानें वाहिन पाणि शपथ साची॥' अशी प्रतिज्ञा आहे. त्यावरून ही धोंडी शाहिराची लावणी असूं शकेल; परंतु रामजोशांनीं कित्येक लावण्या धोंडी शाहिराच्या नांवावर केल्या होत्या; व या लावण्यांतील शब्दवैभव व कल्पना हीं रामजोशांच्या रचनेशीं जुळतात. तसेंच 'साजणी समयिं घरधणी नसत किती उणी, छावणी अजुनि छुणिकडे'? या लावणीशीं वरील लावणीचें फार साम्य आहे आणि 'साजणी समयिं घरधणी' या लावणीच्या शेवटींहीं अशीच प्रौढी

कवीनें मारली आहे कीं, ‘ कविराज काव्य सिरताज, करिल कुणी आज याजहुनि साज निवळ चोखडें । तरि आदर, नाहिं तरि संदर, भरावें उदर, विकुनी लाकडें ॥ ’ अशा प्रकारचें या दोन्हीं लावण्यांतही साम्य आहे शाळिग्रामांनीं रामजोशांच्या लावण्यांत त्यांच्या नांवावर भलत्याच कवीच्या लावण्या दडपून दिल्या आहेत त्यांची यादी रा. यशवंतराव केळकरांनीं दिली आहे. या यादींत ‘ पाहून सख्या ’ ही लावणी नाहीं. त्या अर्थी ती रामजोशांचीच असावी असें त्यांचेंही मत असल्याचें दिसतें.

जोशीबुवांच्या या दोन्ही लावण्यांचें अनुकरण प्रभाकरानें ‘ स्वरूप रूप सवाई गेली फार आवाई जशि स्वच्छ हवाई सुटली । चाले कांहीं, मागें पाही, उभी राही ठायीं ठायीं, अमोल नार नटली ॥ ’ या लावणीत केलें आहे. या लावण्यांवरून दोन्ही कवींची तुलना करतां येईल.

‘ चटपट अणवट, जोडव्यांची झटपट, दाहि बोटीं मेंदि रंगली । वदन-रदन, रंगितमदन, तिचे रति सख्या जणूं बुंद खुलली ॥ ’ या रामजोशांच्या चरणांशीं प्रभाकराच्या वर्णनांतील ‘ जोडव्यांचीं सणसण, मासोळ्यांची झणणण, दणणण, पाय धमके । मोठ्या आनंदांत, मदनाच्या फुलांत, खुब छंदांत ठमके ॥ ’ हे चरण ताडून पाहाण्यासारखे आहेत. ‘ नयनाचे मारी बाण, ’ ‘ नयनाचे हाणी भाले ’ हें दोघांच्या लावण्यांतील साम्य कदाचित् कल्पना-सादृश्यामुळें असेल; परंतु ‘ देउनि उदंड धन, मोहवूनि तिचें मन × × × । पाहुनि तियेसि मग झाला गडि डगमग, तगमग सुटलि तया ॥ ’ यांतील कल्पना व शब्द आणि ‘ वेडे झाले जन, इणें मोहून मन, धनपतिंची मति खुटली ॥ ’ यांतील सादृश्य केवळ आकस्मिक असेलसें वाटत नाहीं. प्रभाकराचे ध्रुपदांतील ‘ स्वच्छ हवई सुटली । × × अमोल नार नटली ॥ ’ हेच शब्द रामजोशांच्या लावणीच्या पहिल्या चौकाच्या अखेरीस ‘बहु झटक्यानें नटली । जशी हवयी सुटली ॥ ’ असे आले आहेत. रामजोशानें वर्णिलेली स्त्री पण्यांगना आहे. ‘ नयनाचे मारी बाण, सख्या गेला होता प्राण ’ हें वर्णन तिच्याविषयीं विसंगत नाहीं. परंतु ‘ हिच्या भ्रताराचें धन्य भाग्य, व्यर्थ वैराग्य, अशी सौभाग्यवती वरली । काय केलें त्यानें तप, गर नव्हे महाजप, जपुन पणीं धरली । त्याचेंच हें फळ, झालें सुफळ, सखी फोफळ फळीं भरली ॥’ अशी ‘ वय बारा तेरांत, आली ऐन भरांत, नाहीं

शहरांत अशी दुसरी ॥' म्हणून जिचें वर्णन प्रभाकरानें केलें तिच्याचसंबंधानें, 'जेव्हां मारी डावी हुल, तेंव्हां करी चुकभूल, पुरुषाचें फुल घसरी ॥ × × × । अशी आहे मोठी नट × × आली चांगट कुठली ॥ न्हुकुण किती करतात खुण, कुणी हांतरुण घरीं पसरी ॥' असें वर्णन करणें म्हणजे त्याच्या अप्रयोजकपणाची कमाल आहे. प्रभाकराच्या अशा अप्रयोजकपणाचे मासले त्याच्या कवितेचे विवेचन करतांना येतीलच. रामजोशांच्या काव्यांत असा विसंगतपणा नाहीं. विरहिणी अत्यंत उत्कंठित झाली आहे, 'समयिं घरधणी नसत,' 'चट उठावल्या घनपटा, पटपटां पडति बिंदु,' अशा मेघवर्षावामुळें 'आतां पूर नद्यांसि भरपूर येईल मग शूर कसा येतो घरा?' असा प्रश्न पडलेला! अशा वेळीं 'हा विलास गडे दिलखुलास पसरुनि फुलास पतिसम तुला सहित कधिं घडेल?' असा प्रश्न सखीनें केला असतां, 'मला पाय पतीचे सदुपाय गडे ग! त्याचें काय मजविण अडेल!' असाच रामजोशांची नायिका जबाब देते. या पवित्रतेचें फळ म्हणून 'तिची रती सबळ भगवती पावली होती' म्हणून 'तिचा पति अचानक आला। × × ×। होतिं मायबाप करित हायहाय, धरुनि त्यांचे पाय महालीं गेला। झाली भेट, बसविलो पेट सुखाची, लोट भेटला तिजला। × × × गळां पडुनि खळखळां रडलि वेल्हाळा गहिंवर आला। मग झाली पतिकरकर्षित, मनीं बहु हर्षित, × × दर्शित हेत पुरवला ॥' हें वर्णन किती शुद्ध आणि समयोचित आहे?

संभोगशृंगाराचें वर्णन करतांनाही रामजोशी सभ्यतेचा अतिक्रम सहसा होऊं देत नाहींत. 'असो त्याणें रुजु धरली। मग सदयपणें अनुसरली। करिं धरुन सुहृज्जन फुलवाडीमध्यें शिरली। मनाची गति पुरली। सांगाया गोष्ट नाहीं उरली। आनंदजळें दोघांचीं लोचनें भरलीं। रसामध्यें तरतरलीं। कांहीं दिवस होतिं अंतरली। × × ×। विषय तरी रतिजोगा। असा विरळ एकादे जागा। कविराय म्हणे तें प्रेम घरोघरीं कां गा? ॥' ह्या वर्णनांत अगदीं साध्या शब्दांत बहार साधली आहे! प्रभाकराचें काव्य याच्या उलट अतिशय उत्तान आहे.



# अक्रूर.

'अक्रूर' हें गाणें मराठी कवींच्या फार आवडीचें आहे. 'अजि अक्रूर हा नेतो श्रीकृष्णाला। सखि काळ कोठुनि ग आला!' हें गाणें महाराष्ट्रांतील मुलींबाळींच्या तोंडीं रुळलें आहे. श्रीकृष्णावर पाठविलेल्या मोठमोठया असुरांचा त्यानें संहार केल्यावर, त्याला गोकुळांतून मथुरेस आणून त्याचा घात करण्याचा बेत कंसानें केला; तेव्हां बळिराम व कृष्ण यांना आणण्याचें काम यादवांचा पक्षपाती अक्रूर याजवरच सोंपविलें. शिवाजी महाराजांना दिल्लीस पोहोंचविण्याचें कार्य औरंगजेबानें राजा जयसिंगाकडे दिलें; तसाच कांहींसा हा प्रकार झाला, अशी आठवण महाराष्ट्राला या शाहिरांच्या वेळीं बहुधा नसेल. पण कृष्णानें गोकुळ कायमचें सोडलें तसें बाजीरावाला पुणें अंतरलें,याची जाणीव परशराम, प्रभाकर आणि होनाजी यांनीं तरी अक्रूराच्या लावणींत दिल्याचा भास होतो. बाजीराव पुण्यास पेशवा होण्यास गेला त्याला ह्या प्रसंगाची उपमा अनंतफंदीनें माधवग्रंथांत दिली आहे. गोकुळास झालेला कृष्णविरह आणि रावबाजीचा पुण्याला वियोग यांच्या प्रभाकरानें केलेल्या वर्णनांत कांहींसें सादृश्य दिसतें. कांहीं संतकवींनींही अक्रूराच्या कामगिरीचें व गोपीविलापाचें वर्णन केलें आहे; परशराम, प्रभाकर, होनाजी, रामजोशी आणि अनंतफंदी यांच्या अक्रूरावरील लावण्यांचें तुलनात्मक विवरण करून पहाण्यासारखें आहे.

'कोण आला रथवाला नकळे कपटी त्या रुपाचाई। त्वरें चला पुसूं यश्वदेला कुठें तरी हरी आमुचाई।' अशा जिज्ञासेनें तपास केल्यावर कंसानें हरीला कां बोलवून नेलें याचा परशरामाच्या गोपींना सहज उलगडा होतो. 'धनुर्याग कंसानें मांडिला, वैरी तो मुळचाई। अक्रुर मनचा निष्ठुर इतुका आला स्नेही त्याचाई।' हें कळतांच कृष्ण आतां कायमचा अंतरला! गोकुळाचें वैभव लयाला गेलें! हें त्यांना कळून येतें. यापुढें 'गोपाळ गोधनें होतिल देशोधडी। मंजुळ मुरलीविण भयाण यमुना थडी।' ह्या जाणिवेनें 'कसें वढवलें कर्म हीन' अशा विचारांत पडून केवळ गोपीच नव्हे, तर 'तटस्थ अवघें गोकुळ; न घेती पशुपक्षी चाराई।' अशी कृष्णवियोगामुळें झालेली गोकुळाची दैन्यावस्था परशरामानें वर्णिली आहे.

होनाजीबाळाचें वर्णन जास्त विस्तृत व मार्मिक आहे. ' अक्रुर हें नामाभिधान सांगून पाहीं । अक्रुरें निष्ठुरपणें केलि गोकुळांत आप्पाई ( भाऊबंदकी ) । मंदिरामाजि मोहिली यशोदाबाई । रात्रौ समयीं येकांति भोंदिलें भोळ्या नंदाला । सिद्ध केले न्यावया रामहरि या उत्साहाला ॥ ' अशी अक्रुराची कारवाई आहे. या कारवाईला गोपी फसल्या नाहींत. त्या रथाला आड आल्या; पण अक्रुरानें त्यांना न जुमानतां रथ नेलाच. " प्रपंचवणव्यामधून वांचविणारा मेघ ' यशोदेच्या घरांत जन्मलेला पाहून सर्व गोपींना आनंद होतो, तोंच अक्रुररूपी वाऱ्यानें त्या मेघाला वळवून भलतीकडे नेलें; गिरिकांतारांत सांपडलेल्या आंधळयांची ' अक्रूर तस्करें नेली करींची काठी मुरारी, हा केवढा अनर्थ केला ! "अशा रूपकांनीं गोपींचें दु:ख होनाजीनें वर्णिलें आहे. कैकयीनें रामाला वनवासास धाडिलें त्याची त्यांना आठवण होते. कृष्णाला नेऊन अक्रुरानें ' गोकुळाच्या जनास दिधली प्रेतदीक्षा ' असें त्यांना वाटतें. पुढें अनेक वर्षांनीं या दुःखाचें वर्णन एकमेकींजवळ यमुनातीरीं करीत असतां ' घन सांवळा, कटी पितांबर असा कृष्णासारखा कृष्णभक्त उद्धव ' याला पाहून, तो कृष्णच आपल्या कळवळयामुळें परत आला व 'मरत्यास दिधली अमृतसंजीविनी ' असें वाटून त्या जवळ येऊन न्याहाळून पाहातात तों उद्धव दृष्टीस पडतो ! उद्धव पुढें त्यांना बोध करितो. तें होनाजी बाळानें दुसऱ्या एका लावणींत वर्णिलें आहे. ती लावणी फारच सरस आहे. ' श्रीपती तुम्हांवेगळा नाहीं. सागर एकच; तरंग मात्र निराळे ! रांजणांत व घागरींत दिसणारीं प्रतिबिंबें एकाच सूर्याचीं ! कृष्ण तुमच्याजवळच आहे, मग तुम्ही कां वाहवतां ? या उद्धवाच्या वेदांतास गोपी उत्तर देतात, " जे बसले असतील वनीं नागवे उघडे । हें ज्ञान तुझें उद्धवा कथीं त्यांपुढें । दाखवीं आम्हांला सगुण सांवळें रुपडें । " त्या अगदीं निकरावर येतात व सांगतात, " जाउनि मथुरेसी सांग तयाला सत्य । हरि ! तुझ्या वियोगें गोपी पावल्या मृत्य । टाकिली रक्षा यमुनेमधिं जाळुनि प्रेतें । त्या उदकें करीव आंचुळी, आणुनि हरि येथें । मुरलीध्वनि करीव येकदां जाळल्या तेथें । धाडिलें तुला पहाया गोपींचीं चित्रें । ' ही होनाजीची लावणी अक्रुरावरील लावणीला पूरक असून फारच अंतर्भेदी आहे !

प्रभाकराचा अक्रुर वरील दोन्हीं लावण्यांच्या मानानें फिक्का पडतो. ‘ कोणी जाउनियां रथ फिरवा, अहो बाई, ’ असें परस्पर कोणाला तरि अक्रुराचें मन वळविण्यास त्याच्या गोपी सांगतात. हरीकरितां प्राण देण्याची प्रभाकराच्या गोपींची तऱ्हा मोठी विचित्र आहे. त्या म्हणतात, ‘ गळेकापून या यमुनेंत उडया घेऊं । ’ अगोदर ‘ गळे कापून ’ नंतर ‘ या यमुनेंत उडया घेऊं !’ ही दिलेली धमकी ऐकून, अक्रुराचें मन अगोदर वळलें असतें तरी गळा कापल्यावर नदींत उडया घेण्याचा चमत्कार त्या कसा करून दाखवितात, हें पाहाण्याच्या कुतूहलामुळें तें पुन: फिरण्याचा संभव होता. ‘ कोणी आणुनि आम्हालागीं सखा दावा ! ’ म्हणून धावा करीत ‘ धाई धाई अधोवदनानें ’ रडणाऱ्या अशा प्रभाकराच्या गोपी आहेत.

रामजोशांच्या या कृष्णविरहावर तीन लहान लहान लावण्या आहेत. ‘ हरि मथुरेला आजि कां गडे जातो ? कांहीं कळेना कधिं परतुनि येतो ! ’ तो कधींना कधीं तरी परत येणार असें पहिल्यानें त्यांना वाटतें; परंतु पुढें कृष्ण कायमचा आपल्याला अंतरला, हें उमजल्यावर त्यांना पश्चात्ताप होतो कीं, ‘ अक्रुर मेला, त्याला पाहुनि भ्यालों । कांहीं सुचेना दंग झालों ।’ आतां ‘हरिवांचुनि मेलों । दंडधराच्या ( यमाच्या ) घरीं गेलों ।’ दुसऱ्या लावणींत, कंसानें मसलत करून कसें फसविलें हें त्यांना नंतर कळून येतें. ‘हरि वंचुनि नेला बाई । आतां करूं मी काई । अक्रूर कशाचा मेला । यानें घातचि केला । नच पुसतां गेला । हरविला फुलांचा झेला ॥’ ‘बाई मसलत या कंसाची । कांहीं आहे साची ।’ हें फार उशिरां उमजल्यामुळें ‘गाळांत फसविल्या गाई ।’ अशा गोपींची दशा फार कष्टप्रद होते. ‘काय करूं । कुणाला पाहूं । कोणाच्या घरीं गेला असेल तथून हांक मारून आणूं । किती विरह साहूं ।’ अशा बावरल्या सारख्या होऊन त्या सुखाशेवर पाणी सोडतात. शेवटीं कृष्ण कायमचा अंतरला हें पक्कें समजून तिसऱ्या लावणींत त्या म्हणतात, ‘आतां काय आम्हीं हरिवांचून राहूं ? ××× । प्राण चालला गे साजणी । आतां मेलों; सोसेना जाचणी ।’

रामजोशांनीं वर्णिलेल्या गोपींची फसगत झालेली आहे. कृष्ण गेला, तेव्हां तो कायमचा गेला हें त्यांना कळलेंच नाहीं ! पुढें कळलें तेव्हां त्यांचा जीव जड झाला ! ही मन:स्थिति या तिन्हीं लावण्यांत रंगविली आहे.

अनंतफंदीची अक्रुरावरील लावणी त्याच्या इतर काव्याप्रमाणें या चौघांहून निराळ्या धर्तीची आहे अक्रुर कृष्णाला मथुरेस नेण्यास आला व कृष्ण कायमचा आतां अंतरणार हें गोपींना कळलें. त्या स्वत: अक्रुराची विनवणी करून सांगूं लागल्या कीं, ' मथुरेशीं नको नेऊं आमुचा प्राण विसांवा। × × ×। अक्रुरा याविना गोपी धृतराष्ट्र; न दिसे कांहीं। या हरिवांचुनि आम्हीं मृत्यु पावलों लवलाही। अक्रूर पण तुम्हीं क्रूर भासतां पोटीं। निष्ठुर या तुमच्या हृदयीं विषाच्या गोटी। आधीं समस्त गोपींचे प्राण वधावे। मग स्वस्तिक्षेम मथुरेशीं हरिला न्यावें॥' होनाजीच्या उद्धवाप्रमाणेंच अक्रुर त्यांना उपदेश करितो कीं, ' हा पुरुषोत्तम सर्वोठायीं आहे, हा कैक प्रळयाग्नी बांधील; तुम्हांला भ्रांति पडली आहे.' त्या उत्तर देतात कीं 'बोललां असत्य। कळलें ये समयी तूं कंसाचा भृत्य।' शेवटीं ' जननी मृत्तिका फाकिती प्रळय झाला। गौळणी कैक प्राशिती विषाचा प्याला॥' या वर्णनांत कांहीं सुंदर उपमा आहेत. गोपींचें प्रेम किती उत्कट आहे तेंही दाखविलें आहे; परंतु एकंदरींत कल्पनेंत चातुर्य किंवा वर्णनांत उठावदारपणा नाहीं. अक्रुरावरील लावण्या पाहिल्यास प्रभाकराची लावणी सर्वांत निकृष्ट आहे; त्याहून अनंतफंदीची लावणी चांगली आहे. परंतु या दोघांहूनही रामजोशी, परशराम आणि होनाजी यांनीं क्रमानें एकावर एक अशी कडी केली आहे. होनाजीची लावणी सर्वांत उत्कृष्ट आहे, हें सांगावयास नकोच.

---

## रामजोशी आणि केळकर.

ठाव लागला नाहीं; ठाव लागेना आस्थेविण॥
जिव मिळल्यावर माहित खुण॥

—सगन.

रामजोशांच्या कवितेवरील आक्षेप रा. यशवंतराव केळकरांनीं एकत्रित केले आहेत. त्यांच्या मतें रामजोशी हा कै. विष्णुपंत चिपळूणकर, भावे, रड्डीशास्त्री वगैरे विद्वानांनीं शेंदूर माखून देव बनविलेला एक दगड आहे.

चिपळूणकरांना रामजोशांची कविता आवडण्याचें खरें कारण चिपळूणकरांच्या भाषापद्धतींत सांपडतें, असा यशवंतरावांचा अभिप्रायआहे. ' मृदुललित किंवा जाडजाड संस्कृत शब्द घालून आपली भाषा भरदार करण्याकडे, सजविण्याकडे, नटविण्याकडे शास्त्रीबुवाचें लक्ष ' होतें. ' संस्कृत आणि प्राकृत व ग्राम्य शब्द यांची त्यांच्या लेखांत सर्रास सरमिसळ सांपडते. ' ' आपल्या दोषांनीं किंवा गुणांनीं युक्त असा कधीं न भेटणारा समानधर्मा भेटल्यामुळें त्यांच्या आनंदाला अलोट भरती आली, ' असा रा. यशवंतरावांचा मुख्य कोटिक्रम आहे. विष्णुपंत चिपळूणकरांच्या भाषापद्धतीसंबंधाचें रा. यशवंतरावांचें मत प्रस्तुत लेखकास पूर्णपणें मान्य आहे. परंतु रामजोशांच्या भाषाशैलीला तें वर्णन लागू पडणार नाहीं, असें त्याला वाटतें. चिपळूणकरांनीं निबंधमाला लिहिली; परंतु एखादें साधें पत्र मराठींत लिहिण्याची त्यांना 'पंचाईत' नको असे. आपली निबंधमाला संस्कृत व इंग्रजी भाषा साधारणपणें चांगल्या रीतीनें जाणणारांसच कळेल अशीही 'माला'कारांची स्वतःची कबुली आहे. रामजोशांची स्थिति तशी नव्हती. मोरोपंतासारख्या पंडितापासून निरक्षर शिपाई–गड्यापर्यंत सर्वच त्याचे श्रोते असत. जसे श्रोते असतील तशी श्रोत्यांच्या मगदुरामारखी भाषा त्याला वापरावी लागे. त्यामुळें त्यानें जशी केवळ संस्कृत काव्यरचना केलेली आढळते; तशीच 'अंबरगत परि पयोधरांतें रगडुनि पळतो दुरी। काय हा धीट म्हणावा तरी!। तो नंदाचा मूल काय गे सांग कन्हय्या हरी ?। नव्हे गे मारुत मेघोदरीं!।' अशी श्लेषगर्भ संस्कृतप्रचुर रचनाही कधीं मिळते; आणि ' रंग सांवळा। सांवळा गडे अंगीं। फिरस्ता किती हा बेढंगी॥ वेणुच्या रवें। रवें हृदय फोडी। वदाव्या किती याच्या खोडी॥ कोंवळ्या मुली। मुली पाहुनी ओढी। गवळ्यास जळो ही गोडी॥' अशी अगदीं साधी व सुबोध लावणीही मिळते.

रामजोशांच्या बहुतेक लावण्या अशाच सोप्या भाषेंत आहेत. ही गोष्ट या लेखमालेंत दिलेल्या अनेक उताऱ्यांवरून दिसून येईल. लावण्यांचे श्रोते बहुधा शिष्ट अशा विद्वानांत त्या वेळीं देखील फार नव्हते. त्यामुळें लावणीची योजना बहुधा निरक्षर लोकांसाठीं असल्यामुळें विद्वत्तेचें प्रदर्शन करण्यास

भावणींत फारसा वाव नव्हता. तथापि, सोपे संस्कृत शब्द व प्राकृत शब्द यांची सरमिसळ मात्र रामजोशांनीं बरीच केलेली आहे. मनांतील अभिप्राय पूर्णपणें दाखविणारा शब्द प्राकृत आहे, त्याला संस्कृत शब्दांच्या पंक्तीस कसा बसवावा अशी शंका रामजोशांच्या मनास कधीं शिवली असेलसें वाटत नाहीं. 'हटातटानें **पटा** रंगवुनि जटा धरिशि कां शिरीं। मठाची **उठाठेव** कां तरी?' '**धना** वयाला बसेल **घसरा** मग विसरा हो गोड खवा। **रांडा-पोरें वंचक चोरें** जंवर मिळवितां तंवर थवा। शिर्ते तंवर ती भुतें भोंवतीं कोण कुणाचा सखा जिवा। जोंवरि पैसा तोंवरि बैसा **मंचकिं** म्हणतिल, घ्याल हवा। बेटाबेटी हातिं **नरोटी** देतिल हा खुप समज ठिवा।' यांत 'पट' 'धन' 'वंचक' 'मंचक' वगैरे संस्कृत शब्दांच्या जोडीस 'उठाठेव' 'घसरा' 'रांडापोरें चोरें' 'नरोटी' हे प्राकृत व ग्राम्य शब्द रामजोशांनीं बेलाशक बसविले आहेत. रामजोशांच्या पोवाड्यांतील 'मजावृष्टि' चिपळूणकरांच्या दयानंद प्रकरणांतील 'चिखल-वृष्टी'ची आठवण कोणास देणार नाहीं? परंतु रामजोशांनीं संस्कृत, प्राकृत व यावनी शब्दांच्या संकरानें केलेला सबगोलंकार त्यांच्या भाषेला किती जोर व अर्थपूर्णता देतो, तें पाहून वर्तमानपत्राच्या 'स्तंभांतून उपस्थित' होणाऱ्या भाषाशुद्धिवीरांच्या डोळ्यांत अंजन पडलें पाहिजे!

रड्डीशास्त्र्यांनीं दोष दाखवूनही रामजोशांची वाखाणणी केली. तशी वाखाणणी करण्यांत रड्डीशास्त्र्यांचा हेतु आत्मप्रौढि मिरविण्याचा असला पाहिजे असें मात्र होत नाहीं. शेक्सपियरच्या नाटकांत व्याकरणाच्या चुका, स्थलविपर्यास, कालविपर्यास, ग्राम्यता, अश्लीलता वगैरे दोष दाखवूनही त्याच्या प्रतिभेनें मोहित होऊन डोलणारे अनेक टीकाकार आहेत. शालिग्रामांच्या चुका दाखवून व त्या गर्ह्य, उद्वेगकारक, अक्षम्य आहेत, असें म्हणूनही प्रत्यक्ष रा. यशवंतरावांनीं आपलें पुस्तक त्यांना 'आदरभावानें' अर्पण केलें आहे. असें करण्यांत रा. यशवंतवांचा उद्देश अप्रामाणिक आहे असें म्हणणें केवळ मूढपणाचें ठरेल. बाह्यत: विसंगत दिसणाऱ्या रा. यशवंतरावांच्या वर्तनाच्या मुळाशीं जी भावना आहे, तीच रामजोशांविषयीं

रङ्गशास्त्र्यांची आहे. त्यांनीं रामजोश्यांचे दोष दाखविले असतांही त्यांच्या प्रतिभेनें व काव्यगुणांनीं त्यांना लुब्ध करावें यांत नवल नाहीं !

महाराष्ट्र सारस्वतकार रा. भावे यांच्यावर रा. यशवंतरावांची कडी नजर असल्याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. भाव्यांना खोटें पाडण्यासाठी ' रामजोश्यांचे पोवाडे अवघे सबंध दोन आहेत ' असें म्हणतांना होळकर-दंग्याचा तिसरा पोवाडा रा. यशवंतरावांच्या नजरेंतून निसटलेला दिसतो. पुणें—वर्णनाच्या लावणींत वीररस नाहीं, दुष्काळ—वर्णनाच्या लावणींत करुणरस नाहीं. असें म्हणून रा. भाव्यांना खोटें पाडण्याचा जो प्रयत्न रा. यशवंतरावांनीं केला आहे तो कसा चुकीचा आहे हें दाखविलेंच आहे. पुण्यांतील रंग व खडर्याची लढाई यांवर रामजोशी, सगन किंवा परशराम यांची एकही लावणी किंवा पोवाडा नाहीं, असें असतां रा. भावे यांनीं तद्विरुद्ध विधान केलें आहे तें चुकीचें आहे, हा रा. यशवंतरावांचा अभिप्राय खरा आहे. रा. भाव्यांनीं त्या संबंधांत वापरलेली भाषा अघळपघळ असून पूर्वापर संबंध ध्यानांत घेऊन योजिलेली नाहीं, असेंच म्हणावें लागतें. रामजोश्यांच्या प्रसिद्ध काव्यांत रंगाचें वर्णन अगदींच नाहीं, असें मात्र म्हणतां येत नाहीं. नानासाहेब पेशव्यांच्या वेळेपासून वाड्यांत रंगाची चाल सुरू झाली होती हें यशवंतरावांनींच दिलें आहे.

कृष्णाच्या होरीचें वर्णन करणाऱ्या ज्या अनेक लावण्या आहेत त्यांचें मूळ चित्र पेशव्यांच्या वाड्यांतील शिमग्याच्या नाचरंगावरून घेतलेलें असावें. वसंतवर्णनाच्या लावणींत ' कुंजांत मधुप गुंजारव यमुनातटीं । होरी खेळतो हरी करुनि राधा नट आपण नटी ॥ ××× । फागामधिं बागांत मातला वसंत अंतःपुरीं ।' असें जें रंगक्रीडेचें वर्णन आहे, त्यांत ' एकमेकींवर टाकिती । कुंकुम अबीर झोकिती । पिचकाऱ्या मुखि मारिती । केशर मृगमद उडविती । ××× । पिचकाऱ्या चिपनळ्या किती । ज्या रासामधिं गुलाब केशरी मृगमद नदी वाहती । ' असें रंगाचें वर्णन आहे. होरीच्या व रंगाच्या सहा लावण्या रामजोश्यांच्या प्रसिद्ध काव्यांत आढळतात. विषयाला अनुसरून त्यांतील शृंगार कांहींसा उत्तान आहे. त्यांतील कित्येकांत

रावबाजीच्या विलासांची चुणूक दिसते. अनंत फंदी व सगन यांच्याही रंगावर लावण्या आहेत.

रामजोशांवरील अत्यंत मोठा आरोप म्हणजे त्याचें वर्तन ! 'तो व्युत्पन्न कर्मठ शास्त्र्याचा मुलगा. पंढरपुरास जाऊन सत्पात्र शास्त्रीपुराणिक बनला पण चिमा किंवा बयाबाईसारखीं प्रीतिपात्रें राजरोस जवळ बाळगण्यास त्यानें कमी केलें नाहीं. त्यानें पाण्यासारखा पैसा मिळविला तरीही पाण्यानें धुतल्यासारखाच तो निर्धन राहिला. तो निर्धन होता, तरी थाटाचा विलासी लवाजमा बाळगावयास त्यानें सोडिलें नाहीं. तो कथाकीर्तनांतून निस्पृह-पणाचा व विरक्तीचा तोंडभर उपदेश करी; परंतु दरदिवशीं उचापती काढतांना लोकांपुढें किंवा सावकारांपुढें तोंड वेंगाडण्यास त्यास लाज वाटत नसे.' अशी रा. यशवंतरावांची रामजोशांवर टीका आहे. बेकन, कालिदास, जगन्नाथराय, शेक्सपियर वगैरेंचीं चरित्रें पाहिल्यास रामजोशांनाच या बाबतींत नांव ठेवण्यास कांहीं विशिष्ट कारण दिसणार नाहीं. तशांतून ते ज्या काळीं झाले, त्या काळचे थोरले बाजीराव, नानासाहेब, नाना फडणवीस वगैरे राज्याचे व समाजाचे शास्ते व विशेषत: शेवटचे रावबाजी आणि त्यांच्या काळची सामाजिक व नैतिक परिस्थिति यांचा विचार केल्यास त्यांना फारसा दोष देतां येणार नाहीं. आज शंभर वर्षे होऊन गेल्यावर त्याच्या काव्याचा विचार करितांना त्यांतील गुणांवर त्याच्या नैतिक खासगी आचरणाची छाया पाडण्याचें तर मुळींच कारण नाहीं. तो लहानपणापासून हूड होता; आणि अगदीं लहानवयांत तमासगिरांच्या फडांत त्याचा प्रवेश झाल्यामुळें स्वैर वर्तन करण्याची जी चटक त्याला लागली ती दूर करण्यासारखी त्या काळची समाज स्थिति नव्हती.

'तूं म्हणशी माझी रामा सुकुमारी गोरटी । परिणामीं तुझिया कामा येईल काय चोरटी ।' या किंवा याहीपेक्षां अभद्र शब्दांनीं स्त्रियांची किंवा विषयांची (रामजोशी) रेवडी उडवीत असे, ' असें म्हणून रामजोशांची स्त्रियां-विषयींची बुद्धि अनुदार होती, असें रा. यशवंतराव दर्शवितात तें चुकीचें आहे. 'सती सुमति, गुणवती, सुकुलजा रतीपरिस चांगली' हें रामजोशांचे

स्त्रीवर्णन मागें दिलेंच आहे. ' हा वसंत ऋतु अनिवार । करि मदनशरांचा मार । × × × नाहीं सये वर्तमान वर्षे झालीं तीन । ' अशा स्थितींतही ' हा विलास पतिविण मजला देतो शीण । ' असें म्हणणाऱ्या पतिव्रतांचीं चित्रेंच रामजोशांनीं बहुधा दाखविलीं आहेत. ' रसिक हो किती चतुर बायका !' 'स्त्री जातीला कोण म्हणत भोळी अथवा भली ।' अशा उद्गारांनीं स्त्रिया कांहीं स्वभावतः मूर्ख नसतात हें मात्र त्यांनीं दाखविलें आहे. रा. यशवंतरावांनीं दिलेल्या उदाहरणासारख्या निवृत्तिपर लावणींत स्त्रिया आणि मुलें हीं परमार्थाआड येणारीं संकटें आहेत असें दाखविलें आहे. ' येऊनियां नर जन्माशीं । कांहींतरी जाण बारे ।' या लावणींत ' तूं म्हणशी माझी रामा' हे वगैरे चरण आहेत. स्त्री आणि संसार यांची निंदा वस्तुतः रामजोशांनीं केलेली नसून त्यांचा जो कीर्तनपुराणाचा व्यवसाय होता, त्या व्यवसायांत आवश्यक असलेल्या हिंदु वेदान्तानें त्यांना ती करावयास लाविली होती. स्त्रिया आणि विषय यांची निंदा तुकारामाच्या अभंगांत याहून कठोर व अभद्र शब्दांत आढळते. त्याचा दोष रामजोशांकडे नसून हिंदूंना प्रिय असलेल्या वेदान्ताच्या शिकवणीकडे आहे. ' स्त्रियांचा तो संग नको नारायणा । काष्ठ वा पाषाणा मृत्तिकेच्या ॥ ' ' स्त्रिया धन बा हें खोटें । नागवले मोठेमोठे ॥ म्हणोनि सांडा दोनी । सुख पावाल निदानीं ॥ ' असें म्हणणाऱ्या तुकारामबुवांनीं एकामागून एक अशा दोन बायका केल्या; त्यांना मुलें झालीं; अगदीं निर्याणकाळीं-देखील, ' ठायींची अचपळ तोंड फटकळ । सोसा वरदळ मजसाठीं ॥' असें म्हणून जिजाईचा पदर माळणीच्या हातीं देऊन सर्व निरवानिरव त्यांनीं यथास्थित केली.त्या वेळीं गरोदर असलेल्या जिजाबाईला 'होसी पुत्रवंती नारायण सुखें । पहासी पुत्रमुख आशीर्वचन ॥ ' असा आशीर्वाद दिल्यावरच 'तुका म्हणे आतां झालें समाधान । समाखिलें मन शेवटींचें ॥' हा देखील कृतींत व उपदेशांत विसंगतपणा म्हणावयाचा काय ?

'रामजोशाच्या काव्यकमळाचा जन्म शौचकूपाच्या कर्दमांत होत असे ' अशा रूपकानें स्वतःची लेखणी विटाळण्यापूर्वी रा. यशवंतरावांनीं थोडीशी आजूबाजूस नजर फेंकिली असती, तर आजकाल विद्वान्, मुत्सद्दी, कवि,

देशाभिमानी गणलेल्या अनेक व्यक्तींचा खासगी आयुष्यक्रम रामजोशांपेक्षांही कळकटलेला असल्याचें त्यांना आढळून आलें असतें. कदाचित् रामजोशांच्या राजरोस वर्तनापेक्षांही त्यांचीं गुप्त कारस्थानें निंद्य, किळसवाणीं, आणि घातकी असतील! अशीं माणसें आजच्या काळांत देखील उजळ तोंडानें मान्यता मिळवीत असतां, शंभर वर्षांपूर्वीच्या रावबाजीच्या काळांतील रामजोशांच्या वर्तनासाठीं त्यांच्या कवितेला हिणकस ठरविणें योग्य नाहीं. शाहिरकवींनीं कधीं संताळ्याचा आव आणिला नाहीं. मनोरंजन करणें आणि पैसा मिळविणें हा त्यांचा उघड धंदा होता. यजमानाचे आश्रित कोठवळे आपल्या बिदागीच्या रकमेची छाटाछाट कशी करावी याचें खलबत करीत असलेले पाहून 'भोजासम कविता प्रिय, कर्णासम दानशूर घोरपडे। ऐसें असतां माझ्या देणगिचा कां तुम्हांस घोर पडे॥' अशा आर्येनें आपल्या बिदागीचा बचाव करण्यास कीर्तन ऐन रंगांत आलें असतांही रामजोशी चुकले नाहींत; अशी त्यांची आख्यायिका असतां, केवळ त्यांच्या लावण्या ऐकून त्यांना नीतिमत्तेचा आदर्श असें त्यांच्या काळीं सुद्धां कोणी समजले नसतील! मग आज त्यांच्या काव्याचा आस्वाद घेतांना वर्तनाची छाननी करणें म्हणजे गुलाबाच्या फुलाचा वास घेतां घेतां त्याच्या खालच्या कांट्यांत किंवा मुळाशीं असलेल्या खतांत नाक खुपसण्यासारखें आहे.

रामजोशी केवळ शब्दप्रभु आहे, त्याला शब्दांचें औचित्य समजत नाहीं, असा एक आरोप रामजोशांवर रा. यशवंतरावांनीं केलेला आहे. त्या आरोपाचें औचित्य, रामजोशांच्या कवितेचें सर्वसाधारण स्वरूप आणि शाही वाङ्मयांतील रामजोशांचे महत्त्व यांचा विचार केला पाहिजे.

---

## रामजोशी 'भाषाप्रभु' कीं 'शब्दप्रभु?'

तळहातानें चंद्र झाकेना उजेड त्याचा बहु जागा॥

—परशुराम

येथवर रामजोशांच्या काव्याचा परिचय करून देण्यांत आला आहेच. व्युत्पन्न आणि विद्वान् हरिदास व नांवाजलेला शाहीर अशा दोन पेशांमुळें

त्याच्या काव्यांत विद्वत्तेचें वैभव आणि प्रतिभेचें स्वातंत्र्य हे दोन्ही गुण पाहावयास मिळतात. रामजोशाचें चरित्र व त्याच्याविषयींच्या आख्यायिका यांमुळें कलुषित ग्रह झाल्यामुळें त्याची लावणी ग्राम्य किंवा क्लिष्ट आहे असें म्हणणारांचा एक वर्ग आहे. यापैकीं ग्राम्यत्वाचा दोष केवळ सापेक्ष आहे. रामजोशाचा काळ व त्याचे श्रोते याचा विचार केला आणि इतर शाहिरांच्या काव्याशीं त्याचें काव्य ताडून पाहिलें तर हा आरोप अगदीं अनाठायीं आहे असेंच म्हणावें लागेल. क्लिष्टत्वाचा आरोप तर त्याहूनही चुकीचा आहे. छेकापन्हुतीसारखी लावणी श्लिष्ट आहे, क्लिष्ट नव्हे. रामजोशाच्या बहुतेक लावण्या सामान्य जनांसाठीं केलेल्या आहेत. कित्येक पूर्णपणें अथवा अंशतः संस्कृत किंवा संस्कृतप्रचुर अशा लावण्या समशील विद्वानांनाच डोलविण्यासाठी त्यानें रचलेल्या आहेत; त्या फार थोडया आहेत. त्या वगळल्यास संस्कृत शब्दांचा भरणा रामजोशाच्या काव्यापेक्षां प्रभाकराच्या किंवा होनाजीच्याही लावण्यांत जास्त आढळेल. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें रा. यशवंतराव केळकरांनीं त्याच्या काव्यावर दिलेला अभिप्राय गैरवाजवी वाटतो. ते म्हणतात, " रामजोशी हा व्युत्पन्न व संस्कृत भाषेशीं चांगला परिचित आहे. परंतु तो प्रभाकराप्रमाणें **भाषाप्रभु** नसून नुसता **शब्दप्रभु** आहे. एखाद्याला शब्दकोश पाठ असला तरी त्याला रसिकांचा हृदयकोश उमळवून दाखविता येणार नाहीं. तें साधावयाला शब्दाचें अर्थानुकारित्व ( अर्थानुकारी ? ) औचित्य समजावें लागतें. रामजोशाजवळ त्याचा सर्वस्वी अभाव आहे. त्याच त्याच अक्षरांनीं भरलेल्या बाराखडयांप्रमाणें त्याच्या अनुप्रासमय ओळी वाटतात, मटमट, चटचट, फटफट असली आचरट खटपटच त्याच्या काव्यांत दिसून येते. आणि हाच त्याचा विशेष. "

रामजोशाचें काव्य निकृष्ट ठरविण्यासाठीं यशवंतरावांनीं केलेली ही आचरट खटपट, त्यांच्या विद्वत्तेस व व्यासंगास उणेपणा आणते असें मोठया कष्टानें म्हणावें लागतें. अनंतफंदी, होनाजी, सगन आणि परशराम या चाऱ्ही शाहिरांना रा. यशवंतरावांचीं स्तुतिस्तोत्रें लाभलीं आहेत; प्रभाकरावर ते फिदा आहेत; परंतु रामजोशाच्या वांटयाला फक्त ' शब्दप्रभु ' हें विशेषण

मात्र दोनदा त्यांच्या लेखणीवाटे पडलें आहे. रामजोशाचें काव्य आचरट ठरविण्याच्या भरांत व्याकरण आणि शब्दार्थ यांचा त्यांना विसर पडलेला दिसतो. रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या 'भारती जडा सुधी'चें अनुकरण करणारी 'अर्थानुकारित्व औचित्य' ही शब्दांची जोडगोळी बनवितांना त्यांच्या संतापाची भट्टी बेसुमार तापून बिघडली व त्यामुळें 'अर्थानुकारी' अशा विशेषणाच्या जागीं 'अर्थानुकारित्व' असें भाववाचक नाम तयार झालें असावें, अशी शंका येते. कदाचित् ही चूक मुद्रक सैतानाची असेल असें धरून चालूं. परंतु 'त्याच त्याच अक्षरांनीं भरलेल्या बाराखड्या' ही काय चीज आहे तें मात्र उलगडत नाहीं. 'वंशी नाद नटी' या श्लोकांत वामन पंडितांनीं कविता देवीला 'टी-पार्टी' दिल्याचें वर्णन कै. गडकऱ्यांनीं केलें आहे; ती अनुप्रासाची विनोदी व्याख्या कौतुक करण्यासारखी आहे. परंतु 'मटमट, चटचट, फटफट' यांत कोणत्या अक्षराची बाराखडी येते? तरीही दोष देण्याच्या आवेशांत झालेल्या अशा शाब्दिक चुका किरकोळ समजून त्यांची उपेक्षा करूं व त्यांतील उद्दिष्ट अर्थ तेवढाच घेऊन रा.यशवंत-रावांचीं विधानें योग्य आहेत किंवा नाहींत तें पाहूं.

रामजोशाची शब्दसंपत्ति विपुल आहे हें रा. यशवंतराव पुन: पुन: कबूल करितात. रामजोशी जर शब्दप्रभु आहे तर त्याचें प्रभुत्व तरी कोणत्या प्रकारचें आहे? दहापांच कोश पोपटपंचीसारखे पाठ करून रामजोशानें हें प्रभुत्व मिळविलें नव्हतें. पुराणिक किंवा हरदास या नात्यानें लोकांना अर्थ समजावून देतां यावा म्हणून त्यानें भाषेचा व काव्यादिकांचा अभ्यास केला होता. केवळ दक्षिणेसाठीं अर्थ न समजतां घोकंपट्टी करणारा तो वैदिक नव्हता. पुराणिक व हरदास यांचें शब्दार्थावर व्याख्यान करण्याकडे किती लक्ष्य असतें तें सांगावयास नको. एके वेळीं मोरोपंत कथेस बसले असतां पंतांच्या एका आर्येचे दोनतीन अर्थ रामजोशांनीं लावून दाखविले व पंतांकडे पाहून ते म्हणाले कीं, 'माझ्या अल्प बुद्धीला सुचलें तें मीं सांगितलें, पण या विशाल उदरांत आणखी किती अर्थ भरले असतील तें त्यांचें त्यांसच माहीत!' अशी एक जोशीबुवांची आख्यायिका रा. भावे यांनीं दिली आहे. भाषा ही

केवळ शब्दांची बनलेली असते, अर्थासह शब्दकोश ज्यानें आपलासा केला आहे, त्याचें भाषेवर प्रभुत्व नाहीं असें म्हणणें हा केवळ वदतोव्याघात होय. शब्दकोश भरपूर असल्यामुळें रामजोशाच्या काव्यांत जें पदलालित्य आलें आहे, तो अनुप्रास अशी रा. यशवंतरावांनीं स्वतःची समजूत करून घेतलेली दिसते. ज्याच्यापुढें शब्दवैभव हात जोडून खडें असतें तो एका शब्दांत कित्येक वाक्यसमुच्चयांचा अर्थ आणूं शकतो. त्याच्या वाक्यखंडांचीं सुभाषितें बनतात. व्यंकटेशाच्या तिखट तेलकट नैवेद्याचें वर्णन करितांना त्यावर ' सुर झड घालिती । सुधेचे रस त्यापुढें लाजती ॥ ' हें वर्णन किंवा ' पांडुरंग **जगदंतरंग** जी माजि रंगला धनी । ' ह्या पंढरीच्या वर्णनांत ' जगदंतरंग ' या एकाच शब्दानें आणलेला अर्थ, अगर ' दुनिया सारी जठराग्नित भाजली ' हें दुष्काळाचें वर्णन यांत अर्थानुकारी औचित्य नाहीं; तर तें आहे तरी कशांत ?

अर्थालंकारांना शब्दालंकारांची जोड मिळाल्याने रसहानि होते अशी रा. यशवंतरावांची समजूत असेल तर ती चुकीची आहे. उलट रसाचा परिपोष होण्यास समर्पक वर्णांची योजना पाहिजे, असें साहित्यशास्त्र सांगतें. कठोर वर्ण योजून कोमल भावनांचा उठाव होत नाही, व कोमल वर्ण कठोर भावना दाखविण्यास योजिले असतां प्रतिकूलवर्णत्वादि काव्यदोष निष्पन्न होतात. रा. यशवंतरावांना प्रिय अशा प्रभाकरानें मटमट, चटचट केली नसली तरी तकतक, झकझक, खुळखुळ, छुमछुम, झणणण, दणणण, थरररर, गरररर, झरररर यांची गर्दी उडविली आहे. ' **चार** अंगुळें **चौ**कि पा**च**ची तनम**णि** नटला चु**णी भर्णे** ' ॥ या एका चरणांत ' च ' व ' ण ' अशा दोन व्यंजनांची बहुतेक बाराखडी प्रभाकराच्या लावणींत पाहून घ्यावी ! 'प्रभाकराची **जडण घडण** खडखडित **म्हणायला** ! ' या खुद्द रा. यशवंतरावांनीं दिलेल्या चरणांत ' ड ' च्या अनुप्रासाची रड तर आहेच ! पण जडण, घडण म्हणायला खडखडीत या वाक्यांत रूपकांचा झालेला गोंधळ ' अर्थानुकारी औचित्या'ची दाणादाण उडवून देतो. शब्दरत्नांच्या जडावाची जडण, सुवर्णोपम काव्याची घडण आणि ही जडण व घडण केवळ खडखडीत आणि तीही म्हणण्याच्या सोईसाठीं खडखडीत ! रूपकांचा गोंधळ घालून केलेला असा

भाषेचा गडगडाट आणि अर्थाचा खडखडाट रामजोशांच्या लावणीत शोधूनही सांपडणें कठीण! प्रभाकराच्या काव्याचें वर्णन करतांना त्यांतील गुणदोष वर्णन येईलच! परंतु प्रभाकराची वाणी किती भ्रष्ट झाली होती, याचें कोणाला उदाहरण पाहावयाचें असेल तर चित्रशाळेनें प्रकाशित केलेल्या प्रथमावृत्तीतील ११८ नंबरची 'आहेस ठाउका' ही लावणी पाहिल्यास खात्री होऊन जाईल. .या लावणींतील तिसऱ्या शब्दापासून जी अश्लीलतेची सुरवात होते ती अखेरपर्यंत! फुल्या देण्याचा इतरत्र न केलेला प्रकार या लावणींत करणें भाग पडलें. अश्लील, बीभत्स, आणि ओंगळ शब्द आणि कल्पना यांची या लावणीत कमाल झालेली आहे! अशा वर्णनांतच प्रभाकराचें भाषाप्रभुत्व त्याच्या लावण्यांत कळसास पोचतें. राजाश्रय सुटून भुकेबंगाल बनल्यावर देशोधडीस लागलेला प्रभाकर किती हीन दशेस गेला त्याचें ती लावणी एक उदाहरण आहे. ती वाचून 'गंगु हैबती म्हणे सोडिलें अबरूला ह्यानें पाणी। फार पाहिले उणे परंतु त्याहुनि याची जात उणी ॥' हे प्रभाकरानें त्याच लावणींत शेवटीं काढिलेले उद्गार यथार्थ वाटूं लागतात! शब्द ठाऊक आहेत, पण त्यांची योजना कशी करावी तें कळत नाहीं, असें प्रभाकराविषयीं म्हटल्यास अनेक उदाहरणांनीं कसें सिद्ध करून देतां येईल ते पुढें येईलच! रामजोशांविषयीं मात्र हा आक्षेप अगदीं खोटा ठरेल! असें असतां रामजोशांची कविता टाकाऊ ठरविण्याचा प्रयत्न रा. यशवंतरावांनीं कां करावा, हा मोठा प्रश्न आहे. ह्या प्रश्नाचें जें उत्तर प्रस्तुत लेखकाला सुचतें त्यानें त्याचें स्वतःचेंही पूर्ण समाधान होत नाहीं; तथापि इतर खुलाशाच्या अभावीं तेंच पुढें ठेवणें आवश्यक आहे.

रा. यशवंतरावांच्या दृष्टींत रामजोशांचें चरित्र भरल्यामुळें, त्यांच्याविषयीं वाटणारा तिरस्कार त्यांनीं त्याच्या काव्यावर दिलेल्या अभिप्रायांत बराचसा दिसून येतो. त्याच्या 'काव्यकमळाचा जन्म शौचकूपाच्या कर्दमांत झाला आहे;' या त्यांच्या वाक्यखंडावरून ही गोष्ट व्यक्त होते. सवाशें वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या कवीच्या चारित्र्यावरून त्याच्या काव्याची आज परीक्षा करणें योग्य नाहीं. बायरनसारख्या कवीच्या काव्याला ही कसोटी लावणें योग्य

नाहीं, असें त्याच्या कांहीं समकालीन विद्वानांचेंही मत आहे. याविषयींचा ऊहापोह मागें एकदा केलेला असल्यामुळें त्याची पुनरुक्ति करीत नाही.

रा. यशवंतरावांच्या या मताचें दुसरें एक कारण असें वाटतें कीं, इतर समकालीन शाहिरांच्या मानानें रामजोशाचे तत्कालीन ऐतिहासिक घडमोडीवर फार कमी पोवाडे उपलब्ध आहेत. पोवाड्यांवर विशेष भक्ति असल्यामुळें रा. यशवंतरावांचा ग्रह रामजोशाविषयीं प्रतिकूल झालेला असेल असेंही संभवतें.

रा. भावे, रड्डी शास्त्री आणि विष्णुपंत चिपळूणकर यांनीं रामजोशाची स्तुति करण्यांत अतिरेक केला आहे अशा समजुतीनें रा. यशवंतराव त्याच्या उलट दिशेस झुकले असावे. वरीलसारख्या तीन विद्वानांची त्यांना जी चूक वाटली ती वाचकांच्या गळीं उतरविण्याच्या भरांत त्यांची लेखणी वहावली असावी असा बळकट संशय येतो.

## रामजोशाच्या कवितेंतील गुणदोष

हिंदुमात्राच्या अंगां मुरलेल्या जातिभावनांचा परिणाम वाङ्मयक्षेत्रांत देखील कसा होत असतो याचें एक उदाहरण रामजोशाच्या कवितेसंबंधानें देण्यासारखें आहे. रामजोशाच्या लावण्यांचें संपादन करितांना रा. शंकर तुकाराम शालिग्राम यांनीं कांहीं आख्यायिका दिलेल्या आहेत. त्यांतील पहिलीच आख्यायिका अशी आहे की, " सोयरोबानाथ आंबिये म्हणून एक साधु सोलापुरीं राहात असत त्यांच्या मठांत रामजोशाची कथा व्हावी असा कांहीं मंडळींनीं हेतु प्रगट केला. रामजोशांनींही कबूल केलें; पण सोयरोबानाथ यांस जोशीबुवांची रंगेल व फक्कड वृत्ति सहन न होऊन त्यांनीं कथा होऊं दिली नाहीं. मंडळीचा झालेला विरस मनांत ठेऊन मठाच्याच बाजूस पाल देऊन तेथें कथा आरंभिली. लोकांची दाटी जमली. कथा रंगांत आल्यावर 'भला जन्म हा तुला लाधला खुलास हृदयीं बुधा । धरिसी तरि हरिचा सेवक सुधा ॥' ही लावणी जोशीबुवांनीं तात्काळ रचून म्हटली. या लावणीत 'चराचरीं गुरु तरावयाला नरा शिरावरि हरि । जरा तरि समज धरीं

अंतरी ॥ हटातटानें पटा रंगवुनि जटा धरिशि कां शिरीं । मठाची उठाठेव कां तरी ॥ वनांत अथवा जनांत हो कां; मनांत व्हावें परी । हरीचें नाम भवांबुधि तरी ॥ काय गळ्यांत घालुनि तुळशीचीं लांकडें ? । ही काय भवाचें दुर करितिल सांकडें ॥ बाहेर मिरविशी आंत हरिसि वांकडें ! ॥ अशा भक्तीच्या रसारहित तूं कसा म्हणविशी सुधा ? । हरिरस सांडुनि घेसी बुधा ! ॥' अशा रीतीनें आंतून भोंदू असलेल्या बुवांची निर्भर्त्सना केली आहे, ती त्या मठाधिपतीची होय."

सोहिरोबानाथ आंबिये हे साधु सारस्वत ज्ञातीचे असल्यामुळें व ही आख्यायिका त्यांच्या नांवावर दिल्यामुळें कित्येक सारस्वत गृहस्थांचा रा. शाळिग्राम यांजवर आणि पर्यायानें रामजोशांवरही रोष झालेला आहे. वस्तुतः सोहिरोबानाथांचा सोलापुरास मठ असणें संभवनीय नाहीं. रा. भावे यांनीं महाराष्ट्र सारस्वतांत हीच आख्यायिका कांहींशी निराळ्या प्रकारें दिली असून लावणींतील टीकाविषयक साधुजीचें नांवही निराळेंच दिलें आहे; तें असें:—'रामजोशांच्या बैठकीच्या जागेजवळ सुबरावबावा या एका साधु पुरुषाचा मठ होता. या बावाच्या कर्मठपणाचें मोठेंच स्तोम माजलेलें होतें. बुवांचें तें प्रस्थ पाहून जोशांनीं त्याच्या मठासमोर बसून ' हटतटानें पटा रंगवुनि जटा धरिशी तूं शिरीं । मठाची उठाठेव कां करी ॥ ' हा सुंदर फटका उडविला. हा जोरदार तडाखा बुवांच्या वर्मी कसा लागला असेल हें त्यांचें तेच जाणत.'

रामजोशी हे स्वतः सोलापुरचे होते. त्यांना सोलापुरांत कोठेंही कथा करण्यासाठीं जागेची वाण पडली नसती. एखाद्या बुवाच्या मठांत त्याच्या खुषीविरुद्ध कथा करण्याची जरूरी किंवा इच्छा त्यांना किंवा दुसऱ्या कोणाला वाटणें साहजिक दिसत नाहीं. त्याचप्रमाणें सोहिरोबानाथांचा सोलापुराशीं संबंध आल्याचेंही आढळत नाहीं. त्यामुळें रा. शाळिग्राम यांनीं दिलेली आख्यायिका व सोहिरोबानाथांचा केलेला उल्लेख हीं दोन्ही चुकीचीं असून रा. भावे यांनीं दिलेली माहिती जास्त संभवनीय दिसते. तथापि शाळिग्राम यांनीं मुद्दाम किंवा कुत्सित बुद्धीनें अशी आख्यायिका सोहिरोबानाथांस कमी-

पणा आणण्यासाठीं दिली असावी, अशी कित्येकांनीं करून घेतलेली समजूतही तितकीच चुकीची दिसते! रा. भावे यांनीं दिलेल्या माहितीवरून पाहातां मुळांत ही आख्यायिका सोहिरोबानाथांविषयीं नाही. यदा कदाचित् तशी असती तरी सोहिरोबानाथांचें चारित्र्य अशा उपरोधिक लावणीने दूषित होणारें नाहीं. साधुत्वाचा भाव घालून दुराचरण करणाऱ्या विठ्ठल नामक एका साधुबुवांची खरमरीत हजेरी घेतल्यावरून संतापून, त्या विठ्ठलानें सोहिरोबानाथांना विहिरींत फेंकून दिल्याची एक आख्यायिका असून, ‘ विठ्ठल-पंचक ’ या नांवानें त्या आख्यायिकेशीं संबद्ध असलेलीं सोहिरोबानाथांचीं पांच पदें प्रसिद्ध आहेत. सोहिरोबानाथ किती निस्पृह व स्पष्टवक्ते होते हे त्यांनीं महादजी शिंद्याला उत्तरादाखल सांगितलेल्या दोन पदांत नमूद आहे. रामजोशासारख्या कथेकऱ्याच्या वर्तनाचा निषेध करून त्यांनीं आपल्या मठांत त्याला जागा दिली नाहीं, अशी आख्यायिका सोहिरोबांच्या नांवावर खपावी यांत कांहीं गैर नाहीं. अशा निषेधाचा विषाद मानून रामजोशानें बुवांवर कुरघोडी करण्याचा प्रयत्न करणें हें देखील रामजोशाच्या बाह्यात स्वभावास साहजिक आहे. कदाचित मुळांत कांहींच नसून लावणींतील वर्णनावरून अशी एखादी आख्यायिका रचली गेली, असाही वास्तविक प्रकार असू शकेल! अशा आख्यायिकेला नसतें महत्त्व देऊन रा. शालिग्रामांविषयीं अथवा रामजोशाविषयीं मन कलुषित करून घेणें मात्र गैर आहे, यांत शंका नाहीं.

असो. येथवर रामजोशाच्या काव्याचें स्वरूप व त्यावरील आक्षेप यांचा विचार झाला. आतां त्यांत सामान्यत: कोणते गुण व दोष आढळतात तें पाहूं. पदलालित्य, समर्पक शब्दयोजना, संगतवार वर्णनपद्धति हे गुण रामजोशाच्या कवितेंत इतर शाहिरांपेक्षां जास्त प्रमाणांत आढळतात. मानवी स्वभावांतील खांचाखोंचा जाणण्यांत देखील त्याचा हातखंडा आहे. त्यानें रंगविलेल्या स्वभावचित्रांत सहसा विसंगतपणा आढळत नाहीं. संस्कृत काव्य आणि साहित्य यांचा अभ्यास केलेला असल्यामुळें गीर्वाण साहित्यानें घालून दिलेले नियम मोडल्याचीं उदाहरणें त्याच्या काव्यांत क्वचितच आढळतात. ज्या काळांत त्यानें काव्यरचना केली त्या काळांतील शिष्टसांप्रदायाचें उल्लंघन त्याजकडून झाल्याचें आढळत नाहीं. केवळ याचकाच्या नांवावर न भाळे-

णारा, स्वतःच्या लौकिकासाठीं इरेस न पडणारा, गुण ओळखून आपली योग्य संभावना करणारा यजमान किंवा श्रोतृसमाज मिळावा अशीच त्याची मनीषा असल्याचें ' दाता, परि नीरस काय करावा ? जन मार्मिक व्हावा ! ' 'भोजासम कविताप्रिय, कर्णासम दानशूर घोरपडे' वगैरे उद्गारांवरून दिसून येतें. विलासी व उच्छृंखळ स्वभावानुसार ' चिमा, बया, ' वगैरे अनेक प्रियपात्रांबरोबर रंग ढंग केले असतांही एकट्या 'बयाबाई'वरच ' दैवें ही गांठ बयाबाईची, मज पडली साची ॥ ' अशी लावणी त्यानें रचली त्याचें इंगित त्याच लावणींत ' धन्या सत्कविता कविरायाची, रसिकता बयाची !' ' कविता इजसंगें रंगा आली !' वगैरे केलेल्या वर्णनावरून कळून येतें. त्याच्या लावणीचें मर्म ओळखून त्याप्रमाणें चाल ती लावीत असे. नाहीं तर ' आहे बरोघरीं पुण्यामधिं गाणें, परि खोटें नाणें । आलाप कंठामधिं घेति किराणे, हें लाजिरवाणें ॥ ' यांतील तत्त्व मराठी रंगभूमीवर सुरेल ताना घेणाऱ्या कित्येक नटांनीं आज लक्षांत घेण्यासारखें आहे. 'भला जन्म हा तुला लाधला' यासारख्या उपदेशपर लावणीवरून 'जोशीबोवांची मानसिक भक्ति व मानसिक वैराग्य उघड दिसून येतें;' हा रा. शालिग्रामांनीं काढिलेला निष्कर्ष मान्य होण्यासारखा नाहीं; तथापि जन्मतः द्वड, विलासप्रिय, व्यसनी अशा माणसाच्या मनावर दखील विद्येच्या संस्कारांचा सुपरिणाम होतो, त्याचे विचार प्रगल्भ होतात, शिष्टाचारांचें बंधन पाळणें त्याला आवश्यक वाटूं लागतें आणि त्याच्या वाणीमध्यें शुद्धता येते, हें रामजोशाचें काव्य वाचल्यास आणि विशेषतः रामजोशी आणि सगन यांच्या काव्याची तुलना केल्यास कळून येईल.

रत्न घांसल्यानें त्याला पैलू पडून उज्ज्वलता येते; तशीच त्याची झीजही होते. त्याप्रमाणें विद्येच्या संस्कारांचा परिणाम होऊन रामजोशाच्या कवितेला उजाळा मिळाला आहे; पण त्याच्या काव्यांत होनाजीसारखा प्रसाद, अनंतफंदीची सडेतोड तडफ, सगनच्या स्वच्छंद भराऱ्या, परशरामाचें विषयवैचित्र्य, किंवा प्रभाकराची उत्तानता दिसून येत नाही. गोपींच्या तोंडीं कृष्णाचें वर्णन करतांना ' रजत न म्हणों याला बाई हा शिंपला ' अशी एखादा वेदांत्याला शोभण्यासारखी परिभाषा घातलेली क्वचित् आढळते ' पुण्याविण कविता नच येयाची; शूद्रास कशाची ! ' ही भावना आजच्या-

सत्यशोधकी युगांत जरी त्याज्य असली, तरी रामजोशाच्या काळीं ती दृढ होती; तथापि इतर शाहिरांच्या काव्यांत ती इतक्या स्पष्टतेनें दिसून येत नाहीं, हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

तमाशेवाल्या फडांत काव्यरचनेस सुरवात केली असतांही संस्कृत कल्पना व संस्कृत सांप्रदाय यांची छाप रामजोशाच्या काव्यावर पडलेली दिसून येते. कन्याविक्रय, वांझपण, सवतींचें भांडण, गर्भारपण वगैरे लौकिक विषयांवर इतर कित्येकांप्रमाणें त्यानें कविता केल्याचें आढळत नाहीं. त्याच्या शृंगारिक काव्याला देखील संस्कृताचें वळण आहे. त्याच्या कित्येक लावण्यांचें अनुकरण करण्याचा इतरांनीं प्रयत्न केल्याचें आढळतें, त्याचें दिग्दर्शन यापूर्वी केलें आहे. महाराष्ट्रीय चालीरीती, समजुती आणि भावना यांना त्यानें संस्कृत वेष दिलेला आहे. गीर्वाण काव्यरसाची छाप त्याच्या इतकी दुसऱ्या कोणत्याही शाहिरावर पडलेली दिसत नाहीं. असें असतांही त्याच्या कवितेंत महाराष्ट्रीय वैशिष्टय कसें दिसून येतें, हें वेळोवेळीं दाखविलें आहे. पंडित कवींचा वेष मराठी होता, परंतु त्यांचा आत्मा व त्यांचें अंत:करण हीं गीर्वाणमय होतीं. शाहिरांचा आत्मा महाराष्ट्रीय होता आणि त्यांचें मन मराठमोळयांत रंगलें होतें; त्यांची भाषाही मराठीच होती. रामजोशासारख्या व्युत्पन्न व विद्वान् शाहिराच्या काव्यांत देखील हे गुण उत्कटतेनें दिसून येतात. एका एका विशिष्ट गुणांत इतर शाहीर त्याच्यावर मात करितात, परंतु सर्व गुणांचें सुरस संमेलन जसें रामजोशाच्या काव्यांत झालेलें आढळतें तसें इतरांच्या कवनांत आढळत नाहीं. एकाच वर्गात निरनिराळे विद्यार्थी एकएका विषयांत पहिल्या नंबरचे गुण मिळवितात; परंतु एखादा विद्यार्थी प्रत्येक विषयांत दुसरा आला असतांही एकंदरींत पहिला येतो. या दृष्टीनें रामजोशाचा दर्जा सर्वांत अव्वल ठरतो. त्यांतून स्वभावपरिपोष करण्यांत रामजोशी सर्वांहून चढ आहे. या त्याच्या गुणांमुळें अनेक विद्वानांनीं त्याची वाखाणणी केलेली आहे! ‘ जनांत किंवा मनांत किंवा वनांत ’ ही रे. नारायण वामन टिळकांची आवडती शब्दपरंपरा ‘भला जन्म हा तुला लाधला’ या रामजोशाच्या लावणींत ‘ वनांत अथवा जनांत हो कां मनांत’ अशी असलेली दिसून येते. रामजोशाची छाप आधुनिक कवींवर देखील अशा रीतीनें पडली आहे.

# अनंतफंदी



" फंदी अनंत कवनांचा सागर;
अजिंक्य त्याचा हातखंडा "

—होनाजी.

परशुरामपंत गोडबोले यांनीं अनंतफंदीचा जन्म शके १६६६ (इ. स. १७४४) व अंत शके १७४१ (इ. स. १८१९) असा दिला आहे. रा. यशवंतराव केळकर यांनींही तोच काळ दिलेला आहे. यावरून या लेखमालेंतील सहा शाहिरांत वडीलकीचा मान त्याच्याकडे जातो. अनंतफंदी याचें घराणें संगमनेरचें; उपनांव घोलप; आईचें नांव राऊबाई. त्याच्या बापाचें नांव अगर धंदा याविषयीं माहिती मिळत नाहीं, असें रा. यशवंतरावही म्हणतात; परंतु त्याचा वडिलार्जित धंदा गोंधळीपणाचा, असाही ते उल्लेख करितात. मलकफंदी नांवाच्या एका विक्षिप्त अवलिया फकीराशीं याचा स्नेह होता. फंदी मलंग असेंही त्याचें नांव एका लावणींत आलें आहे. तो याचा तमाशांतील साथीदार होता. त्यामुळें यालाही लोक फंदी म्हणूं लागले. मलकफंदी, राघवफंदी, रतनफंदी, आणि अनंतफंदी अशा चौघां फंदींनीं तमाशा काढून होळकरांची राजधानी महेश्वर येथें नेला असतां, अहल्याबाईच्या उपदेशानें अनंत फंदीला उपरति होऊन त्यानें तमाशा सोडला आणि कीर्तन करण्यास सुरवात केली, अशी आख्यायिका आहे. 'लोकाग्रहास्तव' तो पुढेंही कधींमधीं तमाशा करीत असे, अशीही आख्यायिका आहे. पानिपतच्या लढाईच्या वेळीं तो १६ वर्षांचा होता. पेशवाईची इतिश्री झाल्याच्या पुढील सालीं तो वारला; अशा रीतीनें मराठेशाहीच्या अखेरीच्या सुमारें साठ वर्षांतील प्रसंग त्यानें पाहिले.

सवाई माधवरावाच्या दरबारांत अनंतफंदीला मोठा मान होता. त्यानें नाना फडणीसावर गौरवपर पोवाडा लिहिला. त्यानें आपला खडर्याच्या लढाईचा पोवाडा ' श्रीमंतांचे दरबारीं ' ललकारल्याचा त्या पोवाड्यांतच उल्लेख आहे. सवाई माधवरावांच्या मृत्यूनंतर रावबाजीला पेशव्यांच्या गादीवर आणण्यासाठीं ज्या उलटयासुलटया कारवाया झाल्या त्यांचें बाजीरावातर्फेचें वर्णन त्याच्या माधव-ग्रंथांत आलें आहे. बाजीरावानें लिहून दिलेल्या हकीकतीवरून अनंतफंदीनें माधव-ग्रंथ लिहिला. अनंतफंदीच्या काव्यावरील विवेचनास माधव-ग्रंथापासून सुरवात करावयाची आहे.

' माधवग्रंथ ' किंवा ' माधवनिधनकाव्य ' हा ग्रंथ ओवीबद्ध आहे; त्याचे सहा अध्याय आहेत. त्यांतील हकीकत रावबाजीनें स्वत: लिहून दिली व त्या लेखाबरहुकूम अनंतफंदीनें कवित्व केलें असें चौथ्या व पांचव्या अध्यायांच्या शेवटीं सांगितलें आहे. बाजीराव गादीवर आल्यावेळेपर्यंतचें वर्णन पहिल्या पांच अध्यायांत आहे. पहिल्या पांच अध्यायांच्या अखेरीस ' संमत बाजी रघुनाथ पत्राधार ' असा उल्लेख आहे, तसा सहाव्या अध्यायाच्या शेवटीं नाहीं. तसेंच या सहाव्या अध्यायांत पेंढार व दुष्काळ यांचें वर्णन आहे, तें बाजीरावाच्या कारकीर्दीस दूषणावह आहे. असें वर्णन बाजीरावानें लिहवून घेतलेल्या ग्रंथांत येणें साहजिक नसल्याकारणानें हा अध्याय प्रक्षिप्त असावा असें रा. भावे यांचें अनुमान आहे. रा. यशवंतराव केळकर यांचें याविषयीं असें मत आहे कीं, हा अध्याय प्रक्षिप्त नाहीं; कारण, यांतील भाषापद्धति पहिल्या पांच अध्यायांसारखीच आहे. दुसरें असें कीं, या अध्यायांत जसें पेंढार व दुष्काळ यांचें ओवीबद्ध वर्णन आहे, तसेंच वर्णन अनंतफंदीच्या त्याच विषयावर केलेल्या सहा उपलब्ध असलेल्या लावण्यांत केलेलें आढळतें. रा. यशवंतरावांचें अनुमान असें आहे कीं, अनंतफंदीनें हा सहावा अध्याय मागाहून लिहिला व तो पहिल्या पांच अध्यायांस जोडला. त्यांतील मजकूर बाजीरावानें लिहून दिलेला नाहीं. माधव-ग्रंथाचा सहावा अध्याय प्रक्षिप्त नसून बाजीरावाच्या लेखाधाराशिवाय अनंतफंदीनें लिहिला हें रा. यशवंतरावांचें विधान मान्य होण्यासारखें आहे.

परंतु पहिले पांच अध्याय लिहिल्यानंतर सहावा अध्याय लिहिला हें त्यांचें विधान मात्र योग्य दिसत नाहीं. त्याचप्रमाणें या अध्यायांतील वर्णन बाजीरावाला दूषणावह आहे, ह्या रा. भाव्यांच्या विधानास रा. यशवंतरावांनीं दिलेली अप्रत्यक्ष कबुली चुकीची आहे. या सहाव्या अध्यायाच्या संबंधानें रा. यशवंतरावांनीं अनेक चुकीचीं व विसंगत विधानें केलीं आहेत. 'इ. स. १८००–१८०१ नंतर अनंतफंदी पुणें प्रांतांत नसावा. दुष्काळाची माहिती ऐकून त्याप्रमाणें अनंतफंदीनें वर्णन केलें' असें जें ते म्हणतात त्याला कांहीं आधार दिसत नाहीं. ती स्थिति अनंतफंदीनें 'कदाचित्' पाहिली असेल असाही त्यांनीं उल्लेख केला आहे, तो उल्लेख '१८००–१८०१ नंतर फंदीबुवा पुणें प्रांतांत नव्हते असें दिसतें,' या विधानाशीं विसंगत आहे. पोंवाडयांतील वर्णनावरून ती स्थिति प्रत्यक्ष पाहून वर्णिली असावी असें वाटतें.

सहाव्या अध्यायांत पेंढार व दुष्काळ यांचें वर्णन आहे; त्या अर्थी तो अध्याय या आपत्ती येऊन गेल्यानंतर लिहिला असावा हें उघड दिसतें. तथापि रा. यशवंतरावांचें असेंही अनुमान आहे कीं, 'या दुष्काळाचे सुमारानंतर बाजीराव व अनंतफंदी यांचें बिनसलें असावें.' याचें कारण रा. यशवंतराव असें देतात कीं, 'या विधानाला दोन आधार देतां येतील. फंदीच्या मुलाचा बाजीरावावर निंदापूर्ण असा पोवाडा १८१७ च्या सुमाराचा आहे. त्याच सुमाराचा 'वडिलांच्या हातचे चाकर। त्यांस न मिळे भाकर।' इत्यादि सुरवातीचा दुसरा एक पोवाडा आहे. तो अपूर्ण असल्यामुळें फंदीबुवाचा आहे कीं फंदीच्या मुलाचा आहे, हें स्पष्टपणें कळत नाहीं. तरी 'जुन्याची तिंबुनि कणिक राज्य आपुलें हारवीलें' या उल्लेखावरून तो १८१८ नंतर रचलेला असला पाहिजे!'

रामजोशी वगैरे शाहीरांचे जन्मकाल देण्यांत रा. शालिग्राम वगैरेंनीं चुका केल्या आहेत असें रा. यशवंतरावांनीं ठिकठिकाणीं दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. रामजोशांच्या जन्मकालासंबंधीं त्यांनीं जी शालिग्रामांची चूक म्हणून दाखविली आहे, ती चूक कां, याचीं रा. यशवंतरावांनीं दिलेलीं

कारणें समाधानकारक नाहींत हें मागें आलेंच आहे. परंतु रावबाजीसंबंधाच्या पोवाड्यांचे जे १८१७।१८ हे सन त्यांनीं वर दिलेले आहेत आणि त्यांवरून **दुष्काळाचे सुमारानंतर** अनंतफंदी व रावबाजी यांचें बिनसलें असावें असें अनुमान काढिलें आहे, तेंही चुकीचें वाटतें.

फंदी मुलाचा पोवाडा **१८१७ च्या सुमाराचा** व 'वडिलांच्या हातचे चाकर,' हा **१८१८ नंतरचा,** असा भेद रा. यशवंतराव कां करतात तें कळत नाहीं. 'उटया केशरी टिळा कस्तुरी' हा फंदी मुलाचा बाजीरावावरील एकच पोवाडा उपलब्ध आहे, त्याचाच उल्लेख रा. यशवंतरावांनीं केलेला दिसतो. त्यांत "सर्वांची रग जिरली म्हणुनी तळि भरली, आला दीप मालवता। फंदी मूल म्हणे असती विरस ! **कां गादि पुण्याची घालवता !**" असा जो स्पष्ट उल्लेख आहे त्यावरून तो पोवाडाही **१८१७ च्या सुमाराचा** नसून **१८१८ नंतरचा** आहे हें स्पष्ट होतें. दुष्काळ पडला होता १८०३-४-५ सालीं; पोवाडे १८१८ नंतरचे ! मग 'दुष्काळाच्या **सुमारानंतर** फंदीबुवाचें व बाजीरावाचें बिनसलें होतें' या विधानाला पंधरा वर्षांनंतरच्या पोवाड्यांत बाजीरावाची निंदा आहे, ह्या गोष्टीचा आधार कसा मिळतो ! सुमारानंतर म्हणजे पंधरा वर्षांनंतर कीं काय ? माधव-ग्रंथाच्या सहाव्या अध्यायाखेरीज दुसऱ्या कांहीं लावण्या पेंढाऱ्यांच्या दंग्याविषयीं अनंतफंदीनें केल्या आहेत. या लावण्यांच्या संबंधांतही रा. यशवंतरावांनीं असाच गोंधळ केला आहे. त्यांच्या प्रस्तावनेच्या आठव्या पानावर 'दुष्काळाच्या **सहाही** लावण्या मिळून एकच लावणी होते' असा अभिप्राय ते देतात. पुढें पान ७६ वर त्या विषयावर फंदीबुवांनीं **सातआठ** लावण्या केल्या आहेत असेंही सांगतात. मुळांत लावण्या सहा; त्या सर्व मिळून एकच बनते असा त्यांचा अभिप्राय आहे; पुनः त्याच सहा लावण्यांचा उल्लेख सातआठ लावण्या असा करण्यासही त्यांची तयारी ! वस्तुस्थिति अशी आहे कीं, अनंतफंदी हे शीघ्रकवि होते. त्यांनीं निरनिराळ्या प्रसंगीं या लावण्या केल्या असाव्या. विषय एकच म्हणजे पेंढाऱ्यांचा दंगा हा असल्यामुळें बहुतेक वर्णन सारखेंच आहे. परंतु प्रत्येक लावणींत कांहीं

तरी निराळेपणा आहे. अशा कांहीं बाबतींत एकमेकांसारख्या, परंतु निरनिराळ्या वेळीं रचलेल्या लावण्या जशाच्या तशा दिल्यानेंच अनंतफंदींचें शीघ्रकवित्व आणि काव्यरचनेची कुशलता कळून येते. रा. शाळिग्रामांसारख्या संपादकानें—रा. यशवंतरावांनीं सुचविलें आहे त्या प्रमाणें—आपल्या मतानुसारें छाटाछाट करून त्या सर्व लावण्यांची एक लावणी बनविणें योग्य नव्हतें. या लावण्यांची चर्चा पुढें येईलच. या ठिकाणीं सांगावयाचें तें इतकेंच कीं, या लावण्यांतील एका उल्लेखावरून बाजीराव आणि अनंतफंदी यांचें बिनसलें असावें असा निष्कर्ष रा. यशवंतरावांनीं काढला आहे. परंतु या लावण्या केव्हां रचल्या असाव्या हें मात्र सांगितलें नाहीं. ‘ एक जात टोपीवाला । ’ या त्यांतील दोन लावण्यांत आलेल्या चरणावरून आणि ‘अति एकंकार होईल । येतील टोपीवाले । ’ या उल्लेखावरून या लावण्याही १८१८ नंतरच्या असाव्या असें वाटतें. १८१८ नंतर अनंतफंदीनें व त्याच्या मुलानेंही बाजीरावाचा अधिक्षेप केला आहे. त्याचप्रमाणें माधव-ग्रंथाच्या पांचव्या अध्यायांत सत्तेचाळिसाव्या ओंवीपासून पन्नासाव्या ओवीपर्यंत ज्या चार ओंव्या आहेत, त्या अशा: ‘ मग शिंद्यांनीं आणोनि बाजीराव । सिंहासनीं केला गौरव । पुढें माजले जसे कौरव । कोणास कोणी न मोजिती ॥ एकमेकांनीं आपआपसांत । एकमेकांचे योजिले घात । मस्तक एकही न ठेविली पोक्त । म्हणोनि बैदा माजला ॥ शिंद्यानें बांधला मल्हारराव होळकर । बाजिरायें बधिला त्याचा सहोदर । कापट्य करूनि शास्त्री गंगाधर । देवद्वारीं मारिला ॥ आपणही [illegible] [illegible] । एकही न केला शेवट । धरिली उत्तर पंथें वाट । [illegible] बैसले ॥’

बाजीराव आणि अनंतफंदी यांचें बिनसल्यावरच म्हणजे स. १८१८ नंतर या ओंव्या माधवग्रंथाच्या पांचव्या अध्यास जोडल्या गेल्या असाव्या.

सहावा अध्याय, रा. यशवंतराव म्हणतात त्या प्रमाणें, पहिले पांच अध्याय लिहिल्यानंतर अनंतफंदीनें लिहिलेला नसून, तोच प्रथम लिहिलेला असावा असें वाटतें. त्यांत बाजीरावाला दोष न देतां उलट त्याची पहिल्याच

ओळींत स्तुति केली आहे ती अशी: ' जे जैशीं कर्मे आचरती। तदनुसार फळें भोगिती। निमित्तमात्र भूपती। त्याजकडे दोष नाहीं ॥ ' त्याचप्रमाणें पेंढाऱ्यांचें बंड व दुष्काळ यांमुळें प्रजेचा झालेला छळ वर्णन करून ओंवी ८८ यांत अनंतफंदी म्हणतो: ' स्वामीचा जे घात योजिती। शेवट त्यांच्या ऐशा गती। सत्क्रियेशी न जागती। ते अधोगती मरती कीं ॥ ' या ओंव्यांत रावबाजीला दोषमुक्त केलें आहे. या दोन्ही ओंव्यांवरून असें वाटतें कीं, बाजीरावानें विठोजी होळकरास हत्तीच्या पायीं दिलें; त्यामुळें यशवंतराव होळकरानें चिडून पुणें लुटलें व देशावर पेंढार सोडलें; प्रजेचे अनन्वित हाल झाले व सर्व लोक बाजीरावाला दोष देऊं लागले. याच्या कर्मांमुळें हा अनर्थ ओढवला असें लोक म्हणूं लागले. तेव्हां बाजीरावाची मर्जी संपादन करण्यासाठीं स्वयंस्फूर्तीनें किंवा बाजीरावाच्या प्रेरणेनें हा सहावा अध्याय अनंतफंदीनें रचला. त्यांत बेइमान लोकांवर व प्रजेच्या पूर्व कर्मांवर सर्व दोष लादला. त्याचप्रमाणें या अध्यायाच्या सुरवातीस चौथ्या ओंवीपासून तेराव्या ओंवीपर्यंत, ज्योतिष्यावर हवाला देऊन ' असें होणार हें पूर्वींच ठरलें होतें ' याचा निर्वाळा दिला आहे तो असा: ' पूर्वीं भाकित होते जाणत जोशी। कीं पुढें येईल रुद्रवंशी। काळ पडेल दक्षिण देशीं। वर्णसंकर होईल ॥ राज्यांत माजेल धुमाळी। घरोघर आपल्या होतील बळी। बळी तोचि कान पिळी। महा अनर्थ होईल ॥ पाळणे लागतील डोंगरीं। मनुष्यें पळतील गिरिकंदरीं। विसा पंचविसा कोसांवरी। वस्तीलागीं एक ग्राम ॥ सहस्र घरांची वस्ती जेथें। दहा पांच घरें रहातील तेथें। खून पडावे मार्ग पंथें ! तें तें आलें अनुभवा ॥ डोंगरावरी लागेल दिवा। गांवांत भुंकतील भालुवा। हें आवडेल महादेवा। रुद्रवंशी लागतांची ॥×××॥ याला जो असत्य म्हणेल कोणी। मग मी करीन त्याची पुरवणी। तरीच हा जोशी चिंतामणी। हें वाक्य माझें सत्य जाणा ॥ हीं जोशाचीं ढंग मतें। असत्य भासत होतीं आपणातें। म्हणे हे भिकारी मागते। कुणबटातें ज्ञान कैचें ॥ रांजण सांठवेल गाडग्यांत। धनगाढे ( श्रीमंत ) रहातील रांगड्यांत ( रानटी लोकांत )। जेवणार जे कां वाडग्यांत। प्राप्त त्यांतें ताटवाटया ॥ जें जें कथिलें वाल्मीकें। तें तें सत्य केलें रघुनायकें। तैशीं या जोशाचीं वाक्यें।

त्या बंडलोकीं सत्य केलीं ॥ ' अशा रीतीनें सर्व दोष लोकांचीं कर्मे, बेइमान आणि भवितव्य यांजवर टाकून अनंतफंदीनें बाजीरावाची बाजू संभाळण्याचा प्रयत्न केला. तो पाहून बाजीराव इतका खुष झाला असावा कीं, आपण मोठे पट्टीचे मुत्सद्दी ठरावें अशा प्रकारचा मजकूर लिहून त्यानें अनंतफंदीपाशीं दिला. त्याबरहुकूम अनंतफंदीनें माधव-ग्रंथाचे पहिले पांच अध्याय लिहिले आणि अगोदरच लिहिलेलें दुष्काळ व पेंढार यांचें वर्णन त्याला जोडून दिलें. 'असो पंचमाध्यायीं संपली कथा । प्रायश्चित्त चिमणाजी रघुनाथा । देऊनियां पुन्हां मागुता । बाजीराव जे स्थापिले ॥ आतां येथूनियां बंड प्रकरण । श्रोते परिसा सावधान । कैसें पृथ्वीचें लुटण । जाहलें ऐका चतुर हो ॥ ' सहावा अध्याय पहिल्या पांच अध्यायांस जोडण्यासाठीं दिलेली ही जोड कृत्रिम वाटते. त्याचप्रमाणें पांचव्या अध्यायांतील बाजीरावनिंदेच्या चार ओंव्याहीं नंतर घुसडलेल्या असून त्या १८१८ नंतर रचलेल्या आहेत, हें त्यांतील उल्लेखावरून उघड दिसतें. इंग्रजी अंमल होण्याच्या सुमारास बाजीराव आणि अनंतफंदी यांचें बिनसलें असावें असें लावण्यांतील वर्णनावरून दिसतें.

यशवंतराव होळकरांवर अनंतफंदीनें पोंवाडा केला आहे; त्यांत पुणें लुटलें त्यासंबंधांत होळकराचा गौरव केला आहे. त्यावरून त्या वेळीं अनंत-फंदी व बाजीराव यांचें बिनसलें असावें असेंही एक अनुमान रा. यशवंतराव काढितात. तें चुकीचें दिसतें या पोंवाड्यांत पुण्याच्या लुटीपर्यंत म्हणजे १८०२ पर्यंतच्याच होळकराच्या कामगिरीचें वर्णन आहे. त्यानंतर १८०४ पासून यशवंतराव होळकराचें इंग्रजाशीं युद्ध चालू होतें. पोंवाड्यांतील गौरव ऐकून घेण्याचे त्याचे दिवस राहिले नव्हते; या दोन्ही गोष्टींवरून हा पोंवाडा यशवंतराव पुण्यांत असल्यावेळीं त्याचा गौरव करण्यासाठीं लिहिला असावा. होळकर पुण्यांतून गेल्यावर दुष्काळ पडला; त्यानंतर माधवग्रंथाचा सहावा अध्याय लिहिला. त्यांत बाजीरावाची स्तुति आहे. यावरून इंग्रजांच्या साहाय्यानें बाजी-राव पुनः राज्यावर आल्यानंतर होळकराची स्तुति केल्याचा दोष धुवून काढण्या-साठीं व बाजीरावाला खुष करण्यासाठीं माधव-ग्रंथाच्या सहाव्या अध्यायाची रचना झाली असावी. म्हणजे होळकराचा पोवाडा पूर्वी रचला व हा अध्याय

मागाहून लिहिला. सहाव्या अध्यायास पहिले पांच अध्याय नंतर जोडले गेले असावे. सहावा अध्याय दुष्काळानंतर म्हणजे इ. स. १८०५ सालानंतर लिहिला गेला; त्या सुमारास अनंतफंदी व बाजीराव यांचें बिनसलेलें नसून उलट चांगलेंच सूत असलें पाहिजे. कीर्तनाच्या सोईसाठीं निरनिराळ्या वृत्तांत जी माधव-ग्रंथाची आवृत्ति अनंतफंदीनें बनविली तींत दुष्काळवर्णन किंवा रावबाजीची राज्यभ्रष्टता यांचा उल्लेख नाहीं.

माधव-ग्रंथाच्या पांचव्या अध्यायाच्या शेवटास 'धोंडीबा, बाळोबा, नानाही गेले । तीच अवस्था भाऊची ॥' असा उल्लेख आहे, त्यावरून हा अध्याय इ. स. १८०० नंतर लिहिलेला असावा. इ. स. १८०० नंतर शिंदे-होळकरांच्या लढयांत बाजीराव सांपडलेला होता. १८०२ मध्यें त्यानें वसईचा तह केला. त्यानंतर १८०५ पर्यंत दुष्काळ होता. त्यानंतर स्थिर-स्थावर झाल्यावर अनंतफंदीनें पेंढार व दुष्काळ यांचें केलेलें वर्णन व त्यांत आपणाला दोषमुक्त केल्याचा प्रकार पाहून रावबाजीनें स्वहस्तें कथानक लिहून दिलें व त्यावरून अनंतफंदीनें पहिले पांच अध्याय लिहिले व ते पूर्वीच रचलेल्या सहाव्या अध्यायास जोडून माधव-ग्रंथ पूर्ण केला असें वाटतें.

'माधवकवन' असें या ग्रंथांचें नांव पहिल्या पांच अध्यायांत दिलें असून सहाव्याचे शेवटीं 'माधवग्रंथ' असे आहे. या ग्रंथांतील कथांविषयीं अनंत फंदी म्हणतो, 'पूर्वी पांडवांच्या ख्याती । राजेरजवाडयांच्या किताबती। दामाजीपंताच्या बखरा वाचिती । त्या पुढें तैशाच होतील ॥' हा ग्रंथ लिहिण्याच्या वेळीं 'सर्वत्रां लहानथोरां । अनंतफंदी ठाउका ।' ही स्वतःची ख्याति फंदीबुवांनीं पहिल्याच अध्यायांत सांगितली आहे. ग्रंथकार अनंत फंदी असला तरी मूळ लेखक खुद्द रावबाजी! त्यानें नाना फडणवीस, पर-शरामभाऊ पटवर्धन व दौलतराव शिंदे यांना कपटी, बुद्धीचे चंचल व धर-सोडीचें वर्तन करणारे निमकहराम ठरवून स्वतःला सच्चा, उदार, शूर, सरळ मनाचा आणि मोठा राजकारणी असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. बाजीरावानें बनविलेल्या इतिहासाशीं खऱ्या इतिहासाची किती तफावत आहे तें पुढें पाहूं. सध्या माधवग्रंथांतील काव्यगुणांची चर्चा या लेखांकांत करा-

वयाची आहे. सहाव्या अध्यायाची चर्चा रामजोशांचा दुष्काळावरील पोवाडा देतांना आलीच आहे. पेंढाऱ्यांचे अत्याचार वर्णन करितांना हास्यरसाचें मिश्रण केल्यानें आणि दुष्काळांतील हालअपेष्टा सांगतांना बीभत्सरसाची जोड दिल्यानें करुणरसाला कसें व्यंग आलें आहे, तें तेथें दाखविलें आहे. सवाई माधवरावाच्या निधनामुळें मराठी राज्याची झालेली स्थिति वर्णन करण्यासाठीं दिलेल्या उपमा फार सुंदर आहेत. 'गत झाले माधव नारायण। लोकांस केलें शोकपरायण। टाकूनि गेले विघ्न–वारायण। दीप दक्षिणचा मालवला ॥ देवावांचूनि देऊळ सुनें। कीं नासिके वांचूनि वदन। कीं पुत्रावांचूनि जैसें सदन। व्यर्थ काय तें जाळावें ॥ कीं गळ्यावांचूनि गायन। कीं बुबुळावांचोनि नयन। कीं शरीर जैसें प्राणावीण। पंडितावीण सभा जैशी ॥ कीं शुरत्वावांचोनि शिपाईगिरी। कीं पतिवांचूनि दिव्य नारी। कीं हिऱ्यावांचूनि मुद्रिका करीं। कीं यजमानावांचूनि याचक ॥ कीं चंद्रावांचूनि तारांगण। कीं वस्त्रावांचूनि शरीर नग्न। कीं वरावांचूनि जैसें लग्न। शोभूं नेदी सर्वथा ॥ तैसें श्री माधवावांचूनि। भयानक भासे पृथ्वी सुनी ॥' 'घाशीरामांतक' सवाई माधवराव निधन पावल्यावर 'एकचि जाला हलकल्लोळ। नाना पिटीत वक्षस्थळ। जीवजंतु समस्त पक्षीकुळ। शोकार्णवीं पडियेलें ॥ × × ×। श्री माधवें केलें इतुकें। पुढें दुःख कितुकें कळेना ॥'

थोरल्या बाजीरावाचा औरस वंश असतां यशोदाबाईच्या मांडीवर दत्तक द्यावा, या नानाच्या सूचनेवर दौलतरावानें 'औरस असतां दत्तक कशाला?' असा जो खोंचदार प्रश्न केला त्याला पुष्टि देणारा कोटिक्रम मोठा चातुर्याचा आहे. 'अदुग्ध नसतां मुलाची माय। मग दुधाचें कारण काय?। जरी नसते आपा बाजीराय। मग दत्तक घेणेंचि प्राप्त ॥ पदरीं असतां लाखों धन। मग कासया व्याजी ऋण। टाकोनियां गंगाजीवन। कूपोदक तें कासया ॥ सागवानी मोडोनियां घर। उभे करावें येरंड शेर ॥ जिवंत असतां लग्नवर। मग कां करावा पाटाचा ॥ × × ×। क्षुधेनें पीडिलीं घरचीं मुलें। इतरां सांगे भोजना ॥ × × ×। बोलत येत असतां तोंडें। मुक्यानें कां खुणवावें ॥ घरचा दीप विझवुनियां। परगृहीं अग्नि कां मागावा ॥ घरचीं असोनी भारती

कटकें ( सैन्य )। मग मर्कटकें ( इंग्रज ? ) कां ठेवावीं ॥ असोनी वाळ्याचा पंखा शीतळ। मग रुमाल कां वारावा ॥ टाकोनियां उत्तम चंदन। मग कां धुंडाळावें बाभुळवन। हिरा टाकोनि देदीप्यमान। मग गारा कां वेंचाव्या ॥' हा कोटिक्रम आणि 'शिंद्याचें सामर्थ्य पाहोनि बिकट। नाना निस्तेज होऊनि फिकट। चिंता ज्वरें व्यापिला ॥' व मनांत उमजला कीं, 'शिंदा आमुच्या शहाणपणा। चालों नेदी सर्वथा' अशा समर्पक उपमा माधव-ग्रंथांत अनेक आहेत. शिंद्याच्या भयानें नाना फडणीस बाजीरावाकडे अभय मागावयास गेला तेव्हां आपला बाप व आई यांना व स्वतःलाही नानानें कसें छळलें; रघुनाथरावाच्या वंशाला नमस्कार न करण्याची त्यानें कशी प्रतिज्ञा केली होती याची आठवण देऊन बाजीराव स्वतःची थोरवी गातो कीं, 'चिरंजीव मी थोराचा थोर। शरण आल्यासि वांचविणार। मम शत्रू तरी कां असेना ! । लोह जरी परसावरी। आदळूनियां ताडिला जरी। तरी तो लोहाचें सुवर्णचि करी। स्वभावगुण न टाकी ॥ कुठार घातली मैलागिरी-वरी। राय राय तुकडे केले जरी। तरी त्याचा सुवास दिगंतरीं स्वभावगुण न टाकी ॥ सज्जनासि भेटला दुर्जन। तो कसेंही करी त्याचें छळण। परी दुर्जनाचेंच इच्छी कल्याण। स्वभावगुण न टाकी ॥ कागदीं बांधोनि कस्तुरीचे पुडे। फेंकूनि दिधले एकीकडे। तरी त्यांचा सुवास लोपे ऐसें न घडे। स्वभावगुण न टाकी ॥ तैसे तुम्ही मला साहेब दादा। मी तुमचें वाईट न करीं कदा। मज पुढें काय करितो शिंदा। तीनदा किती सांगावें ॥' या बाळाचे 'स्वभावगुण' पुरे जाणणाऱ्या नानाफडणिसानें त्यावर अवलंबून न राहातां साताऱ्यास प्रयाण केलें. 'तुमचा माझ्यावर विश्वास नाहीं, परश-रामभाऊवर मात्र आहे' असें दौलतराव आपल्या कैदेंत मिळालेल्या बाजी-रावास म्हणाला, तेव्हां बाजीरावानें 'भाऊ' या शब्दावर कोटि करून दौलतरावाला त्याच्या पूर्वजांनीं पानिपतावर स्वामिकार्यार्थ इमानास जागून जीव दिल्याची आठवण दिली; 'तुजवर आमचा विश्वास। नाहीं ऐसें बोलतोस। भाऊवर (परशरामभाऊ) फार विशेष। हें काय बोलणें ये वेळीं ॥ पानपतावर भाऊ ( सदाशिवराव ) मेले। पूर्वज तुमचे त्यासवें गेले। जरि

कसेंही स्वामींनीं बाईट केलें । तरी मरावें धन्यार्सगें ॥ हा धर्म तुझा परंपरा । चालत असला महावीरा । तर तुम्हीही कबूल करा । मागील काय आठवितोसी ॥ ' अशा भाषणांनीं आपण शिंद्याचें मन वळवून पेशवाई मिळविली अशी बाजीरावाची प्रौढी आहे. नानाचें महाडचें अवाढव्य घरभेदें कारस्थान बाजीरावाच्या खिसगणतींत नव्हतें. माधव ग्रंथाच्या पहिल्या पांच अध्यायांचा सारांश अनंतफंदीनें दिला आहे तो असा कीं, ' प्रथमाध्यायीं कथा जाणा । शिंद्यांनीं मृदु केलें नाना । मोडूनियां दत्तकाचीया कसणा । सेवकपणा राखिला ॥ भाऊ, धोंडिबा, बाळोबानें । श्रीमंतांशीं एकांत करून । कीं धरावे बाळाजी जनार्दन । द्वितीयाध्यायीं हेचि कथा ॥ रायाजी पाटील येऊनी । भाऊस फजीत केलें त्यांनीं । कीं नेलें आपालागूनी । तीच कथा तृतीयाध्यायीं ॥ चवथे अध्यायी भाऊच्या मता । चिमणा बैसविले दत्ता । त्रिवर्गासही त्रासा बहुता । भाऊ बाळोबा देतसे ॥ पंचमाध्यायीं जाणपां । जबरदस्तीनें चिमणा आपा । यशोदाबाईच्या ओटीत नृपा । आपा भूपातें दीधलें ॥ आपासाहेब होते दत्त । त्यास देऊनियां प्रायश्चित । पुनः दत्ताचे केले अदत्त । चिमणाजी रघुनाथ पुनः केले ॥ ' या एकंदर कथेंत शिंदे-होळकरांची यादवी, गंगाधरशास्त्र्याचा खून, रावबाजीची राज्यभ्रष्टता या गोष्टी येत नाहींत; म्हणून तत्संबंधींच्या चार ओंव्या मागाहून घुसडलेल्या दिसतात. असो. माधवग्रंथांतील इतिहासांत कसा सत्यापलाप केला आहे तें पुढील लेखांकांत येईल.

---

## माधवग्रंथ

प्रताप असतो यत्किंचित । परंतु कवीचा लाघव बहुत ।
तैसा येथें अनर्थ अत्यद्भुत । कवीनें यत्किंचित वर्णिलें ॥

—माधवग्रंथ.

माधवग्रंथाच्या पहिल्या पांच अध्यायांतील कथानकाचा काळ सवाई माधवरावाच्या मृत्यूपासून बाजीराव गादीवर येईपर्यंत म्हणजे २५ आक्टोबर १७९५ पासून नोव्हेंबर १७९६ पर्यंतचा आहे. या काळांतील हकीकत सेव-

दल्या बाजीरावानें लिहून दिली; त्याबरहुकूम अनंतफंदीनें ओंवीबद्ध रचना केली. चौथ्या अध्यायाच्या शेवटीं फंदीबुवा म्हणतात,

"स्वस्ति श्री माधवकवन सुंदर।
संमत बाजी रघुनाथ पत्राधार।
पदरचें यांत नसे अणुमात्र।"

१२ फेब्रुवारी १७९४ रोजीं महादजी शिंदे वारले. महादजी ह्यात असेपर्यंत पेशव्यावर कडा अंमल चालविण्याचा नानांचा मगदूर नव्हता. महादजीच्या मृत्यूनंतर नानांस कोणाचा वचक राहिला नाहीं. दौलतराव शिंदे यांस शिंदेशाहीच्या सुभेदारीचीं वस्त्रें देखील एक वर्षपर्यंत दिलीं नव्हतीं; परंतु खडर्याच्या लढाईची तयारी करण्याच्या वेळीं नाइलाज झाल्यामुळें १५ फेब्रुवारी १७९५ रोजीं शिक्का, कटयार व वस्त्रें दौलतरावास देण्यांत आलीं. पेशव्याच्या वाढत्या वयाबरोबर नानांच्या शिस्तीचा करडेपणा इतका वाढत चालला कीं, ही ताबेदारी असह्य होऊन खडर्याच्या विजयानंतर अवघ्या नऊ महिन्यांनीं त्या मानी व तेजस्वी तरुण पेशव्यानें आत्महत्त्या केली. माधवग्रंथाच्या कथानकाला येथून सुरवात होते. सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर नानांनीं दत्तकाचा व्यूह रचला; त्यास दौलतराव शिंद्यानें कसून विरोध केला. शिंद्यापुढें आपलें शहाणपण चालणार नाहीं हें जाणून नानांनीं असा विचार केला कीं, बाजीरावास पेशवेपदावर शिंदे बसविणार त्यापेक्षां आपणच तें श्रेय घ्यावें. साधल्यास बाजीरावाचा धाकटा भाऊ चिमाजी आप्पा यालाच मृत पेशव्याची विधवा यशोदाबाई हिच्या मांडीवर दत्तक देऊन पेशवा करावा; म्हणजे औरस वंशज दूर करून भलताच दत्तक घेणें योग्य नाहीं, ही शिंद्याची सबबही आपोआप दूर होईल. त्याचप्रमाणें चिमाजी आप्पा हा बाजीरावाप्रमाणें प्रौढ नसून अल्पवयस्क असल्यामुळें तोही सवाई माधवरावाप्रमाणेंच आपल्या हातीं बाहुलें होऊन राहील. ३ मार्च १७९६ रोजीं नानांनीं बाजीराव आणि चिमाजी आप्पा यांना जुन्नराहून परशुरामभाऊ पटवर्धन यांच्याकडून आणवून खडकीस ठेविलें. येथें माधवग्रंथाचा पहिला अध्याय संपतो.

या उभय बंधूंस खडकीस आणल्यावर नानांनीं असा थाट घातला कीं, येथून चिमाजी आप्पास पुण्यास नेऊन पेशवा करावें आणि रावबाजीस सिंहगडावर नेऊन कैदेंत ठेवावें; परंतु बाजीरावाला या बेताचा सुगावा लागला आणि त्यानें ही बातमी शिंद्यास कळविण्याची तजवीज केली. ताबडतोब शिंद्यानें नानांस निरोप पाठविला कीं, "मी आल्यावर आपणां सर्वत्रांच्या गांठी पडतील. तेव्हां तुम्ही, आम्ही, श्रीमंत वगैरे सर्वांच्या विचारें ठरेल तसें करूं; तोंपर्यंत मध्यें तुम्हीं कांहीं गडबड केली तर ती कामीं पडणार नाहीं. " ऐसें सांगतां वकिलांहीं। हिरमोड झाला नानाचा ॥ म्हणे जी जी करावी मसलत। साध्य तितुकी असाध्यचि होत। नदी उतरोनियां समस्त। कांठाजवळी कां बुडावें ॥ × × ×। प्रवासाहुनी घरीं येतांच। वेशींत चोरें नागविलें ॥" शिंद्याच्या भीतीनें बाजीरावाच्या पायाला मिठी घालून नाना म्हणाले, " शिंद्याची मर्जी बुडवावें आम्हां। म्हणुनि प्रार्थना करितों तुम्हां। आतां स्वामींनीं करावी क्षमा। अपराधी जरी असलों मी ॥ आपुला सेवक अपराधी। तो आपणचि वधावा आधीं। स्वामीचा अपराधी दुसरा वधी। ऐसें सहसा न करावें ॥' नानांच्या ह्या क्लैब्याचा फायदा घेऊन त्यांना गतापराधांची आठवण बाजीरावानें दिली आणि स्वतःच्या औदार्याचा मोठा आव घालून नानांना आश्वासन दिलें. अनंतफंदी बाजीरावाच्या पत्राधारें म्हणतो, 'ऐसें ऐकून प्रभूचें मृदु वचन। नानास वाटलें समाधान। म्हणे स्वामींनीं माझे अवगुण। उदाराब्धींत सांठविले ॥' परंतु हा औदार्याचा समुद्र किती उथळ आहे, हें नाना पक्कें जाणून होते. त्याच्या अभयवचनावर विश्वास न ठेवतां नानांनीं सातार्‍याची वाट धरली. इतकी हकीकत माधवग्रंथाच्या दुसर्‍या अध्यायांत दिली आहे.

नानांच्या पलायनानें मोकळें पडलेल्या पुण्यांत बाजीरावानें स्वतःच्या नांवाची द्वाही, नाना पळाल्याच्या दुसरेच दिवशीं म्हणजे २३ मार्च १७९६ रोजीं फिरविली. त्याच्या दुसरे दिवशीं शिंदे पुण्यास पोंचले. त्यापुढील तिसरा अध्याय असा कीं, दौलतराव, बाळोबा तात्या पागनीस, धोंडीबा दादा आणि बाजीराव यांचा एकांत झाला. 'तुमच्यासाठीं नानासारखा सर्प आम्हीं दुख-

विला;त्याला बुडविण्याची मसलत केली; त्याला आतां धरून कैद करावा!' असें बाळोबानें सांगितलें असतां बाजीराव कबूल होईना. 'मी क्रियाभ्रष्ट। नानाविषयी होणार नव्हे ॥' 'नानाला मीं दादासाहेब म्हटलें त्याच्या प्राणाला धक्का लागूं देणार नाहीं.' असें बाजीरावानें सांगितलें. त्यामुळें दौलतराव खट्टू झाला. बाळोबा आणि परशुरामभाऊ यांनीं बाजीरावाला कैद करून चिमाजीला यशोदाबाईच्या मांडीवर देण्याचें ठरविलें. थेऊरच्या गणपतीपुढें शपथक्रिया झाली. चिंतोपंत लिमये याला पाठवून नानांना हा बेत कळविला. 'मग नानासही आनंद जाहला। चिंतोपंतालागीं बोलला। म्हणे सत्वर भटाभिक्षुकाला। विधानपत्रिका पाठवा ॥' 'भाऊ सांगतील तसे चाला।' असा नानांनीं बाबा फडक्यास निरोप सांगितला. पिंगळे, परचुरे, मेहेंदळे, थत्ते, ठोसर, गोखले, धायगुडे असे अनेक सरदार या मसलतींत होते. बाजीराव तेवढा सच्चा आणि तो सच्चेपणा पाहून परशरामभाऊ वगैरे त्याच्यावर रागावले इतकेंच नव्हे, तर नानादेखील उलटले असें येथें दाखविलें आहे.

ऐतिहासिक पुराव्यावरून जी वस्तुस्थिति दिसते ती अशी कीं, बाजीरावाचें नादान व दुष्टपणाचें वर्तन पाहून दौलतराव शिंदे, आणि परशुराम भाऊ पटवर्धन यांनीं बाजीरावास कैदेंत ठेऊन चिमाजी आप्पास दत्तक करून पेशवाईच्या गादीवर बसवावें असें ठरविलें. नानांनीं पूर्वी हाच बेत केला होता; अर्थात् तो नानांस पसंत पडेल अशी त्यांची अपेक्षा होती. त्याप्रमाणें नानांचा निरोपही आला. बाजीरावानें औदार्यानें शिंद्याच्या कचाटयांतून नानांना सोडविल्यामुळें बाजीराव शिंद्याच्या रोषास पात्र झाला; ही माधव-ग्रंथांतील मखलाशी खोटी आहे.

नानाच्या संमतीनें केलेलें कारस्थान कसें सिद्धीस गेलें तें माधवग्रंथाच्या चवथ्या अध्यायांत सांगितलें आहे. "रायाजी पाटील याणें भाऊंच्या कार-स्थानाचा निषेध केला. 'पटवर्धनांचें घराणेंच बेइमानी; पूर्वी गोपाळराव पटवर्धन मोंगलांस जाऊन मिळाले होते; तसें वडिलांचें अनुकरण तुम्हीं करूं नका. पकडण्याच्या भानगडींत एकाचा किंवा दोघांचाही घात झाला, तर तुम्हांला

कोणी जिवंत राहूं देणार नाहीं. ' असें रायाजी म्हणाला. त्यावर ' भाऊ म्हणे कशास या दहशती । धनी जरी मारले गेलेती । तरी फार चांगलें म्हणती । " शेवटीं धोंडीबादादानें युक्ति सुचविली, आणि चिमाजी आप्पाला तेथेंच ठेऊन शिंद्याच्या लष्करांत जाण्यास रावबाजीचें मन वळविलें. चिमाजी आप्पाला चांगलें पटवून बाजीराव शिंद्याच्या लष्करांत गेला व तेथें कैद झाला. परशराम-भाऊ चिमाजी आप्पास घेऊन जाऊं लागले. चौथ्या अध्यायांतील ही हकीकत पांचव्या अध्यायांत अशा रीतीनें पूर्ण केली आहे कीं, चिमाजी आप्पास जबरदस्तीनें उघडेंबोडकें एक धोतर व एक उपवस्त्र यांनिशीं, तो रडत ओरडत असतां, परशुरामभाऊंनी उचलून नेवविलें व सवाई माधवरावाची विधवा यशोदाबाई ही चिमाजी आप्पास दत्तक घेण्यास नाखूष असतां, दत्तक न घेतल्यास आपली विटंबना करण्यांत येईल या धास्तीनें तिनें दत्तविधान होऊं दिलें. त्यानंतर बाजीरावाची सुटका कशी झाली व तो गादीवर कसा आला, तें माधवग्रंथांत सांगितलेलें नाहीं. " ज्यांनी ज्यांनीं आपा ऐकले । तितुकेही मागेंपुढें गेले । धोंडीबा बाळोबा नानाही गेले । तीच अवस्था भाऊची ॥ आपासाहेब केले होते दत्त । त्यास देऊनियां प्रायश्चित्त । पुन: दत्ताचे केले अदत्त । चिमणाजी रघुनाथ पुन: केले ॥ " असें अचानकपणें सांगून माधवग्रंथांतील कथानक संपतें.

बाजीराव कैदेंतून सुटला, चिमणाजी रघुनाथ पदभ्रष्ट झाला, हा योग कांहीं यदृच्छेनें घडून आला नाहीं. माधवग्रंथ त्या बाबतींत मौन धरून आहे; परंतु इतिहासांत त्या कारस्थानाचें भरपूर वर्णन आहे.

चिमाजी आप्पास दत्तक करण्याची मूळची कल्पना नानांची. शिंदे व परशुराम भाऊ यांनीं ती अंमलांत आणिली. नानांनीं त्या कामीं हातभारही लाविला. परंतु नानांचा जसा बाळोबा तात्या वगैरेंवर विश्वास नव्हता, तसा शिंदे व बाळोबा इत्यादिकांचा नानांवर विश्वास नव्हता. सातारकर छत्रपतींच्या सहाय्यानें शिंदे व भाऊ यांना शह देण्याचा नानानें यत्न केला, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. नानानें सर्व किल्ले व सरंजामाचा मुलूख सोडून देऊन स्वस्थ बसावें; कारभारांत ढवळाढवळ करूं नये, या बाळोबा तात्याच्या

शर्ती परशुरामभाऊंनाही पटल्या. नानांची समजूत पाडण्यास परशुरामभाऊंनीं आपला दिवाण चिंतोपंत लिमये याला पाठविलें. परंतु त्याला स्पष्ट जबाब न देतां चालढकल करून आपली कारवाई करण्यास नानानें सुरवात केली.

२६ मे १७९६ रोजीं चिमाजी आप्पाला पेशवाईचीं वस्त्रें छत्रपतींकडून मिळालीं. त्या कामीं नानांनीं आडकाठी केली. तिचा उपयोग न होतां नानांसच सातारा सोडणें भाग पडलें. नानांचें वित्त, अब्रू, किंवा जीवित यांना धक्का न लागतां आपल्या चिरंजीवांकडून नानांना टोंक्यास सुरक्षित पोंचविण्याची हमी परशुरामभाऊंनीं घेतली. पण उलट भाऊंना भोळसर व मूर्ख ठरवून नाना ४ जून १७९६ रोजीं रायगडास गेले; आणि तेथील हवा मानवेना असा बहाणा करून दोन दिवसांनीं महाडास गेले. चिमाजी आप्पाची पेशवाई दूर करण्याचें व ज्याचे पाय पेशवाईस लागल्यानें मराठी राज्य धुळीस मिळेल असें नानांनींच भाकीत केलें होतें, त्या रावबाजीला गादीवर आणण्याचें सुप्रसिद्ध ' महाडचें कारस्थान ' रचण्यास नानांनीं सुरवात केली. बावीस वर्षे चालविलेल्या अधिकाराचा लोभ न सुटल्यामुळें, नानानेंच प्रथम जें धोरण घातकी असें ठरविलें होतें, त्याच धोरणाचा स्वतः पुरस्कार करून शेवटीं रावबाजीला पेशवेपद दिलें. निजामअली व नागपुरकर भोंसले यांना पैसे व मुलूख यांच्या मोठाल्या देणग्या देण्याचे करार केले; कोल्हापुरकरांस परशराम भाऊच्या मुलुखावर स्वारी करण्यास उठविलें व पुढें मागें परशुरामभाऊंनीं सूड घेतल्यास बचाव करण्याचें वचन दिलें; शिवाय दोन लाख रुपये रोख दिले. पटवर्धन घराण्यांतील मिरजकर व कुरुंदवाडकर यांच्यांत भाऊबंदकीचा कलह उत्पन्न करून परशुरामभाऊंना कमजोर केलें. परंतु या सर्वांहून घरबुडवेपणाचें काम करून नानांनीं रावबाजीस धडा घालून दिला. तो हा कीं, दिल्लीहून व उत्तर हिंदुस्थानांतून शिंद्याचें उच्चाटण करण्याची फूस देऊन त्यानें इंग्रजांना उठविलें. सर्जेराव घाटग्याच्या सुंदर मुलीवर दौलतराव शिंद्याचें मन गेलें होतें. त्या घाटग्याला फितूर करून घेऊन दौलतरावाचें मन त्याचे कारभारी व सरदार यांजविरुद्ध वळविलें आणि दौलतरावांकडून बाळोबा, धोंडीबा आणि सदाशिव मल्हार या त्याच्याच

कारभाऱ्यांस कैद करविलें. २६ ऑक्टोबर १७९६ रोजीं हे कारभारी कैद झाले. परशुरामभाऊ वैद्य यांना पाठवावयाची एक चिठी चुकून परशरामभाऊ पटवर्धनांच्या हातीं लागल्यामुळें भाऊ सावध होऊन, चिमाजी आप्पास घेऊन पळाले; परंतु त्यांचा पाठलाग करून त्यांनाही कैद करण्यांत आलें. बाजीराव पेशवा झाला; नाना त्याचे कारभारी झाले! दौलतरावाच्या मदतीनें पुढें १७९७ त बाजीरावानें नानास कैद केलें. नानांनीं ज्या करवीरकरांचें परशुरामभाऊंबरोबर वैर उपस्थित केलें, त्यांच्याशीं झालेल्या लढाईत जखमी होऊन १७९९ सालीं परशुरामभाऊ करवीरकरांच्या हातीं लागले असतां, त्यांचा क्रूरपणानें वध करण्यांत आला. ज्या सर्जेराव घाटग्याचें प्रस्थ नानांच्या कारस्थानांमुळे शिंद्याच्या दरबारांत वाढलें, त्यानें बाळोबा तात्या, धोंडीबा दादा, नारायणराव बक्षी वगैरे शिंदेशाहींतील सरदार व मुत्सद्दी यांना ठार मारण्याचा हुकूम दौलतराव निशेंत असतां त्याजकडून घेऊन, बत्तीस जणांस इ. स. १८०० सालीं मे महिन्यांत एकाच रात्रींत तोफेच्या तोंडीं दिलें. त्याच सर्जेरावानें पुढेंही शिंदेशाहींत धुमाकुळ माजविला आणि शेवटीं दौलतरावानें मानाजी फांकड्याचा मुलगा आनंदराव याजकडून त्याचा खून करविला. परंतु त्याच्या कृत्यांमुळें शिंदेशाही कमकुवत होऊन इंग्रजांच्या पचनीं पडली. नानांच्या 'महाडाच्या कारस्थानाचे' परिणाम असे घडले. नानांचे चरित्रकार रा. खरे म्हणतात, "या महाडच्या कारस्थानाचा विचार करतां त्यांतील प्रमुख घटक म्हणजे शिंदे, होळकर, भोसले, इंग्रज, निजाम व नाना हे सहा सत्ताधारी डोळ्यांसमोर उभे राहातात. या घटकांचीं नांवें वाचतांना सर्कशींत वाघ, सिंह, आस्वल, हत्ती वगैरे जंगली क्रूर जनावरांचें संमेलन भरवितात त्याची आठवण झाल्यावांचून राहात नाहीं. महाडच्या कारस्थानापासून मराठी राज्यास अथवा खुद्द नानांस सुद्धां कांहींएक फायदा झाला नाहीं. उलट तेजोभंग, उपवास, कारागृहवास आणि अखंड चिंता यांचें चक्र जें त्यांच्या पाठीस लागून राहिलें त्यांतून मृत्यूनें त्यांची सुटका केली!"

'धोंडीबा बाळोबा नानाही गेले!' असा नानांचा अधिक्षेप माधवग्रंथांत करणाऱ्या अनंतफंदीनें नानांवर एक पोवाडा केला आहे. तो हिंदी भाषेंत

आहे. त्यांत अनंतफंदी म्हणतो: 'सवाई माधवराव सवाई डंका बजाया। फडणिस नानाकी तारीफ, अक्कलनें तो गजब किया ॥' त्यावर देवनाथाचें कवन आहे तें असें: अनंतफंदीनें नाना फडणीसके अक्कलकी तारीफ कियी। क्या है उसकी अक्कल दौलत पेशवे की डुबा दियी। निमकहरामी करे खाविंदपर; किने बजाया है डंका ? । देवनाथ कहे, मुझे गरज नहिं, राज्य डुबाया बम्मनका ॥

## फंदीचे पोवाडे

अनंत फंदीनें पुष्कळ काव्यरचना केल्याचा उल्लेख आढळतो. 'फंदी अनंत कवनांचा सागर' असें होनाजी म्हणतो. त्याची पुष्कळ कविता अप्रसिद्ध असल्याचा उल्लेख शाळिग्राम व रा. यशवंतराव यांनीं केला आहे. त्याच्या प्रसिद्ध झालेल्या कवितेंत निम्मेहून जास्त भाग माधवग्रंथ आणि पोवाडे यांनीं व्यापला आहे.

पोवाड्यांत पहिला मान खर्ड्याच्या लढाईच्या पोवाड्याचा. या लढाईच्या वेळीं नाना फडणीसाची सद्दी कळसास पोंचली. खर्ड्याच्या लढाईवर जे पोवाडे झाले त्यांत नानांचें वर्णन मुख्यत्वानें केलेलें आहे. अनंत फंदी हा तर बोलूनचालून पेशव्यांचा दरबारी कवि होता. त्यानें खर्ड्यावरील पोवाड्यांत सुमारें निम्मा भाग नानांच्या यशोवर्णनानें अडविला आहे, आणि नानांच्या पोवाड्याचा अर्धा भाग खर्ड्याच्या लढाईच्या वर्णनानें भरला आहे. यावरून नाना आणि खर्ड्याची लढाई यांचा परस्पर संबंध त्याला चांगलाच कळलेला दिसतो. 'नानांतें राज्याचे अवले (कर्णधार)। विधात्यानें नेमून ठेविले। ××× । श्रीमंत गर्भी असतां, एकले। नानांनीं राज्य ठोकून हांकलें।' वगैरे नानांचें वर्णन अनंतफंदीनें उत्कृष्ट केलें आहे; त्यांत 'माझे करून महाभाव केले। जहाज बुद्धिबळें जबकलें।' याचा अर्थ लावण्यांत राजश्री यशवंतराव केळकरांनीं फार चातुर्य दाखविलें आहे. माझे (=मॉझे=खलाशी) म्हणजे चांगले खलाशी निर्माण करून कारस्थान (=महाभाव) केलें व राज्याचें

जहाज बुद्धिसामर्थ्यानें चालविलें, हा त्यांनीं लाविलेला अर्थ फार योग्य वाटतो. पोवाड्याचे अर्थ अनेक ठिकाणीं रा. यशवंतरावांनी अशाच चातुर्यानें लाविले आहेत. परंतु कित्येक ठिकाणीं मात्र उगाच अर्थाची ओढाताण केली आहे. उदाहरणार्थ, याच वर्णनांत ' जिकडे पहावें तिकडे उगवले । माधवराव पुण्याचीं पाऊलें ।' याचा ' पूज्यपाद् माधवराव सर्वत्र पहावें तिकडे उदय पावले ( त्यांची कीर्ती फांकली ) ' असा उघड अर्थ होत असतां ' उगवले– उगविणें=वसूल करणें, उगवण-वसूल. भावार्थ: सगळीकडून खंडण्या घेतल्या " अशी ओढाताण रा. यशवंतरावांनीं कोठें कोठें केलेली आहे. ' मीपणांत जे गर्वें भरले । ते नानांनीं हस्तकीं न धरले । ' याचा संबंध रा. यशवंतरावांनीं घाशीराम कोतवालाकडे लाविला आहे तो चुकीचा दिसतो. कारण 'घाशिराम कोतवाल त्यावर उलथुन पडली ब्रह्मपुरी ।' असा घाशिरामावर ब्राह्मण उलटले व त्याचा नाश झाला हा स्पष्ट उल्लेख पुढें आला आहे. त्या अर्थी असा मोघम उल्लेख करण्याची जरूर नव्हती. ' सवाई माधवराव सवारी भाग्योदय ज्यांचे पदरीं । यशवंत श्रीमंत पेशवे अपेश तेथें पाणि भरी ॥ ' या ध्रुवपदांतील ' अपेश पाणी भरतें ' म्हणजे अपेश क्षुद्र बनतें– नाहींसें होतें, हा ' पाणि भरी ' या वाक्प्रचाराचा अर्थ आतां बदलून उलट झाला आहे; हल्लीं आपण ' लक्ष्मी त्याच्या घरीं पाणी भरते ' म्हणजे विपुल होते असें म्हणतों हें लक्षांत घेण्यासारखें आहे. असो; या लावणीचे चौक दोन आहेत. पहिल्या चौकांत नानाच्या करामतीचें वर्णन झाल्यावर दुसऱ्या चौकांत लढाईचें कारण, जमलेल्या सरदारांची नांवनिशी, लढाईचें थोडेसें वर्णन आणि विजय यांची हकीकत आहे. ती फार त्रोटक आहे. याच वेळीं दौलतराव शिंद्याला सनदा मिळाल्या हा उल्लेख पोवाड्यांत आला आहे. लढाईचें वर्णन देतांना सुरवातीस ' पाण्यावरूनी तंटा झाला । ' असा शालिग्राम यांच्या पहिल्या आवृत्तींत पाठ होता. दुसऱ्या आवृत्तींत ' पाण्य- तरूनि तंटा झाला ।' असा पाठ आहे, तोच बरोबर व त्याचा अर्थ पाण्यत्= पैसा ( खंडणी ) असें रा. यशवंतराव केळकरांचें मत आहे. परंतु पाण्यावरून दोहों पक्षांच्या स्वारांच्या चकमकीस सुरवात झाली, असा ग्रँट डफचा उल्लेख

आहे. शिवाय 'पाण्यत्' हा शब्द अगदीं अपरिचित आहे. मुद्रितें तयार करतेवेळी एका कान्याच्या ऐवजी 'त्' असें अर्धाक्षर पडले असण्याचाही फार संभव आहे, ह्या गोष्टी विचारांत घेतल्या पाहिजेत. 'सर्पासंनिध उंदिर जाय । असा मृदु मोंगल केला ' हें फंदीकृत वर्णन यथार्थ आहे. खड्यांच्या लढाईला गौणपणा देण्याचा यत्न ग्रँट डफनें केला आहे. निजाम इंग्रजांपाशीं मदत मागत होता; परंतु सर जॉन शोअर या तत्कालीन गव्हर्नर जनरलाचें धोरण तटस्थपणाचें असल्यामुळें तो निजामाच्या मदतीस गेला नाही. याबद्दल इंग्रज इतिहासकार त्याला दोष देतात. या लढाईत इंग्रजांनी भाग घेणें त्यांच्या धोरणास अवश्य असतांही मराठे व निजाम यांनींच आपसांत लढाई आटोपली. याचा कांहींसा विषाद वाटून इंग्रज इतिहासकारांची मनःस्थिति 'द्राक्षें आंबट' अशा धोरणाची झालेली दिसते. प्रत्येक बाजूस ज्या लढाईत सुमारें दीड लक्ष सैन्य होतें, जेथें मराठ्यांचें सर्व सैन्य एकवटल्याचा शेवटचाच प्रसंग होता; ज्या युद्धाच्या अंतीं निजामाला अत्यंत अपमानास्पद, शर्ती देखील बिनतोड मान्य कराव्या लागल्या, त्या युद्धाला गौणत्व देण्याचा इंग्रजी प्रयत्न व्यर्थ होय. सर्व मराठी फौज मिळून 'तीन लक्षांचा एकच ठेला ।' असें बहुतेक शाहिरांनीं वर्णन केलें आहे ती अतिशयोक्ति असून त्यांनीं सैन्याचें संख्याबळ दुप्पट केलें आहे. विजय मिळाल्या वेळीं आपली फौज अगदीं कमी होती असें दाखविण्याची शास्त्रशुद्ध इंग्रजी कला त्या वेळीं अंमलांत आली नव्हती ! नाना फडणिसावरील पोवाड्यांत अनंत फंदीनें केलेलें लढाईचें वर्णन ' सब मिल हल्ला किया उडादिया नबाबके धुडके धुडके ।' या एकाच चरणांत आलें आहे. शेवटचे दोन चौक म्हणजे सुमारें अर्धा पोवाडा सरदारांची यादी व सटरफटर वर्णन यांनींच भरला आहे.

खड्यांच्या लढाईवर होनाजी बाळ व प्रभाकर यांचेही पोवाडे आहेत. होनाजी बाळाचा पोवाडा चार चौकी आहे. त्याच्या पहिल्या चौकांत नाना व श्रीमंत यांचें वर्णन आहे. 'तपसामर्थ्यें अपेश लपविलें ।' हें फंदीकृत वर्णन आणि ' नाना ज्ञानगभस्ती आसतां । करी स्वराज्य न्यून न दिसतां ।' हें होनाजी बाळाचें वर्णन यांत फार साम्य दिसतें. दुसऱ्या चौकांत सरदारांचा

जहाज बुद्धिसामर्थ्यानें चालविलें, हा त्यांनीं लाविलेला अर्थ फार योग्य वाटतो. पोवाडयाचे अर्थ अनेक ठिकाणीं रा. यशवंतरावांनीं अशाच चातुर्यानें लाविले आहेत. परंतु कित्येक ठिकाणीं मात्र उगाच अर्थाची ओढाताण केली आहे. उदाहरणार्थ, याच वर्णनांत ' जिकडे पहावें तिकडे उगवले । माधवराव पुण्याचा पाऊलें ।' याचा ' पूज्यपाद् माधवराव सर्वत्र पहावें तिकडे उदय पावले ( त्यांची कीर्ती फांकली ) ' असा उघड अर्थ होत असतां ' उगवले-उगविणें=वसूल करणें, उगवण-वसूल. भावार्थ: सगळीकडून खंडण्या घेतल्या " अशी ओढाताण रा. यशवंतरावांनीं कोठें कोठें केलेली आहे. ' मीपणांत जे गर्वें भरले । ते नानांनीं हस्तकीं न धरले । ' याचा संबंध रा. यशवंतरावांनीं घाशीराम कोतवालाकडे लाविला आहे तो चुकीचा दिसतो. कारण 'घाशिराम कोतवाल त्यावर उलथुन पडली ब्रह्मपुरी ।' असा घाशिरामावर ब्राह्मण उलटले व त्याचा नाश झाला हा स्पष्ट उल्लेख पुढें आला आहे. त्या अर्थी असा मोघम उल्लेख करण्याची जरूर नव्हती. ' सवाई माधवराव सवारी भाग्योदय ज्यांचे पदरीं । यशवंत श्रीमंत पेशवे अपेश तेथें पाणि भरी ॥ ' या ध्रुवपदांतील ' अपेश पाणी भरतें ' म्हणजे अपेश क्षुद्र बनतें-नाहींसें होतें, हा ' पाणि भरी ' या वाक्प्रचाराचा अर्थ आतां बदलून उलट झाला आहे; हल्लीं आपण ' लक्ष्मी त्याच्या घरीं पाणी भरते ' म्हणजे विपुल होते असें म्हणतों हें लक्षांत घेण्यासारखें आहे. असो; या लावणीचे चौक दोन आहेत. पहिल्या चौकांत नानाच्या करामतीचें वर्णन झाल्यावर दुसऱ्या चौकांत लढाईचें कारण, जमलेल्या सरदारांची नांवनिशी, लढाईचें थोडेसें वर्णन आणि विजय यांची हकीकत आहे. ती फार त्रोटक आहे. याच वेळीं दौलतराव शिंद्याला सनदा मिळाल्या हा उल्लेख पोवाडयांत आला आहे. लढाईचें वर्णन देतांना सुरवातीस ' पाण्यावरूनी तंटा झाला । ' असा शालिग्राम यांच्या पहिल्या आवृत्तींत पाठ होता. दुसऱ्या आवृत्तींत ' पाण्य-त्वरूनि तंटा झाला ।' असा पाठ आहे, तोच बरोबर व त्याचा अर्थ पाण्यत्= पैसा ( खंडणी ) असें रा. यशवंतराव केळकरांचें मत आहे. परंतु पाण्यावरून दोहों पक्षांच्या स्वारांच्या चकमकीस सुरवात झाली, असा ग्रँट डफचा उल्लेख

आहे. शिवाय ‘ पाण्यत् ’ हा शब्द अगदीं अपरिचित आहे. मुद्रितें तयार करतेवेळीं एका कान्याच्या ऐवजीं ‘ त ’ असें अर्धाक्षर पडलें असण्याचाही फार संभव आहे, ह्या गोष्टी विचारांत घेतल्या पाहिजेत. ‘ सर्पासंनिध उंदिर जाय । असा मृदु मोंगल केला ’ हें फंदीकृत वर्णन यथार्थ आहे. खडर्याच्या लढाईला गौणपणा देण्याचा यत्न ग्रँट डफनें केला आहे. निजाम इंग्रजांपाशीं मदत मागत होता; परंतु सर जॉन शोअर या तत्कालीन गव्हर्नर जनरलाचें धोरण तटस्थपणाचें असल्यामुळें तो निजामाच्या मदतीस गेला नाहीं. याबद्दल इंग्रज इतिहासकार त्याला दोष देतात. या लढाईत इंग्रजांनी भाग घेणें त्यांच्या धोरणास अवश्य असतांही मराठे व निजाम यांनीच आपसांत लढाई आटोपली. याचा कांहींसा विषाद वाटून इंग्रज इतिहासकारांची मनःस्थिति ‘ द्राक्षें आंबट ’ अशा धोरणाची झालेली दिसते. प्रत्येक बाजूस ज्या लढाईत सुमारें दीड लक्ष सैन्य होतें, जेथें मराठ्यांचें सर्व सैन्य एकवटल्याचा शेवटचाच प्रसंग होता; ज्या युद्धाच्या अंतीं निजामाला अत्यंत अपमानास्पद शर्ती देखील बिनतोड मान्य कराव्या लागल्या, त्या युद्धाला गौणत्व देण्याचा इंग्रजी प्रयत्न व्यर्थ होय. सर्व मराठी फौज मिळून ‘ तीन लक्षांचा एकच ठेला । ’ असें बहुतेक शाहिरांनी वर्णन केलें आहे ती अतिशयोक्ति असून त्यांनीं सैन्याचें संख्याबळ दुप्पट केलें आहे. विजय मिळाल्या वेळीं आपली फौज अगदीं कमी होती असें दाखविण्याची शास्त्रशुद्ध इंग्रजी कला त्या वेळीं अंमलांत आली नव्हती ! नाना फडणिसावरील पोवाड्यांत अनंत फंदीनें केलेलें लढाईचें वर्णन ‘ सब मिल हल्ला किया उडादिया नबाबके धुडके धुडके । ’ या एकाच चरणांत आलें आहे. शेवटचे दोन चौक म्हणजे सुमारें अर्धा पोवाडा सरदारांची यादी व सटरफटर वर्णन यांनींच भरला आहे.

खडर्याच्या लढाईवर होनाजी बाळ व प्रभाकर यांचेही पोवाडे आहेत. होनाजी बाळाचा पोवाडा चार चौकी आहे. त्याच्या पहिल्या चौकांत नाना व श्रीमंत यांचें वर्णन आहे. ‘तपसामर्थ्यें अपेश लपविलें ।’ हें फंदीकृत वर्णन आणि ‘ नाना ज्ञानगभस्ती आसतां । करी स्वराज्य न्यून न दिसतां । ’ हें होनाजी बाळाचें वर्णन यांत फार साम्य दिसतें. दुसऱ्या चौकांत सरदारांचा

गांवें व वर्णनें आहेत. तिसऱ्यांत युद्धाचें वर्णन आहे तें फारच बहारीचें आहे. तहाच्या अटी निजामावर लादून तो पर्वतासारखा असतां त्याला मोहरी एवढा बनवून 'करुनि नगाची राई। जयवाद्यें वाजवीत परतली श्रीमंतांची शाई ( सेना ) ॥' चौथ्या चौकांत विजयी श्रीमंतांचें पुण्याला पुनरागमन झाल्याच्या थाटाचें वर्णन आहे व शेवटीं सवाई माधवरावांनीं शके सत्राशें सत्रा आश्विनी पौर्णिमेस अवतार संपविल्याचा उल्लेख आहे. त्यावरून हा पोवाडा लढाईनंतर पुष्कळ कालांतरानें सवाई माधवरावाच्या निधनानंतर होनाजीनें रचला असें दिसतें.

प्रभाकराचा पोवाडा सहाचौकी आहे. त्यांत सवाई माधवरावाची सबंध कारकीर्दच वर्णिली आहे. बारभाईंच्या खटपटी, राघोभरारीचा पराभव, इंग्रजांचा पराभव, श्रीमंतांची मुंज व लग्न, टिपूचा पराभव इतक्या गोष्टी पहिल्या चौकांत येतात. महादजीचें आगमन, दरबाररंग, महादजीचा मृत्यु, हरिपंत फडक्याचा मृत्यु व सुरवातीची तयारी यांचें वर्णन दुसऱ्या चौकांत आहे. फ्रान्समधील foreign legion प्रमाणें मराठ्यांकडे रजपूत, मुसलमान, मराठे वगैरे रणशूर 'एकांडे' शिलेदार स्वतंत्र बाण्याचे, कोणाही सरदाराच्या चाकरीस न राहिलेले असे होते, त्यांचा या चौकाच्या अंतीं उल्लेख आहे. तिसरा, चौथा व अर्धा पांचवा चौक यांत शिंदे, होळकर व पटवर्धन यांच्या फौजांतील सरदारांची नांवनिशी आहे. पांचव्या चौकाच्या उत्तरार्धांत लढाईचें वर्णन आहे. 'एकंदर पोवाड्याचा विस्तार पाहातां हें वर्णन फार संक्षिप्त आहे' हा रा. यशवंतरावांचा अभिप्राय फारसा गैर नाहीं. परंतु 'या लढाईवरील इतर पोवाड्यांतून रणमैदानाचा व हालचालीचा चित्रपट जसा डोळ्यांपुढें उभा राहातो तसा याच्या वर्णनानें राहात नाहीं;' हा रा. यशवंतरावांनीं स्वतःच्या लाडक्या शाहिरावर केलेला दोषारोप चुकीचा दिसतो. अनंतफंदी, होनाजी आणि प्रभाकर यांनीं केलेलें प्रत्यक्ष लढाईचें वर्णन पाहिल्यास याविषयीं खात्री होईल.

अनंतफंदी—"श्रीमंतांनीं करूनि हल्ला। घ्या घ्या म्हणुनी कैक धुडावुन दिले लुढावुन, *मोंगल गोगल गाय। करूनियां पृथ्वी देईना ठाय। मोकली धाय*

करित हायहाय। तेव्हां लेंकुरा विसरली माय। कैक जरबानें खालीं पाहे। कीं सर्पासन्निध उंदिर जाय। असा मृदु मोगल केला।'

होनाजी—"होतां रणखंदाळी यंत्रांचे भडिमारें न दिसे धूम्रें सूर्य निराळी। मोकलितां शर जाळीं। भयाभीत गज अश्व शूर शत्रु सैन्य माळोमाळीं। येकच रणवाद्यांची घाई। वीरश्रीची घुमराई। × × × ×। दाहि दिशा चवताळति वारू। असिवादा (खड्गयुद्ध) असिवाद तो ठांई। × × ×। प्राणासीं दुजायींच्या (शत्रूंच्या) ऊर्ध्व वाट दाऊन माघारे फिरती। × × ×। चढती कळा धन्याची म्हणून वीर असे भिडती। तेथें चढती, मारून अडती, कैक नरमुंडें पडती। × × ×। किंवा काळच परसैन्यावर उलटे। पापभार शत्रु निवटले फुटलें परदळ लुटलें। × × ×। घाबरलें त्यांचें दळ, पळाया—। पढे वीर सरले -'

प्रभाकर:—"दक्षिण उत्तर पश्चिम भागीं, पसरून तोफा जागोजागीं! तमाम गारदी त्याचे मागीं। स्वारसैन्य त्यामागें झगागी। जरी पटका तो दुरुन धगागी। कोणीच नव्हता त्यांत अभागी। त्वरित बक्षीस पावे बदागी। जासुद सांडणीस्वार धावती। काय फलटणच्या फैरा झडती। पर्जन्यापरि गोळ्या पडती। शिरकमळें कंदुकवत् उडती। छिन्न भिन्न किति होउन रडती। कितीक पाण्याविण तडफडती। कितीक प्रेतांमधींच दडती। वीर विरांशीं निसंग भिडती। सतीसारखे विडे उचलती। पाउल पाउल पुढें सरकती। घाव चुकाउन शूर थडकती। सपूत वाघापरी गुरकती। हत्यार लाउन मागें मुरकती। जिवबादादा मनीं चरकती। अररररर शाबास बापांनो। सुटती तोफा धुंद दणादण। गुंगत गोळे येति छणाछण। सों सों करिती बाण सणासण। खलेल घोडे उडति टणाटण। टापा हाणती दुरुन ठणाठण। वाजति पट्टे खांडे खणाखण। नौबती झांजा झडती झणाझण। एकच गर्दी झाली धुराची। थोर मांडली रणधुमाळी। अगदींच बसली मग कांठाळी। फौज पसरली रानोमाळीं। लाखोंलाख तरवार झळाळी। होळकराची फिरती पाळी। जिवबांची मर्दुमकी निराळी। मोंगलांची केलि टवाळी। सबळ पुण्य श्रीमंत प्रभूचें। अठरा घटका लढी फुटली। तोफ हजारों हजार सुटली।

मिरजकरांची मंडळी झटली। भाउबरोबर निसंग तुटली। मोंगल सेना मार्गे हटली। × × ×। पळाले मोंगल धीर न धरतां। चंद्रउदयीं खड्यींत कोंडिले ॥'

तीनही वर्णनांत प्रभाकराचें वर्णन सविस्तर असून रणमैदान डोळ्यांपुढें उभें करणारें असतां यशवंतरावांचा अभिप्राय उलट पडावा हें विचित्र नव्हे काय? रामजोशी व प्रभाकर यांवरील रा. यशवंतरावांचे हे अभिप्राय वाचले म्हणजे वीररसाची त्यांची कल्पना तरी काय, याचा अचंबा वाटतो! प्रभाकराच्या सहाव्या चौकांत विजयाचें वर्णन व विजयी सैनिकांच्या नगरप्रवेशाचें वर्णन आहे. 'भांड, भाट, भालदार, भवय्ये। सुस्वर गाती घाडी गवय्ये। शिरापुरीचे सदा खवय्ये। मिठाई देती नित्य हलवय्ये। लोक सभोंवतीं लढवय्ये। नानासारिखे वीर संगवय्ये। बलाढय शत्रू पराभवय्ये। धनीराव राजेंद्र कन्हय्ये॥' 'दहा घटका रात्रींच्या सुमारीं। गुढया उभ हनि राजद्वारीं। गृहप्रवेश केला प्रभूंनीं। न्याहाल केलें सरदारांना॥' अशा रीतीनें फंदीहून होनाजीचें व सर्वांत प्रभाकराचें खड्यांच्या विजयाचें वर्णन सरस आहे.

अनंतफंदी हा सर्वांत जुना असा पेशव्यांचा दरबारी शाहीर होता. वेळ येईल तसे राजपुरुषांचे गुणानुवाद गाणें हें त्याचें काम होतें. नानांच्या पोवाड्यांत 'बिनाधारसे राज्य चलाया ना किसे चकमक झडी। × × ×। कैक मुत्सद्दी हो गये अक्कल नानाकी नहीं पायी किसे।' असें वर्णन करून किंवा खड्यांच्या पोवाड्यांत 'अक्कलवंत कोठेंही न थकले।' अशी तारीफ केल्यावर, त्याच नानांचा अधिक्षेप माधवग्रंथांत फंदीनें करावा हा काळाचा महिमा होय!

वेळ येईल तशी स्तुति करणें हा अनंतफंदीचा शिरस्ता होता. यशवंतराव होळकरावर पोवाडा रचला तेव्हां त्याच्या पेंढाऱ्यांनीं द्रव्य उकळण्यासाठीं जो खटमार नांवाचा छळ देण्याची क्लृप्ति काढिली तिचेंही कौतुक केलें! माधवग्रंथांत त्याच खटमाराचें करुणरसपर वर्णन केलें!

रा. शाळिग्राम यांनीं पुनःपुनः त्याच लावण्या दिल्यामुळें संपादनाच्या कामीं हलगर्जीपणा केल्याचा दोष त्यांना रा. यशवंतराव केळकरांनीं दिला आहे; परंतु यशवंतराव होळकराच्या पोवाड्यांत पहिला व चौथा चौक

दोन चरण खेरीजकरून सारखेच आहेत; ते जशाच्या तसे देण्याचा हलगर्जीपणा रा. यशवंतराव केळकरांकडून झाला आहे. पहिल्या चौकाच्या दुसऱ्या चरणांत 'जे सावध' या ठिकाणीं 'बेसावध' व पांचव्या चरणांत 'बनकस'च्या जागीं 'बंक' पाहिजे हें चौथ्या चौकाशीं ताडून पाहतां सहज कळलें असतें. तरी बनकस शब्दावर भली टीप देऊन "हा बंकस शब्दाचा अपभ्रंश तर नसेल?" असा सवालही त्यांनीं केला आहे! रा. शाळिग्रामांच्या मेहनतीचा आयता लाभ झाला असतांही अशा चुका होतात, त्या अर्थी ज्यांना लावण्या-पोवाड्यांचें संशोधन करावें लागलें त्यांच्या चुकांकडे मोठ्या औदार्यानें पाहणें जरूर आहे, हें रा. यशवंतरावांना पटेल अशी आशा आहे.

अनंतफंदीनें फत्तेसिंग गायकवाडावर पोवाडा केला, त्यांत त्याची व दुसऱ्या बाजीरावाची तुलना केली. या पोवाड्यांत बाजीरावाची उघड स्तुति आहे. 'पुण्यांत बाजीराव बडोद्यांत फत्तेसिंग महाराज। उदार स्वामी सेवक त्यांना कर्णाची उपमा साज ॥' बडोदें व पुणें यांचें साम्य दाखवितांना 'इकडे स्वामी चाकरीस पलटणें। तिकडे सेवक इंग्रज ॥' हें भूषणच दाखविलें आहे. माधवग्रंथांत इंग्रज फौजेला 'मर्कटकें' म्हटलें आहे. 'इकडे नाना फडणीस। तिकडे सिताराम दिवाण गाजी। इकडे पंत सदाशिव। तिकडे शास्त्री गंगाधर दाजी।' अशा वर्णनानें पूर्वी तारीफ केलेल्या नानाफडणिसांचीही किंमत उतरली आहे. उदार कर्ण म्हणून या पोवाड्यांत ज्या बाजीरावाची वाखाणणी केली त्याच्याचविषयीं 'पोशाग दिधले बाजिरायें। मोच्यास पैका कोठें आहे?। तैसेच अनवाणी चालताहे। शास्त्री अथवा अशास्त्री।' असें त्याच्या राज्यभ्रष्टतेनंतर फंदीबुवांनीं वर्णन केलें व त्यांच्या मुलानेंही रावबाजीची हजेरी घेतली!

होळकराच्या महेश्वर राजधानीवर, सांगलीकर व मिरजकर पटवर्धन आणि त्यांच्या राजधान्या यांजवर, व फत्तेसिंग गायकवाडाचें आराध्यदैवत डाकुरजीवर अनंतफंदीनें पोवाडे केले आहेत, त्यांत त्याच्या काव्यगुणाची चमक क्वचित कोठें झळकते. दरबारी कवि या नात्यानें हें जें हुकुमबंदें काव्य अनंतफंदीला रचावें लागलें त्यांत त्याच्या काव्याचे गुण फारसे चकमत

नाहींत. माधवग्रंथाच्या पहिल्या पांच अध्यायांपेक्षां स्वयंस्फूर्तीनें केलेला सहावा दुष्काळवर्णनाचा अध्याय जास्त उठावदार आहे. त्याचप्रमाणें पोवाड्यांपेक्षां स्वयंस्फूर्तीनें केलेल्या लावण्यांत फंदीबुवांची प्रतिभा जास्त उज्ज्वलतेनें प्रकाशते.

## चंद्रावळ व लावण्या.

फंदी अनंताची लपेट झपेट ही बिकट धरणी ।

—अनंत फंदी.

अनंतफंदीच्या लावण्यांत 'चंद्रावळ' ही लावणी तमाशेवाल्यांना फार प्रिय आहे. या लावणींतील कथानक केवळ मराठी असावें असें वाटतें. तें मूळ अग्निपुराणांतलें आहे. चंद्रावळ ही राधेची बहीण; परंतु ती राधेसारखी कृष्णाला वश नसून पतिव्रता होती. तिला फसविण्यासाठीं कृष्णानें राधेचें रूप घेतलें; तें इतकें बेमालूम कीं, चंद्रावळ आणि तिचा नवरा या दोघांनाही संशय आला नाहीं. कृष्णानें अशा कपटानें चंद्रावळीला गोत्यांत आणिलें. या लावणींत चंद्रावळीचें वर्णन केलें आहे त्यावरून अप्रतिम स्त्रीलावण्याची त्या वेळची कल्पना काय होती तें समजून येतें. त्यांतील कित्येक कल्पना इतरत्र आढळत नाहींत. 'अप्रतिम चंद्रावळ पाहून भुलले वनमाळी। तिचा नेम असा कीं, सूर्य टळेल एक वेळीं। परि ती सत्कर्माशीं नढळे; कुकर्मा वेगळी ॥' 'अंगीं वीर्य जसें कुपींतिल जळ निर्मळ। गोरी भुरकी गालावरती हिरवा तीळ। मंजूळ शब्द जशि टाहो करिती कोयाळ। कंठांतून पिक दिसे अशी वेल्हाळ।' हें कंठांत पिक दिसण्याचें वर्णन बाजीरावाच्या मस्तानीपासून सुरू झालें; परंतु चंद्रावळीच्या नाजुकपणाचें 'भर सव्वाशेर वजन चंद्रावळ। नार फारच हलकी जसें तुंबिनी फळ ॥' हें वर्णन आजकालच्या अभिरुचीस कितपत मानवेल याची शंका आहे. 'तुंबिनी फळ' या शब्दानें भोपळ्यासारखा फोंकसेपणा व वजनांत हलकेपणा दिसून येतो.

कृष्णानें राधेचें रूप घेतलें त्यांत दागिन्यांचें वर्णन आहे. कानांत बत्तीस प्रकारच्या बाळ्या घातल्या त्यांचीं नांवें दिलीं आहेत. हीं नांवें ऐकून परश-

राम कवीनें चढाओढीनें ‘ माझी अर्ज विनंती पतिराया आज ऐका; नग आज घडवा । ’ अशी लावणी रचून तेहतीस बाळ्यांचीं नावें सांगितली आणि एका बाळीनें अनंतफंदीवर त्याच्या समक्ष मात केली अशी आख्यायिका आहे. परंतु परशरामाची ती लावणी उपलब्ध नाहीं. दागिन्यांची हौस धरणाऱ्या स्त्रियांनी या फंदी विरचित लावणीच्या दुसऱ्या चौकातील किती नग आज फॅशनबाहेर गेले आहेत तें पाहाण्यासारखें आहे. हे दागिने अंगावर चढविण्याच्या भरांत स्त्रीतारुण्याची खूण उरोज त्याची उणीव भरून काढण्यास कृष्ण विसरला. हें व्यंग चंद्रावळीच्या ध्यानांत येऊन ती म्हणाली, ‘ तुझी पुरुषाची आकृती दिसती जाण । ’ त्यावर अशा पतिव्रता बहिणीला कृतक राधेनें ‘ सोंगाची संपादणी ’ करण्यासाठी दिलेलें उत्तर मोठें विलक्षण वाटतें. ‘ पुसूं नको ग सखये माझें दुःख मी जाणें । भाल्याची जखम काय होते तुला सांगून । एके दिवशीं सत्यभामा मनमोहन । दोघे निजले ग मजला खोलीमध्यें कोंडून । त्या काळजीनें हा जीव गेला करपून । ’ हें उत्तर आणि त्याचप्रमाणें आंघोळ करावी लागल्यास कपडे उतरल्यामुळें आपलें बिंग बाहेर फुटेल, तें टाळण्या-साठीं ‘ मी न्हाईना बाई खुण केली वेणिला त्यानं । श्रीकृष्णाची कदर फार दारूण । ’ ही सांगितलेली सबब, यांवरून श्रीकृष्ण राधेचा नवरा नव्हता या गोष्टीचा कवीला विसर पडलेला असावा, असें वाटतें. तसेंच राधेचा नवरा व सर्व आप्त यांनीं तिला स्वैर वर्तनाची मुभा दिली असावी असें दिसतें. चंद्रावळ स्वतः पतिव्रता असतां राधेला आपल्या बदफैली वर्तनाचें वर्णन तिच्यापुढें करण्यास कांहीं वाटूं नये, आणि तिनेंही तें स्वस्थपणें ऐकून घ्यावें, या गोष्टी तत्कालीन नीतिभ्रष्टतेच्या द्योतक असतील काय? अशा निर्ढावलेल्या मनाच्या पतिव्रतेला भोजनोत्तर ‘ पति चंद्रावळिचा म्हणे । तुम्ही दोघी बहिणी निजा महालिं जाऊन । आज आम्ही एकटे निजूं बाहेर जाऊन । ’ असा प्रसंग आला व वेषधारी कृष्णानें तिला शेवटीं फशी पाडलें. राधेच्या भाषणासारखें अस्वाभाविक वर्णन रामजोशी किंवा होनाजी यांच्या लावण्यांत मिळणार नाहीं. सगनच्या किंवा परशरामाच्या लावणींतही क्वचितच आढ-ळतें. प्रभाकरानें मात्र यापेक्षांही अप्रयोजकपणा कित्येक ठिकाणीं केला आहे.

**फंदी अनंताची कविता । सवाई सोटा रे सोटा ।**

हें अनंतफंदीनें केलेलें स्वतःच्या कवितेचें वर्णन अगदीं यथार्थ आहे. अनंतफंदीच्या काव्यांत रामजोशाची खुमारी नाहीं; होनाजीची सहजरम्यता नाहीं; सगनचा दिलखुलास रंगेलपणा नाही; परशुरामाची साधेपणाची मोहकता नाहीं; प्रभाकराची उठावदार वर्णनशैली नाहीं ! त्याच्या काव्याचा विशेष म्हणजे त्यांतील तडफ ! अनंतफंदी शब्दासाठीं अडणार नाहीं, उपमेसाठीं खोळंबणार नाहीं, कीं तालसूर अथवा चाल यासाठीं नडणार नाहीं ! त्याच्या प्रसिद्ध काव्यांत ज्यांना गणमात्रांचीं बंधनें फारशीं नडवीत नाहीत अशा फटके–कटावांचा भरणा जास्त आहे. त्याला जें कांहीं सांगावयाचें असेल तें तो सडेतोड निर्भीडपणें सांगतो. ज्याची स्तुति केली त्याचीच खरड काढण्याची वेळ आली तरी फंदीबुवा विनदिक्कत तयार असतात, हें मागें पाहिलेंच आहे. ‘ लंडे गुंडे हिरसे तट्टू यांची संगत धरूं नको । ’ या त्याच्या सुप्रसिद्ध फटक्याप्रमाणें ‘ असल्यावर भीक मागूं नको । नसल्यावर सांगणें कशाला ? गांव तुझा, भिड धरूं नको । ’ असें स्पष्ट सांगणारा तत्त्ववेत्तादेखील क्वचितच आढळेल. त्याच्या भाषेंत चमत्कृतिजनक नावीन्य किंवा शाहिरी शब्दांत सांगावयाचें म्हणजे ‘ नवतीची बहर ’ आहे. पायघोळ पैठणीचें वर्णन करावयाचें असल्यास “दोमजला पैठणचें पातळ, लफाका घे टांचेची खबर।” असें तो सांगतो. ‘ पायीं जोडवीं खणाणी । जसे घोड्याचे नाल वाजती, अवाज कानीं दणाणी । ’ अशी उपमा तो बेशक देतो. त्याच्या शृंगारपर लावण्या थोड्याच प्रसिद्ध आहेत; परंतु आहेत त्यांत किळसवाणा अश्लीलपणा नाहीं, तसा आडपडदाही ठेवलेला नाहीं. नायिका कुलीन असली तर त्याचा नायक तिला सांगेल, ‘ धन्य तुझें लावण्य प्रीतीचे बाण जैसे सणाणी । खरें सांगशील कधीं तृप्त होईल गे आमचे मनांनीं ? ॥ × × × । फार चांगली तूं जर माहित कळलिस काना कोनाला । तर तुला भलताच उडविल; चुना न लागेल पानाला । कैक विलासी अहोरात्रीं टपले देही दानाला । टवकारून तुजकडेच पाहतिल कळा लागतिल मानाला । × × × । तूं थोराची लेक तुला आम्ही काय देयाचें दीनांनीं ?॥ दोनी हस्तक तिसरें मस्तक

जसे तुझ्या घरचे चाकर। इतकें मनामधिं समजून उमजून घाल आम्हा-वरती पाखर ॥' ती पण्यांगना असेल तर 'बोल गडयाशीं नरम; नको होऊं गरम पोकळ भरम कशाला ? ज्वानी जाईल सरून। भर गेल्यावर पोर होइल मग रंग येइना असा फिरून ॥ × × ×। अंगामधिं भर नवतिचा जोर। तुला नेइल वाटेचा चोर। पंचविशी वर झुकली म्हणजे बैस माळ हातीं धरून ॥' हा रोखठोक सवाल ठेवलेला ! अनंतफंदीचें शृंगारवर्णन म्हणजे 'जणुं कांहीं पतंग गोते खात, इष्कामधीं चूर चालला नदी भरून। लांगे लुंगे इष्के लुच्चे यांच्या छातीवरून ॥'

त्याचीं उपदेशपर कवनें अशींच तडफदार व निर्भीड आहेत. 'लंडे, गुंडे हिरसे तट्टू' हा कटाव म्हणजे व्यवहारज्ञानाच्या उपदेशाचा एक संच आहे. 'स्नेह्यासाठीं पदरमोड कर, परंतु जामिन राहूं नको !' 'बरी खुशामत शहाण्याची ही मूर्खाची तीं मैत्री नको।' 'हिमायतीच्या बळें गरिब गुरिबाला तूं गुरकावूं नको। दों दिवसांची जाइल सत्ता अपेश माथां घेऊं नको ॥' इत्यादि व्यावहारिक उपदेशामुळें हा फटका संसारी माणसाच्या वर्तनक्रमाचा आदर्श होण्यास लायक आहे. 'नरदेहामधिं येउनि नर हो साधन ऐसें करा। जेणें भवसागर तरुनि सुखें व्हावें पैलतिरा ॥ संसारार्णवीं भिजा, गडयांनों, संसारार्णवीं भिजा। परंतु परमार्थसाधनातें साधा, यांतच मजा ! ॥' हा फटका म्हणजे 'आधीं प्रपंच करावा नेटका। मग लागावें परमार्थविवेका ॥' या रामदासवचनावर व्याख्यान आहे.

पंचतंत्रांतील त्रिस्तनी कन्येच्या गोष्टीवर अनंतफंदीची लावणी आहे. साध्या देसुगी मराठी भाषेचा ही लावणी एक उत्कृष्ट नमुना आहे.

'एका राजाला कन्या झाली × × ×। ती बाईल आंधळ्याची, तिथं लाग लाविला कुबडयानं। × × ×। तिला एका कुबडयानं फितवलं, रोज घरामधिं आणी त्याला। कवाड वाजतां आंधळा म्हणे घरामधिं कोण आला। ××× । एके दिवशीं कुबडा बोले × × ×। कोण येतो म्हून उगाच आंधळा सारा वेळ लावतो कथा। हा मरता म्हणजे बरं गडे होतं × × ×। कुब-

ड्यानं एक स ं मारून बाहेरून आणला ताथा । × × × ॥ तेव्हां तो सर्प चिरूनशेंन तवली ठेवली चुलीवर । आंधळ्याला शिजवाया बसविलें, ××× । गतका आला तवलिला तेव्हां तो पाहे कानाच्या सुमार । जहराचा कडका जो बसला आंधळ्याच्या डोळ्यावर । जहराच्या कडक्यानं डोळ्यांच्या टिकाच गेल्या उडून । पहा उलटयाचं सुलटं झालं, त्याला रक्षिता भगवान ॥ '

माधवग्रंथांत वर्णन केलेल्या दुष्काळ व पेंढारावर सहा लावण्या प्रसिद्ध आहेत. वर्णन बहुतेक माधवग्रंथाप्रमाणेंच आहे. या सहा लावण्या मिळून एक लावणी होईल हा रा. यशवंतराव केळकरांचा तर्क चुकीचा दिसतो. प्रत्येक लावणीच्या शेवटास कवीनें आपलें नांव घालून शिरस्त्याप्रमाणें अटक केली आहे; त्यावरून प्रत्येक लावणी निराळी दिसते. साधारण सारख्या मजकुराच्या पहिल्या तीन लावण्यांच्या तपशिलांत कांहीं फरक आहे. माधवग्रंथांतील ज्योतिष्याचें भविष्य आहे, त्यावरून तो मजकूर लिहिल्या वेळीं फक्त प्रजेचे हाल झाले होते, राज्यक्रांति झाली नव्हती हें उघड होतें. परंतु 'दुनयेला तिळमात्र उपद्रव काडी नसावा । उलटा सुलटा आया जमाना आतां कधीं चक बसावा ॥' या चौथ्या लावणींत जोशाच्या भाकितांत राज्यक्रांतीचें भविष्य आहे. 'मागें जाणें जोशी सांगत होते राजीक (अराजक) होईल । रक्ताचे पूर वाहतील, **नवी मुद्रा उभी राहील** । कुणी कुणाचें नोहे अति एकंकार होईल । **येतील टोपीवाले**; अशी कांहीं दिवस झुळुक वाहील ॥' परंतु कंपनी सरकारचें राज्य जाऊन पुन: लवकरच स्वराज्य होईल अशी आशा प्रदर्शित करणारे उल्लेख त्या वेळच्या शाहिरी काव्यांत बरेच आढळतात. याच लावणींत जो बाजीरावाचा ~~अधिक्षेप~~ केला आहे व ज्यावरून माधवग्रंथाचा सहावा अध्याय बाजीरावाचें व कवीचें बिनसल्यावर १८०४–५ च्या दुष्काळाच्या सुमारास लिहिला गेला असा रा. यशवंतरावांचा तर्क धांवतो, तो उल्लेख असा: ' झाले बाजीराव धणी आतां पृथ्वीला आनंद असावा । जुने मुत्सद्दी घरीं बसविले, दोन दिवस घ्या विसावा । लई शिण झाला ॥ ' परंतु वरील ' नवी मुद्रा उभी रहाण्याच्या ' व टोपीवाले येण्याच्या उल्लेखांवरून ही लावणी १८१८ इसवीनंतरची आहे हें उघड होतें.

परंतु माधवग्रंथांत रावबाजीला दोषमुक्त ठरविण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्यावरून तो ग्रंथ रावबाजीच्या कारकीर्दीत लिहिला.

पांचव्या लावणींत रामजोशाप्रमाणें 'मुलगा बापाचें ऐकेना; सून सासूसासऱ्यांना मानीना; अनाचार सुरू झाला' वगैरे वर्णन आहे. सहावींत निसर्गानें देखील धर्म सोडल्याचें वर्णन आहे, 'पाऊस म्हणतो कर्मेना। धरित्रीनें पीक टाकिलें अंतपारी दिसेना ॥ × × × । वाण्याची घाण केली मारवाड्यांनीं। गुरवांचें संधान बुडविलें महार वाजंत्र्यांनीं। ××× । सवा हात खचली धरणी। पाऊस अंतरीं शहाणा, मग तो जाऊन बैसला कोंकणीं। ××× । लेक म्हणे बापाला, म्हातारा झाला याची शुद्ध गेली। सुन सासुची मर्जी ठेविना, फिरून बोलूं ती लागली। शिष्य झाले मस्त, गुरूची विद्या गुरूवर फिरली। गोरसाला कोणी पुसेना, दारू महाग विकूं लागली। पतिव्रता ही उपाशीं मरती, तिला मिळेना सांवली। चंचल नार बांधीत असे नवें घर एक दरसालीं। ब्राह्मण जोशी लटके यांचा ठोका येईना ॥' मात्र 'भोंपळ्यामधीं सत्व राहिलें तो पाण्यामध्यें बुडेना ॥'

✓अनंतफंदीला हिंदी भाषा चांगली येत असे. नाना फडणिसाचा पोवाडा व कित्येक लावण्या हिंदींत आहेत. 'बारा बरसका पठ्ठा देखो' ही लावणी शृंगारिक असून त्यांत गुर्जर तरुणीचें वर्णन आहे. "दोनों भवईं जैशी कमान मुलतानी।" "छान छबेली आजब रंगेली, मुखमें चाबे पानविडा।" अशा वर्णनावरून अनंतफंदीच्या मराठी काव्यांतील गुण हिंदींतही उतरल्याची साक्ष पडते.

✓भेदक टीकेचें शस्त्र अनंतफंदी फार कुशलतेनें चालवितो. 'चकाकतें तें सर्व सोनें नसतें' ही वस्तुस्थिति अनेक दाखले देऊन 'हे मूर्खा! खूण तर्का पर्का पुरुष आपला नसे!' या लावणींत दाखविली आहे. 'म्यां म्हटलें हा चक रुपया दिसतो माल खरा। वाजून जों पहातों तों आंत तांब्याचा भुरमुरा। म्यां म्हटलें हा सुरेख उमदा आंगठीवरला हिरा। बसतां घण मस्तकीं भोगितां कस्त झाला चुरा ॥ म्यां म्हटलें कोणी आहे मिजाशी फार नाजुक दिसे! हस्तचरण सनकड्या काया क्षयरोगें जिकली असे। × × ×।

म्यां म्हटलें हा शिकारी मारिल व्याघ्र टाकितो उगा। परिणामीं समजला कुलुंगा म्हणून बसला डगा ॥ × × × । म्यां म्हटलें हा घोडा शुरा किंमतीचा दिसतो। त्याहळून पुर्तेपणीं पाहतों तों गर्दभ दिसतो। म्यां म्हटलें हा राघू पिंजऱ्यामाजी डोकावतो। जवळ जाउन पहातों तों कावळा अदा दावितो।' ज्याला अनुलक्षून हें कवन केलें असेल त्याला 'फंदी आनंदाचे छंद, जिव्हारीं शस्त्र भोस्कीतसे।' असें वाटल्यावांचून राहिलें असेल काय ?

अनंतफंदीचा मुलगा सवाईफंदी किंवा फंदीमूल हा व्यंगोक्तीपर टीका करण्यांत बापापेक्षां कांकणभर जास्त कुशल आहे. 'उटया केशरी, टिळा कस्तुरी, कमालखानी हारगजरे। गहेनाजी बहेनाजी अक्षय जवळ पालखिच्या हुजरे। जुनीं माणसें तीं कणसाला महाग, गैर त्यांची बूज रे। चार चटारी भटारी हलके जाणुनि घे अलबत मुजरे। सुंदर स्त्री दुसऱ्याची तिसरा दे बैल गुतुन अवता। शाल्योदन मिष्टान्न भोगता सवाशेर ज्याचा सवता। चौविस वर्षे चैन भोगिली राज्यक्रांति जाणुन नव्हता॥' असें बाजीरावाचें वर्णन करून तो म्हणतो, 'जो नीच कर्मी, लइशी गुर्मी, कुटुंबदाखल नजराणा। ×××। सर्वांची रग जिरली म्हणुनी तळि भरली आला दीप मालवता। फंदीमूल म्हणे विरस ! कां गादि पुण्याची घालवता॥"

मूर्ख, आडदांड नवरा व सुलक्षणी स्त्री यांचें वर्णन एका लावणींत आलें आहे, ती बहुधा सवाईफंदीची असावी असें भाषवरून दिसतें. 'पति तर केवळ शुद्ध दांडगे घागरगडचे हंस जसे। पाणी वाहतां खटी पडल्या खांदा कावड डुल्लतसे॥ चवलापुरती करी मजूरी कंबर बांधुनि हजिर असे। अक्षर-शत्रू ! 'ओनामासी' हें तर ठाउक स्वप्निं नसे। तंबाखूचा मोठा चाळा नाहिं मुखावर तेजकळा। दोटक्यांनीं भले दांड पाझर येइना खडकाला। परि निवळ फतर॥' हें नवऱ्याचें वर्णन व बायको 'तूं तर केवळ देवाघरची मुखरणिमध्यें श्रेष्ठपणीं। नाजुक साजुक कळी प्रफुल्लित पातळ पुतळी ठेंगणी। राजस गोंडस स्वहस्तकमळीं गौरवर्ण तनु देखणी। विशाळ डोळे बुबूळ कुळकुळित नाहिं कुठें तिळतुल्य उणी। शांत प्रकृत हास्यमुखी सुंदराकृती

हो सदा सुखी। रंभा पाहुनि लज्जित होउनि तव गुणश्रवणीं पडति गळां ॥'
अशी आहे.

अनंतफंदीवर त्याचा समकालीन शाहीर होनाजी यानें लावणी केली आहे. त्यांत त्याच्या काव्याचें व वेषाचेंही वर्णन केलें आहे. 'फंदी अनंत कवनांचा सागर। अजिंक्य ज्याचा हातखंडा ॥ चमत्कार चहुंकडे चालतो। सृष्टीवर ज्याचा झेंडा ॥ × × ×। वाचावंत संपत्ती सारखी। बहुतांचे तनमन हारकी ॥ लांगेलुगे कवि भेदरले। अवघ्यांवर त्याची गुर्की ॥ समोर गातां कोणि टिकेना। मनामधीं बसली कर्की ॥ × × ×। फंदी आनंदी वरदी छंदी। ब्राह्मण त्यावर गुरुकृपा ॥ सरस्वती जिव्हाग्रीं अक्षयीं। भंग नसे ज्याच्या हरपा ॥ कवन बहुत उदरामधिं भरलें। फणस जसा मोठा कापा ॥ मोठमोठ्या राज्यांमधिं मशहूर। जगजाहिर चारी तर्फा ॥ **आकट विकट कवनांच्या चाली।** नित्य नव्या आक्षयी थापा ॥ **विद्या अभिमान नाहीं जयाला।** असा कवि कैचा धुंडा ? ॥ पुढें मागें ऐसा नसे दुसरा। मृत्युलोकिंचा रहवाशी ॥ पद्दा रत्न पंधरावें, माता। धन्य जन्मली हो त्याशीं ॥' होनाजीला देखील पेशव्याच्या दरबारीं किफायत होती. तेथील या वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध हरदासी शाहिराचें इतकें मुक्तकंठानें गौरवपूर्ण वर्णन करण्यांत होनाजीचा असूयारहित, दिलदार मनाचा मोठेपणा' दिसून येतो. 'नविन तऱ्हा नारळी डोयीला पदर पागोटयाची फिर्की ॥ भाळीं त्रिपुंड्र टिळा केशरी। कस्तुरीचा वरती छापा ॥' अशा थाटांत स्वकृत लावण्या कटाव आणि फटके म्हणत फंदीबुवा कीर्तन करूं लागले म्हणजे 'मुख्य मुख्य खासे खासे' कसे 'कीर्तनरंगीं झडा घालिती,' याचें होनाजी बाळानें केलेलें वर्णन इतकें सुरस आहे कीं, होनाजी असतां अनंतफंदीच्या नंतर 'पुढें मागें ऐसा नसे दुसरा,' अशी भीति बाळगण्याचें पेशवे दरबाराला कारण राहूं नये! ज्यानें आपल्याच एका व्यवसायबंधूचा आपल्याच खुषीनें असा गौरव केला, चुरस करण्याची हांव धरली नाहीं, त्या होनाजीच्या कवितेचें वर्णन यापुढें देऊं.

# होनाजी बाळा

**दुमदार कुणाची छान, नवती भरज्वान पुसा रे आली कुठून ?**
**स्वरुपाचे तुटती तारे; कडाकड विजवा पडतिल तुटून !**

**—परशुराम.**

होनाजी बाळा हा जातीचा गवळी; त्याचें उपनांव शेलारखाने. त्याच्या बापाचें नांव सयाजी; होनाजीच्या कुळांत कवित्वशक्ति पिढीजाद होती. त्याचा आजा शांताप्पा ऊर्फ साताप्पा हा उत्कृष्ट शाहीर होता. ' आवरीं आवरीं या श्रीरंगा । यशोदे गे माय ॥' ही त्याची एक लावणी होनाजीच्या संग्रहांत आलेली आहे. होनाजीचा वडील चुलता बाळा बहिरू याच्याही कांही उत्कृष्ट लावण्या शालिग्रामांनीं त्या संग्रहांतच घेतल्या आहेत. ' आली प्रलयांगता तुम्ही ग बुध .नाहीं कामाची । आलीं धन्याचीं पत्रें आम्हाला जलद जाण्याचीं ॥ ' ही त्यांतीलच एक लावणी आज लयास गेलेल्या लष्करी पेशाची आठवण करून देणारी आहे. होनाजीचा जन्मशक किंवा त्याचें शिक्षण यांची माहिती मिळत नाहीं. तथापि होनाजी, सगन आणि प्रभाकर यांचा पेशव्यांच्या व विशेषत: शेवटल्या बाजीच्या दरबारांत बोलबाला होता, याचीं प्रत्यंतरें त्यांच्या काव्यांत आढळतात. बाळा कारंजकर नांवाचा शिंपी जातीचा होनाजीचा फडांतील साथीदार होता. पेशव्यांच्या वाड्यांत ' होनाजी बाळा ' असें त्याचें नांव जोडीनें उल्लेखिलें जाई; तेंच होनाजीनें आपल्या लावण्यांत जोडीनें घालून दिलें. अशाच रीतीनें त्याचा चुलता बाळा याच्या नांवास बहिरू रंगाऱ्याचें नांव जोडलें गेलें. बाजीरावाच्या सांगण्यावरून होनाजीनें रागदारीच्या लावण्या रचण्याचा प्रघात पाडला, तो इतर शाहिरांनींही उचलला.

**' घनःश्याम सुंदरा ! श्रीधरा ! अरुणोदय झाला ! ।**
**उठिं लौकरवनमाळी ! उदयाचळीं मित्र आला ! ॥**

या एकाच लावणीनें देखील होनाजीचें नांव मराठी वाङ्मयांत अजरामर केलें असतें ! ही भूपाळीची लावणी मराठयांच्या प्रात:स्मरणांत ठाम झाली.

आहे. इतर शाहिरांनीं तिचें केलेलें अनुकरण कितपत उतरलें आहे तें पाहाण्यापूर्वी या लावणींतील विशेष गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत.

✓ पहांटेच्या उजळत्या प्रकाशाचें क्रमवार वर्णन या लावणींत आलें आहे. तें वर्णन करून यशोदा झोंपलेल्या कृष्णाला उठविण्याचा प्रयत्न करते. "अरुणोदय झाला; उडाले चरावया पक्षी!" असें ती पहिले छूट अतिशयोक्तीनें सांगते. परंतु अद्याप पांखरांचा किलबिलाट सुरू झाला नसावा किंवा असला तरी त्याला कृष्ण दाद देत नाहीं. तेव्हां नुकतें झुंजुरकें दिसूं लागलें किंवा नाहीं तें पाहाण्यासाठीं 'उठुनि कावडी तीर्थपंथ लक्षी!' इतकें यशोदा कबूल करते. नंतर कांहीं वेळानें गोपी संडासमार्जन करून कडेवर घागरी घेऊन यमुनेचें पाणी आणण्यास चालल्या; कमलें उघडून त्यांत अडकलेले भुंगे सुटूं पाहात आहेत; 'पूर्वदिशे मुख धुतलें,' तूं देखील तोंड धुवून न्याहारीस दहींभात भाकरकाला आहे तो खा! अशी लालूच दाखविते. तरी कृष्णाची साखर झोंप उडत नाहीं. रात्रभर पेटत असलेल्या नंदादीपांच्या वाती सारून, गोपी गीतें गात घरधंदा करूं लागल्या; रांगोळी घालूं लागल्या; तुझे संवगडी दारांत येऊन तुला हांक मारताहेत; गाई हंबरताहेत; वांसरें पिण्यासाठीं वाट पाहाताहेत! तुझ्या रत्नमाला आणि मुक्ताहार ( गुंजमाला व पुष्पहार असा योग्य पाठ नवनीतांत आहे ) तयार आहेत ते गळ्यांत घाल! चल, काळा कांबळा पांघरून काठी घेऊन त्यांना चारायला ने! अद्याप उठत नाहींस! अरे, या गोपी स्नानें करून अलंकार लेवून मंथन देखील करूं लागल्या! वैष्णव, स्मार्त, शाक्त हे आपापल्या देवतांची पूजा करूं लागले; विद्यार्थी विद्याभ्यास करूं लागले; आतां हा तुझा आळशीपणा सर्वांना समजेल. 'पंचपंच उषःकालीं रविचक्र निघों आलें! एवढा वेळ निजलास म्हणून हरी, समजेल नंदाला!' मग नंद तुला रागें भरेल, असा ती धाक घालते. पण कृष्ण यशोदेच्या अशा धमकीलाही भीक घालीना! तेव्हां यशोदा अगदीं काकुळतीला येऊन मोठया ममतेनें सांगते कीं, दाही दिशांना उन्ह पडलें; हा बळराम तुझ्या सांगातीं गाई घेऊन वनांत जाण्यास तयार होऊन राहिला आहे; आतां तरी 'गे माझे पाडसे सांवळे! ऊठ कृष्णाबाई!' या

शेवटच्या ममतेच्या हांकेनें खडबडून जागें झालेल्या कृष्णाचें प्रफुल मुखकमल पाहून प्रेमाच्या भरांत यशोदा शेवटीं म्हणते, अरे, या सूर्याचा प्रकाश तो कसचा ! ‘ कोटि रवींहुनि तेज.आगळें तुझिया वदनाला ! ’

✓ प्रभाकर आणि परशुराम यांनीं या लावणीचें बहुतेक शब्दशः अनुकरण केलें आहे. प्रत्येकाच्या लावणींतील समानार्थक उतारे पाहिल्यास होनाजीची सरसता सहज ध्यानांत येईल.

( १ ) **होनाजी**—घनःश्याम सुंदरा, श्रीधरा, अरुणोदय झाला, । उठिं लवकरि वनमाळी उदयाचळीं मित्र आला ।॥

**प्रभाकर**–उठ ऊठ झडकरि तरि गोविंदा मुरारी । अरुण उदय होऊं पाहे; सरली रात्र सारी ॥

**परशुराम**—उठ झाला प्रातःकाळ तुझे गोपाळ आले घननीळा ॥ पूर्व दिशे उदयला भानु आला उदयाचला ॥

( २ ) **होनाजी**—सायंकाळीं एके मेळीं द्विजगण अवघे वृक्षीं । अरुणोदय होतांच निघाले चरावया पक्षी ॥

**प्रभाकर**—शुकमयुरराजहंस फोडितात टाहो । कुरकुट चंडोल काग घेति फार लाहो । तितर लाग अगन गोंड शब्द महोत्साहो ।

**परशुराम**—प्राणिमात्र पशुपक्षी विश्रांत वृक्षीं आपापल्या स्थळीं । सकळ विहंगम काक पिंगळे किजबिजती एके वेळीं । रावे मयूर हंस साळ्या सुस्वर मुखकमळीं । सद्भावें तुज गाती ध्यानीं स्वमुखें नामावळी ॥

( ३ ) **होनाजी**—काढिं धार क्षिरपात्र घेउनी धेनू हंबरती । लक्षिताति वासुरें हरि धेनुस्तनपानाला ॥

**प्रभाकर**—गाइ हंबरतात सोडिं वासरांसि द्वारीं ॥

**परशुराम**—क्षुधित वासरें सोडून, धार आणिं काढून झडकरी ।

(४) **होनाजी**—अर्घ्यदान देउनियां द्विजगण देवार्चन करिती । नेमनिष्ठ वैष्णव ते विष्णुपूजा समर्पिती ॥ स्मार्त शिवार्चनसक्त शक्तितें शाक्तहि आराधिती। × × × । विद्यार्थी विद्याभ्यासास्तव सादर गुरुपायीं ॥ अध्यापन गुरु करिति शिष्यही अध्ययना उदयीं । याज्ञिकजन कुंडामधिं आहुति टाकिताति पाहीं ॥

**प्रभाकर**-कुंडमंडपांत अग्निहोत्रि होम देति। गाणपत्य शैव शाक्त देवळास येती। वीरवैष्णव सूर्यभक्त अर्घ्यनाम घेती। गुरु विद्यार्थ्यांस वेद पढवितात चारी ॥

( ५ ) **होनाजी**—पूर्वदिशे मुख धुतलें, होतसे नाश तिमिरा। पंचपंच उष:कालीं रविचक्र निघों आलें।

**प्रभाकर**—पूर्वदिशा शुभ्र होउन अति आरक्त झाली। करबुर गुरु गहन प्रभा केशवा निमाली। तिमिर खोल अलगत पहा अंबरीं उडाली ॥

**परशराम**—पूर्व दिशे उदयला भानू आला उदयाचला ॥

(६) **होनाजी**—द्वारिं उभे गोपाळ हाक मारुन तुजला बाहाती। × × × मुकुंदा दध्योदन भक्षीं। मुखप्रक्षाळण करीं अंगिकारिं भाकरकाला ॥

**प्रभाकर**—लोणी लाडू आज वनीं न्यावया स्विकारीं ॥

**परशुराम**-गोपवृंद उभे द्वारीं बाहाती मुखमार्जन तूं करीं। दधिदुग्ध नवनीत साय ही मुखीं भरीं। घृतमिश्रित शर्करा उभी मी घेउन आपल्या करीं ॥

( ७ ) **होनाजी**—घरोघरीं दीप अखंड त्यांच्या सरसावुनि वाती। गीत गाती सप्रेमें गोपी सदना येति जाती। प्रवर्तोनि गृहकामीं रंगावळी घालू पहाती। × × ×। प्रात:स्नानें करुनि गोपिका अलंकारें नटती। कुंकुमादि चर्चुनी मंथनालागिं आरंभिती। प्रेमभरित अंतरांत वदनीं। नामावळि गाती ॥ ×× ×। करुनि सडासंमार्जन गोपी कुंभ घेउनि कुक्षीं। यमनाजळास जाति मुकुंदा × × ×।

**प्रभाकर**—शयनिं पुरुष त्यजुनि स्त्रिया तरुण मुक्त होती। मुखमार्जन करुन फिरुन लेति कनक मोती। तेजहीन झळमतात सकल दीपज्योती। घुसळितात घुमघुम कुणी तक्र काळ काळा। वेणीफणी करुन कुणी सुशिल गोपबाळा। सारवून काढितात द्वारीं रंगमाळा। हरिगुण गात जाती यमुनेप्रत नारी ॥

**परशुराम**—मंथनास प्रारंभिति गोपी घरोघर त्या गोकुळीं। सडासंमार्जन करुन घालिती रंगमाला रांगोळी। कनकाचे घट शिरीं यमुनातिरी जाती आणूं जळा ॥

( ८ ) **होनाजी**—अघमर्षणादि करुनि तापसी तपाचरणदक्षी । प्रभातकाळीं उठुनि कापडी तीर्थपंथ लक्षी ॥

**प्रभाकर**—फिरति वासुदेव जोगी जोगडे भिकारी ।

**परशुराम**—निद्रा सावरून जागृत होती । पंचाषट्कर्मादि ऋषियोगीतापसी जळींस्थळीं ॥

हे उतारे पाहिल्यास होनाजीचें पदलालित्य आणि प्रसादयुक्त रचना सहज लक्षांत येते. संस्कृत, परंतु यथोचित व अर्थपूर्ण शब्दांचा भरणा दिसून येतो. रा. यशवंतराव केळकरांनीं संस्कृतप्रचुरतेचा रामजोशांवर केलेला आरोप होनाजीवर केला असता तर चालला असता. असो. प्रथम वरील आठ उताऱ्यांची तुलना करूं.

१—प्रभाकराचा अरुण–उदय हा समास संधिनियमांस सोडून व्याकरणदुष्ट आहे. अरुणउदय झाला हें सांगितल्यावर 'सरली रात्र सारी' हें सांगण्यांत स्वारस्य नाहीं.

परशुरामानें बहुतेक होनाजीचे शब्द घेतले आहेत. पण भानू पूर्वदिशे उदयला म्हटल्यावर उदयाचळिं आला हें पुन्हा सांगितल्यानें विनाकारण द्विरुक्ति होते. होनाजी म्हणतो कीं, अरुणाचा उदय झाला; हा सूर्याचा सारथी दिसूं लागला; त्याअर्थी सूर्य उदयाचलावर येऊन ठेपला आहे. यांत अरुण व सूर्य यांचें निरनिराळें वर्णन असल्यामुळें द्विरुक्ति नाहीं.

२—सायंकाळीं वृक्षांवर आलेले पक्षी आतां चरावयास निघाले हें होनाजीचें सामान्य वर्णन आहे. यशोदेनें असें सामान्य वर्णन करणें जसें साहजिक आहे तसें प्रभाकर व परशुराम यांच्याप्रमाणें पक्ष्यांच्या नांवनिशीवार सांगणें संभवनीय नाहीं. शुक आणि राजहंस 'टाहो' फोडतात हें पक्ष्यांच्या मंजुळ गायनाचें प्रभाकरानें केलेलें विकृत वर्णन अगदीं अयोग्य आहे. त्याचे कुक्कुट चंडोल कसला लाहो घेतात तें समजत नाहीं. परशुरामानें पक्ष्यांच्या मुखावर कमळाचें रूपक करून पुनः तें कमळ सुस्वर ठरविलें आहे. त्याचे पक्षी सद्भावानें कृष्णाची नामावळी गातात हें त्याच्या संतपणालाच

उचित आहे; कवित्वाला नाहीं. त्याची यशोदा, कृष्ण हा 'देव आहे हें विसरून, होनाजीच्या यशोदेसारखी मातृवात्सल्यानें प्रेमनिर्भर झालेली नाहीं.

३—होनाजीचें वर्णन पदलालित्य आणि अर्थसूचकता यांनीं श्रेष्ठ आहे. सकाळच्या वेळीं वासरांस पाजण्यासाठीं गाईनीं हंबरावें आणि वासरांनीं स्तनपानासाठीं अधीर व्हावें, या दोन्ही गोष्टी त्यानें सुचविल्या आहेत. इतरांच्या वर्णनांत एक एक गोष्टच प्रामुख्यानें आहे.

४—होनाजी प्रत्येक तपशील चातुर्यानें देऊन त्याचें शब्दचित्र काढतो. प्रभाकर एकदाचें कसें तरी सांगून टाकतो. ' कुंडांत आहुति टाकणें, ' व ' कुंडमंडपांत होम देणें ' या शब्दरचनेंतील फरक पाहातां होनाजीची शब्दयोजना समर्पक दिसते, तशी प्रभाकराची नाहीं.

५—प्रभाकराचें पूर्वदिशा शुभ्र होऊन आरक्त झाली हें वर्णन बरोबर नाहीं. तांबडें फुटण्यापूर्वी जो थोडासा उजळा पूर्वेला येतो तो शुभ्रपणा नसतो. दुसऱ्या चरणाचा अर्थ लागत नाहीं. अंधार अलगत आकाशांत उडाला हें वर्णन देखील मनोहर नाहीं. आकाशांत उडाला म्हणजे नाहींसा झाला असा अर्थ ओढूनताणून घ्यावा लागतो. आकाशांत उडालेला पदार्थ कोठें तरी दिसला पाहिजे.

६—होनाजीचें दध्योदन भाकर काला हें खाद्य गोपालांना जसें योग्य, तसें प्रभाकराचें लोणीलाडू कॉंबिनेशन योग्य दिसत नाहीं. परशुरामानें सगळा दुधाचा व तज्जन्य पंचामृताचा मारा केला आहे. गुराख्याच्या क्षुधाशमनार्थ धान्यमय अन्न व त्यांतील व्हिटॅमिन्सचा पुरवठा मुळींच नाहीं.

७—होनाजीचें वर्णन स्वभावोक्तीनें सहजरम्य आहे. कृष्णाच्या लीला जरी प्रौढ पुरुषाला लाजविणाऱ्या होत्या, तरी त्याची आई त्याच्या वयाच्या मुलाजवळ प्रभाकराच्या पहिल्या चरणांतलें वर्णन करील हें संभवत नाहीं. 'तेजहीन झळमतात सकल दीपज्योती' हा प्रभाकराचा चरण मात्र होनाजीच्या वर्णनाशीं स्पर्धा करूं शकतो. बाकी यथातथाच ! ' हरिगुण गात जाती यमुनेप्रत गोपी !' हें हरीलाच सांगण्यांत स्वारस्य कोणतें ? द्वितीय पुरुषाऐवजीं तृतीय पुरुषीं कृष्णासंबंधीं उल्लेख केल्यामुळें, कांहींसा रसभंग

होतो. परशुरामानें होनाजीचेच शब्द व वर्णन घेतलें आहे. 'हरिगुण' या प्रभाकराच्या शब्दांवर जो आक्षेप येतो तोच 'त्या गोकुळीं' या शब्दांवर येतो. यशोदा गोकुळांतच कृष्णाला सांगत आहे, याचा कवीला विसर पडलेला दिसतो.

८—प्रभाकरानें वर्णिल्याप्रमाणें वासुदेव, जोगडे, व भिकारी स्वराज्यांत देखील इतक्या पहांटेस भिक्षा मागण्यास फिरत असतील असें वाटत नाहीं.

वरील तपशिलाशिवाय होनाजीची भूपाळी कित्येक इतर बाबतींतही प्रभाकर व परशुराम यांहून सरस आहे. होनाजीच्या लावणींत '**ममात्मजा**' अशी कृष्णाला संबोधून यशोदेनें हांक मारली आहे; त्यावरून ही लावणी यशोदेच्या मुखीं घातली आहे हें जसें स्पष्ट होतें, तसेंच परशरामानें 'निजजननीचे बोल प्रेमसुखें डोल आले अंतरीं' या चरणांवरून दिसून येतें. प्रभाकरानें तर 'उग्रसेनकुमारिगृहीं जन्म घेतलासी। व्हावें सौख्य म्हणुनि सदनिं माझे पातलासी। लहान काम तुजकडून करवितें मी कैसी। विश्वंभर विश्वरहित सत्य सूत्रधारी ॥' असें एक सबंध कडवें घालून ही लावणी यशोदेच्या तोंडची आहे याची शंका घेण्यास जागा ठेवली नाहीं. परंतु त्या कडव्यामुळें कृष्ण हा आपला मुलगा नाहीं, अशी तिची भावना दिसते व मातृवात्सल्यास उणेपणा येतो.

होनाजीच्या लावणीचा विशेष गुण हा कीं, कृष्ण आपला मुलगा आहे; गुरें राखण्याचें त्याचें काम आहे; या यशोदेच्या भावनेला विसंगत वर्णन त्याच्या लावणींत नाहीं. नाहीं म्हणावयास 'ममात्मजा' या संबोधनाबरोबर 'हृषिकेशि, जगत्पाळा' अशीं नांवें आलीं आहेत व शेवटाच्या सुमारास 'शकटांतक' या गोकुलोचित नांवाबरोबर 'मुनिजनमानसहंसा, श्रीमनःकमलभृंगा, मुरहर, पंकजपाणी, पद्मनाभ' अशीं संबोधनें आहेत; परंतु तीं अशा ठिकाणीं योजिलीं आहेत कीं, त्यांना तेथें महत्त्व येत नाहीं. तीं संबोधनें वगळतां ही लावणी गोकुळांतल्या कृष्णाला उद्देशून असण्यास विसंगत असा शब्द होनाजीच्या लावणींत मिळणार नाहीं. तसेंच होनाजीच्या लावणींत प्रभातवर्णनास अनुकूल नसलेलें वाक्य किंवा शब्दही मिळणार

नाहीं. प्रभाकराच्या लावणीचीं पहिलीं दोन कडवीं आणि सातवें व आठवें कडवें यांत प्रभातवर्णनास पोषक भाग अगदीं थोडा असून बहुतेक निरर्थक आहे. तीं कडवीं अशीं:–‘ सगुण ब्रह्म सांवळ्या रे आदिकलारूपा । निर्विकार निष्कलंक सर्वसारकूपा । चिद्विलासखेलका रे तीन लोकभूपा । काढ पदर पद्मनाभ दैत्यदानवारी ॥ २ ॥ वदनचंद्र पहावयास थोर थोर रामा । भक्तराज तिष्ठतात विष्णुपूर्णकामा । त्रिविध तापकंदना रे रमारंगधामा । जागृति काय घडलि सांग पीतवसनधारी ॥ ३ ॥ जाइजुई बहरभरित शेवंती चमेली । प्रफुल्लित सुमनें दिसे सर्वही सफेली । दर्शनास तुळस तुझ्या मुकुंदा भुकेली । वाढ वेळ पहुडलास कां रे पूतनारी ॥ ८ ॥ पारिजात बकुल घोंसदार सोनचाफे । शोभिवंत शोभतात सघन पाच वाफे । केतकी गुलाब गेंद जणुं कुरंग नाभे । परोपरी मकरंद वरुन वायु तो झुगारी ॥ ९ ॥ ”
भूपाळीनें कृष्णाला जागें करण्याच्या प्रभातवर्णनांत आठ व नऊ या कडव्यांतील फुलझाडांच्या यादीची समर्पकता कळणें कठीण आहे. त्यांतील कित्येक सायंकाळीं फुलणारीं आहेत.

तसेंच ‘ मुकुटमणी यादवांत ’ हें विशेषण गोकुळांतल्या कृष्णाला लावतां येण्यासारखें नाहीं.

परशुरामानें आपल्या लावणीच्या तिसऱ्या व चौथ्या चौकांत याहून कमाल केली आहे. गाई राखण्यास कृष्ण निघाला तेव्हां व्रजांगनांनीं त्याला पंचारत्या ओंवाळल्या; ‘ छत्रचामरें ढाळिति हरीवर जाती वनांतरीं. ’ पुढें वनांत गेल्यावरही गुरें न राखतां कृष्ण वनक्रीडाच करतो. परतून घरीं येतांना पुनः पंचारत्या व गुढया पताका ! आणि हें सर्व या प्रभातवर्णनाच्या लावणींत ! ! कारण ‘ उठ झाला प्रात:काळ ’ हें पालुपद आहेच !

---

## बाजीरावावरील लावण्या व पोवाडे

**मायबापाचा लौकिक राहील असें कांहीं साधन करा ॥ —सगन**

मराठी राज्यांत भांडणाचा कलि शिरला, त्यापूर्वीच मद्रास आणि बंगाल व्यापून, महाराष्ट्र हस्तगत करण्यास टपलेल्या इंग्रजांचे पाय मुंबई बेटावर

पक्के रोंवले होते. ज्यांनीं अखिल भरतखंड पचवून ढेंकर दिला, त्यांच्या पकडींतून महाराष्ट्र सुटणें कठीण होतें.

बाजीरावानें मराठी राज्य घालविलें, परंतु होनाजी बाळा, प्रभाकर किंवा सगनभाऊ यांना बाजीरावाचा आश्रय होता. आपले रंगढंग त्यांना पाहाण्यास मिळावे व त्यांनीं त्यावर लावण्या कराव्या अशी देखील व्यवस्था त्यानें करून दिलेली दिसते. त्यामुळें शाहीरांनीं त्याची वाखाणणी केल्यास नवल वाटावयास नको. बाजीरावाच्या रूपगुणांचें व त्याच्या विलासांचें वर्णन होनाजीनें कित्येक लावण्यांत केले आहे.

' जसा आकाशीं चंद्र तसा राजेंद्र पाहिला दृष्टी। सखे असें वाटतें सखा कवळून मारावी मिठी ॥ ' अशी सुरवात करून होनाजी त्याच्या स्वरूपाचें वर्णन करितो, ' पगडी कंगणीदार, आंगावर ज्वाहीर, छबेला गडी। करून सज्ज पोषाख घेतली हातीं वेताची छडी। मुक्तुरा शिरपेंच, कानीं चौकडा, सुरत फांकडी। गळां पाचूचे हार सदोदित एकाहुन एक कडी। हातीं हिऱ्याच्या अंगठ्या पेट्या पाहून पडलें झडी। × × × ॥ काय सांगूं तारिफी जसा कोणी इंद्र बैसला सभे। वीरासन घालून भंवतें देशोदेशिंचे सुभे। चवरी रुमाल हुद्देदारी हातीं घेऊन विलासिक डबे। सेवकजन सेवेशी तिष्ठत रात्रंदिवस ते उभे। ऐश्वर्याची जात साजणी न वर्णवे या जिभे। × × × ' केवळ मन्मथ पुतळा, आगे साजणी। सर्वांत रूप आगळा, आगे साजणी। भाळीं कस्तुरि टिळा, गंध केसरी सर्वांगीं उटी ॥ ' हें रूप व वैभव पाहून होनाजीची नायिका म्हणते, ' अवचित माडीवरून सख्याचें रूप पाहतां गोजिरें। तन्मय होउनि मनीं व्याप्त मी झालें कामज्वरें। नट ठकडें बंगाली विद्या घेतली सखे प्रियकरें। बळेंच वेड लाविलें याहुनि मजला कमळणीसी मधुकरें। तो भुजंग मी केकती। आगे साजणी। तो मीनकेतन मी रती। आगे साजणी। करून नाना यत्न राजहंसाशीं एकांतीं आणा। चरा मुक्तांचा चारा तुम्ही निर्भय तयाला म्हणा। पाहतां दिसतें आंत जसें मुख चंद्रबिंब दर्पणा। मी एक लक्षणयुक्त सखे सोडून मीपणा। कायावाचामनें शरण मी

जाहालें त्याची अंगना । ' तशीच रावबाजीवर दुसरी लावणी ' सर्वगुणसंपन्न सखे राजींद्र पाहिला दृष्टी । क्षमाशांति आणि दया ज्याची केवळ कांसव दृष्टी । ' हें रावबाजीचें गुणवर्णन त्याच्या कृपेवर पोसलेल्या आश्रितांखेरीज इतरांस पटणार नाहीं. परंतु ' श्रीमंतांचें तक्त पुणें खुषवक्त नमुना बाई । चल पाहूं कन्हयाराव राजेंद्र सवाई ॥ × × × । जरद्या घोडयावर स्वार शिपाई तो सरदार छेलछबेला । मस्तकीं फुलाचा तुरा शिपाई झुरा इष्की रंगेला । केवळ रत्नाची खाण सुस्वरूप दिनमान राजबीज पुतळा । ' अशा वर्णनाच्या या राजबिंडया शिपाईगडयाचे सहज पटण्यासारखे पराक्रम म्हटले म्हणजे ' पौर्णिमेसि तारांगणीं जसा बाई चंद्र उदेला । मध्यभागीं आपुण भोंवत्या नाटकशाळा। शृंगार करुनी कामिनी नित्य अवघ्याजणी मिळूनी वेल्हाळा । एक आपुल्या हातीं एकांतीं चुरिती पदकमळा । एक आजूबाजूस सन्मुख घाली डोळा ॥ एकीहून एक देखण्या हिरकण्या स्वर कोकिळेप्रमाणें । एक दिवाणखान्यामध्यें मंजूळ गाती गाणें । एक आनंदांत डोलती । एक विनोद बोलती गोजिरवाणें । दाउनि आपआपुल्या खुब्या, सभोंवत्या उभ्या करूनि चतुराई ॥ ' या लावण्यांत रावबाजीचे रंगेल ढंग मनमुराद वर्णिले आहेत. त्याचें कारस्थानी चातुर्य म्हणजे, ' सवती सवतीचा कज्जा लावुनी सख्या चौथे खणांत । लावुन मुखाशी पदर किति हंसाल मनचे मनांत ॥ येकीचे हातीं पीकपात्र, येक द्वारांत पद्मिनीपरी । नाना नक्षीचे विडे घेउनियां पुढें आपापले करीं-। मुखीं घालावयासी सिद्ध होउनियां प्रसिद्ध सदनांतरीं । येक उभी करुनि शृंगार । सुबक घेउनि फुलांचे हार । येक उभी धरुनियां द्वार । हा इष्काचा परिवार । × × × । भांडणें भांडवितां बरे परोपरी पशुनराचीं किती । गजतुरंग जेठी लव्हे लाल भांडावे ही आवड चित्तीं । × × × । कळ वाढवी अधिक म्हणउन एकीला अधीक एकीला कमी । सारांश भांडण तुम्हां आवडतें हें मुख्य धरिलें मनीं ॥ '

रावबाजीच्या विलासवर्णनांत कित्येक ठिकाणीं जो सदभिरुचीचा भंग झाला आहे, तो होनाजी बाळाच्या नेहमींच्या वृत्तीस अनुसरून नाही.

बाजीरावावर होनाजीची इतकी भक्ति होती कीं, त्याच्या पांच उपलब्ध पोवाड्यांपैकीं तीन बाजीरावाच्या संबंधाचे आहेत. खर्ड्याच्या लढाईचा पोवाडा देखील बाजीरावाच्या कारकीर्दींतला आहे.

बाजीराव गादीवर येतांच 'श्रीमंत प्रभुचें पुण्य आगळें दिसे । जीवनिं लवणापरी परस्परीं शत्रु विराले तसें ॥' हा होनाजीनें पोवाडा केला. शिंदे, पटवर्धन आणि नाना फडणीस यांनीं एकमेकांचीं कारस्थानें परस्पर हाणून पाडल्यामुळें बाजीराव गादीवर कसा आला, त्याचें हें अत्यंत समर्पक वर्णन आहे.

'परमगहन, अति सुशील, सत्य उपाय, सत्य अंतरीं । सूर्यवंशींचा राव जसा हरिश्चंद्र अयोध्यापुरीं । क्षमाशांतिचा सिंधु, सत्य निःकपट हृदयमंदिरीं ।' हें वर्णन रावबाजीच्या चारित्र्यानें जरी साफ चुकीचें ठरविलें, तरी 'आज मर्जी कोणती, उद्यांचा बेत आणिक मसलती । सेवकजन संनिध, परंतु ते कोणीच नेणती । कळों न यांच्या खुणा एकांतिच्या गुज गुह्य या प्रति । यास्तव ते नृपाळ विचारें गुप्तरूप बैसती ।' ही वस्तुस्थिति मात्र खरी आहे. परंतु आपल्या मनाचा थांग दुसऱ्यास लागूं न देण्याइतका बाजीराव चतुर होता, की त्याचें चित्त चंचल असल्यामुळें आतां एक नंतर घटकेंत त्याच्या उलट, असें त्याचें वर्तन घडे, हा मोठा प्रश्नच आहे.

'नाना रीतीं बहुतांनीं विरोधें अति उपाय योजिले । न करितांच वध हातीं तयांशीं न मारितां मारिले ।' हा उल्लेख सवाई माधवरावाला मंतरलेल्या ताइतानें बुद्धिभ्रंश करून मारिलें या गोष्टीस अनुलक्षून असावा, हा रा. यशवंतरावांचा तर्क बरोबर नाहीं. बाजीरावावरील अशा दुष्ट आरोपास होनाजी दुजोरा देईल हें संभवत नाहीं. नाना, शिंदे इत्यादिकांचीं मनें वळवून त्यांना कबजांत आणिलें, त्यांना मारिलें नाहीं, असा या ओळींचा अर्थ असावा हें संदर्भावरून दिसतें 'युक्तिनें अशा । नृप जिंकित दाही दिशा ॥' हें बाजीरावाचें वर्णन आणि जहांगीर ( जगज्जेता ) ही सेलीम बादशहाची पदवी हीं दोन्ही सारखींच अर्थशून्य होत.

बाजीरावाचा पराभव होऊन तो राज्यभ्रष्ट झाला त्यावर होनाजी बाळानें केलेला पोवाडा करुणरसपूर्ण आहे. 'दिन असतां अंधार आकाशतळीं पडला

बाई । विश्वतरंगाकार प्रभुविण शून्य दिशा दाही ॥' शत्रूवर स्वारी न करितां बाजीरावाची परराज्यांत दहशत होती; सुविचारानें आणि नीतीनें त्याचा कारभार चालला होता' वगैरे वर्णन जरी साफ चुकीचें असलें, तरी स्वराज्य गेल्यावर 'कुंकुमहीन दक्षिणवनितेचें वदन दैन्यवाणें ।' झालें यांत शंका नाहीं. हा प्रसंग 'अहा विधात्या कैसें अक्षर लिहिलें कपाळीं' असे उद्गार हाडाच्या मराठ्याकडून आज देखील काढवितो. 'नकळे ईश्वरी सूत्र पहा झाली पर्वताची राई ।' अशी मराठी राज्याची गत झाली. बाजीराव राज्यभ्रष्ट होण्यापूर्वी त्यानें जीं दानें ब्राह्मणांना क्षेत्रोक्षेत्री दिलीं होतीं तीं पुण्याई फळास आली तरच पुनः राज्यलाभ होऊन 'भेटतील स्वामी; येरव्हीं नसे उपाय कांहीं ।' हें सर्वांना कळून चुकलें होतें; असें दिसतें. 'काळमहात्म्य विचित्र । असावें सादर भोगासीं ।' अशा वेदान्तानें स्वतःचें समाधान करून घेऊन महाराष्ट्र पारतंत्र्याच्या शृंखळा मिरविण्यास तयार झाला.

खडकीच्या लढाईवर होनाजीची एक सुंदर पोवाडेवजा लावणी आहे. तिला खडकीची व **अष्टीची** लढाई असें नांव रा. यशवंतराव केळकरांनीं कां दिलें आहे तें समजत नाहीं. वर्णन केवळ खडकीच्या लढाईचें आहे. पति लढाईवर गेला असून घरीं त्याची स्त्री काळजी करिते कीं, 'पती नाहींत घरीं ग तीळ घालूं कोणाचे मुखीं । आला संक्रांतीचा सण जीव हा दुःखी ॥' खडकीची लढाई ५ नोव्हेंबर १८१७ रोजीं झाली. त्या लढाईचें वर्णन करून शेवटीं 'सरली फौज अवघी मागें, शहरांत सुटला पळ । सावकार वाणी उदमी बैसले होऊनी निर्मळ ॥ द्रव्याच्या शोकेंकरून कितीकांला भरला चळ । सोडन पुजारी गेले त्या देवाचें देऊळ । कैकांचें कुटुंब चुकलें रानांत करी तळमळ । ईश्वरी सूत्र घर ज्याचें त्याला पारखी ॥' अशी स्थिति झाल्याचें सांगितलें आहे. पुढें 'फलटणें कोरेगांवीं जाऊन घातलें कडें । उभयतांची पाहून लढाई कैकांसि धासत पडे । × × × । अशी बातमी ऐकतां काळिज माझें धडधडे ।' यावरून ता. १ जानेवारी १८१८ रोजीं झालेल्या कोरेगांवच्या लढाईचा निकाल तिला कळलेला नाहीं असेंच वर्णिलेलें दिसतें. उलट 'सांगतों भट मला यशवंत तुझे चुडे । म्हणे होनाजी बाळा अवघें

श्रीहरि निरसील सांकडें ।' असा विश्वास तिला वाटतो. अष्टीची लढाइ यानंतर झाली. तिचा नांवनिर्देश या लावणींत नाहीं. त्या लढाईचें वर्णन प्रभाकरानें थोडेंसें केलें आहे. खडकीच्या लढाईचें वर्णन सगन भाऊनें केलें आहे तें जास्त तपशीलवार आहे. त्याचें लढाईनंतरचें वर्णनही फार हृदय-द्रावक आहे. 'दळणासरसे किडे रगडिले रडती नरनारी । लेंकराला माय विसरली कसा ईश्वर तारी । आधीं गेले ते पार पडले पुण्याच्या पारीं । पुण्यावरती चढले झेंडे केली वारासारी । जो येतो तो लढतो हातामधीं भाला घेऊनी ।' सगन म्हणतो कीं, 'दक्षणच्या पेशव्याशीं घाला कधीं नव्हता झाला । गंगाधर शास्त्र्याचे वरून राज्याचा नाश झाला ॥' याच लढाईनें प्रभाकरानें केलेलें वर्णन फारच हृदयवेधक आहे; तें पुढें त्याच्या काव्याच्या विवेचनांत येईल. प्रत्यक्ष बाजीरावावरचे दोन पोवाडे व खडकीच्या लढाईचा पोवाडा असे बाजीरावींतले तीन प्रसंग होनाजीनें वर्णिले आहेत. सवाई माधवरावाच्या वेळीं रंगाचा पोवाडा होनाजीनें लिहिला आहे. हा रंगाचा समारंभ १७९३ मध्यें महादजी शिंद्यानें करविला. बहुधा त्याच दिवशीं किंवा पुढें थोड्याच दिवसांत होनाजी व प्रभाकर यांनीं त्यावर पोवाडे रचून भरदरबारांत गाऊन दाखविले. होनाजीबाळा म्हणतो, 'नानापरी गोकुळीं क्रीडले श्रीमाधवजी कुंजवनीं ॥ तें साक्षात् दृष्टि पाहिलें पुणें नगर पुण्यस्थानीं। नानापरीचे हरिचे विलास ऐकिल्या श्रवणीं । पुणें ग्राम गोकुळ, क्रीडले त्यांत कृष्ण श्रीमंत धनी । × × × । होनाजीबाळा पदरचा आहे किंकर । विज्ञप्ति श्रुत करितो जोडुनि कर । अक्षई असावी कृपा सेवकावर । धनी बक्षीस देणार ।' प्रभाकराचे शेवटचे चरण असे आहेत कीं, 'महादेव गुणिराज फेंकितो तान तनन दरबारांत । प्रभाकराचे कवन पसरलें शतावधि नगरांत ॥' दोन्ही पोवाड्यांचा प्रारंभ जवळ जवळ सारखाच आहे. होनाजी म्हणतो, 'द्वापारीं श्री माधवविलास भागवतीं पहावा । तसे कलीमध्यें रंग खेळले श्रीमंत आणि पाटिलबावा ॥' तर प्रभाकर पोवाड्याची सुरवात करतो कीं, 'जसा रंग श्रीरंग खेळले वृंदावनिं द्वापारांत । तसा रंग श्रीमंत खेळले कलियुगांत अति आदरांत ॥' प्रभाकराचा तपशील कांहींसा जास्त

आहे. परंतु मुख्य मुख्य गोष्टी दोन्ही पोवाड्यांत आहेत. तख्तराबा-म्हणजे गाड्यावरील फिरता तराफा, व त्यावर नाचणाऱ्या कलावंतिणी रंगाच्या मिरवणुकीत होत्या; त्यांचा उल्लेख दोन्ही पोवाड्यांत आहे. नानाफडणीस देखील रंग खेळले हें दोघांनाही मुद्दाम वर्णाविसें वाटलें. प्रभाकराचें वर्णन तपशीलवार केल्यामुळें खुलतें, तर होनाजीची वर्णनशैली जास्त खुलावटीची आहे. प्रभाकर म्हणतो, ‘संपूर्ण भिजले जन रंगाखालती।’ तर होनाजी म्हणतो, ‘ते दिवशीं सफेत असा कोणि नाहीं राहिला। रंगाविरहित नाहीं दृष्टीनें पाहिला। लौकिक रंग हा पृथ्वीवर पसरला। पुत्रपौत्राशीं सांगायाशीं जाहला॥’

## पौराणिक व लौकिक लावण्या

अरे प्राणसख्या! राजसा! तूं ये मजकडे।
तुझ्या प्रीतिचें मला लाविलें वेड।
राजसा! राजं अंबीरा! गुणि रे गुणवंता!

—बाळा बहिरू

होनाजी बाळाचें अध्ययन किती होतें तें कळत नाहीं. परंतु त्याच्या कवितेंत संस्कृत शब्दांचा फार भरणा असून त्यांचा उपयोग यथोचित केलेला आहे. त्यानें कांहीं संस्कृत व मिश्र रचना केलेली आहे. मराठी, हिंदी, गुजराती व संस्कृत अशा चार भाषांतील मिश्र कडव्यांची ‘गोपी मनकमळप्रियभृंगा हे श्रीरंगा वस्त्रें देई’ ही गोपीवस्त्रहरणावरील लावणी पाहातां, त्याचा गुजराथीचा व्यासंग जेमतेम दिसतो; संस्कृत फार अशुद्ध आहे; परंतु लेखक व मुद्रक यांचा तो दोष असावा असें उघड दिसतें. पौराणिक कथांवर होनाजी आणि परशुराम या दोघांनीही पुष्कळ रचना केली आहे; परंतु होनाजीची कथानकें मूळ ग्रंथांस धरून आहेत. परशुरामाच्या काव्यांत मूळ कथांवरून निघालेल्या हरदासी आख्यानांचाही समावेश बराच झाला आहे. मूळ ग्रंथास विसंगत असा एकच उल्लेख होनाजीच्या ‘या इष्काच्या पायीं बुडाले कैक लक्षापती!’ या लावणीत आढळतो. ‘पाहा शचीशीं पार्थ रतला शाप

दिला दुस्तर । नपुंसक होशी एक संवत्सर॥' हें कथानक भारताच्या अगदीं उलट आहे. अर्जुनानें शचीला तर भ्रष्ट केलें नाहींच; पण उर्वशीला इंद्रानें पाठविलें असतांही ती भरतकुलाची माता समजून तिचा मनोभंग केला म्हणून उर्वशीनें शाप दिला, अशी भारतीय कथा असतां, होनाजीनें ही विचित्र कथा कोठून आणली तें कळत नाहीं.

मार्तंड मल्हारीनें केलेला मणिमल्ल दैत्यांचा वध, अहिल्येचें आख्यान, उषास्वप्न, बाणासुराख्यान, नळानें केलेला दमयंतीत्याग, सुलोचनेचें आख्यान, श्रावणवधापासून रामजन्माची कथा, गोपीचंदाख्यान, वगैरे आख्यानांवर होनाजीच्या लावण्या आहेत. अहिल्येच्या आख्यानाची सुधारलेली आवृत्ति, म्हणजे 'अहिल्या शिळा राघवें उद्धरली' असा रामाच्या पायानें शिलोद्धार केल्याचा उल्लेख होनाजीच्या लावणींत नाहीं. 'गंगासंगमीं मिळशिल जेव्हां विधिदुहिते। मूर्तिमंत तेव्हां पावसी पूर्व देहातें ॥' इतकाच गौतमाचा उःशाप आहे. व्याधाच्या क्षुधाशमनार्थ कपोत व कपोती यांनीं अग्नींत केलेल्या देहत्यागाचें भारतीय उपाख्यान होनाजीनें फार सुरसतेनें वर्णिलें आहे.

कृष्णचरित्रांतील कित्येक आख्यानांवर होनाजीच्या लावण्या आहेत. द्रौपदीवस्त्रहरणाच्या लावणींत विलायत, कलकत्त्याचीं पातळें द्रौपदीला नेसविण्याचा अत्याचार इतर शाहीरांप्रमाणें होनाजीनें केला नाहीं. 'रुक्मिणिनें एक्या तुलसिदलानें गिरिधर प्रभु तुळिला !' या कथानकावर होनाजीची लावणी आहे. सत्यभामेनें जन्मोजन्मीं कृष्ण हाच पति असावा, यासाठीं त्याचें नारदाला दान केलें, तेव्हां 'नारद म्हणे ऊठ चाल त्वरें मजसवें जगन्नायका। विणा, गवाळें, पुस्तक सांभाळीं आमुच्या पादुका।' ही बातमी लागतांच तिच्या सवती तिला शिव्या देऊं लागल्या. स्यमंतक मण्याच्या वेळीं सत्राजितानें कृष्णाला त्रास दिला, ती गोष्ट लक्ष्मणा यज्ञजितीनें उकरून सत्यभामेचा बाप काढला. .देवकी फार खवळली व सत्यभामेला पुसूं लागली कीं, 'नव मास माझ्या उदरीं हरी गर्भस्थिति । माझें बाळ द्यावयास दान तूं कोण होसी निश्चिती ? ॥' बळिराम सैन्य घेऊन कृष्ण व नारद यांच्यामागें धांवला

तेव्हां नारदानें ' ठकवुन नेतों काय हरि या रिती ? ' असें हडसून खडसून विचारतांच बळराम मऊ आला; देवकी रडूं लागली. तेव्हां नारद म्हणतो, ' ब्रह्मादि वंदिती या यदुकुलभूषणा । अनायासें लाधला आम्हांप्रति न करितांचि साधना । ते वस्तू तुम्ही नेऊं म्हणतसां मज ठकवून ब्राह्मणा ! ॥' शेवटीं ' पालट सुवर्ण देउनी । घ्या हरी आम्हांलागुनी ॥ ' ही कृष्णांगनांची प्रार्थना नारदानें कबूल केली. कितीही सोनें घातलें तरी कृष्णाची तुळा होईना, तेव्हां ' एक चोर आणि एक मैंद ' अशा दोघांनीं भामेच्या गर्वहरणार्थ हा कपटव्यूह केल्याचें उघड झालें; पण उपाय काय ? शेवटीं इतका वेळ आपल्या महालांत स्वस्थ बसलेल्या रुक्मिणीला बोलवावें लागलें. तिनें ' भावबळें जाणुन, परतें सुवर्ण काढुनि, तुळेतें तुळसि पत्र ठेवितां पारडें उंच उसळलें ।' कृष्ण सुटला; परंतु आतां त्या स्त्रिया ' धन आशा धरुनी भांडति परस्परें । ' ' देवकी म्हणे सकला तुम्ही लबाड दिसतां, वस्ता घ्या माझ्या मज वांटुनी । सुना म्हणती सासुला कशासी ? आम्हांसि द्या वांटुनी !॥'

सांबाच्या लावणींत त्याच्या जटेंतील गंगा ही स्त्री आहे म्हणून पार्वतीनें वर्णन करावें आणि ती स्त्री नसून पाण्याची नदी आहे; तुला मुख वाटतें तें मुख नसून कमळ आहे, नेत्र नसून मासे आहेत, भुंवया नसून सलिललहरी आहेत, वगैरे सांबानें सांगावें असें अपन्हुति अलंकाराचें उत्कृष्ट उदाहरण आहे. राधा आणि कृष्ण यांचा अशाच प्रकारचा संवाद ' राधा म्हणे तुम्ही रात्रीं होतां कोणे ठाईं ! तें सांगा मजप्रति आतां सत्वर भूधरशाई !' ' राधा हरिला पुसती, नेत्र विलासती, लाल भासती, उघड दिसती दृष्ट घुर्मिली ? सांगा मजला श्रीपती काल तुम्ही रात्र कोठें क्रमिली ॥' या दोन लावण्यांत आहे. रामजोशानें राधाविलास फारसा वर्णिलेला नाहीं; परंतु ' युगीं अठ्ठाविसीं विटेवरी उभा' या आरतींतसुद्धां 'रखुमाईवल्लभा' असें म्हणतां म्हणतां चपापल्यासारखें होऊन ' राहीच्या वल्लभा ' अशी दुरुस्ती जिच्या नांवानें आज करण्यांत येते, त्या राधेला अनंतफंदी, होनाजी वगैरे शाहीरांनीं कृष्णाच्या अर्धांगीपेक्षांही जास्त हक्काची उघड सोबतीण बनविलें आहे. वर दिलेल्या कृष्णतुलेच्या अथवा भामागर्वहरणाच्या लावणींत कृष्णाच्या स्त्रियांना ' घोपी '

असेंच म्हटलें आहे. कृष्णपत्नींना गोपी म्हणण्याचा शाहीरांचा परिपाठ आहे.

पुराणांतील कथानकांना होनाजीची कल्पना कसें उठावदार स्वरूप देते याचें एक उदाहरण कृष्णाच्या नौकाक्रीडेवरील लावणींत आहे. नौकेंत क्रीडा करतांना वादळ सुटलें, सायंकाळ झाली; नौकेचीं छिद्रें गोपींनीं अंगावरचीं वस्त्रें सोडून बुजविलीं ! तरी पाणी येऊं लागलें ! त्या वेळीं. ' मच्छ नक्र कांसवें घिरोळें मंडुक सुसरी कुळें । ' या जलचरांचीच केवळ भीति नव्हती, तर नाव भलतीकडेच किनाऱ्यास लागली तर ' तृषाक्रां जळपाना सायंकाळीं आलीं श्वापदपाळें । रोहे रीस वनगाई कस्तुरीमृग जवादी मांजरें नकुळें । भयानकें धुरंधुम पाहती आम्हांकडे सिंह शार्दूळें ॥' त्यांची भीति होतीच ! ही कल्पना होनाजीची आहे. गोपींना स्वतःच्या जीवापेक्षां ' नाना यत्नें करूनि जीवाचें येथें आम्ही तुजला कोण्या परी । ' याची काळजी वाटली. ' आम्हीं चांडाळणी बसविलें नौकेमध्यें तुज धरुनि करें । ' ' पूर्वींच्या वैरिणी तुझ्या आम्हीं केवढ्या निष्ठुर । ' अशा त्या स्वतःला बोल लावून घेऊं लागल्या ! त्यांचें सांत्वन न करितां ' हरी म्हणे गोंविलें बरें कीं अनर्थामध्यें तुम्ही अशा । कृतांतभगिनीमधुन मला तारून तुम्ही तराल कशा ? । ' शेवटीं धडपड करण्याचें सोडून ' घाबरल्या अवघ्याच अंतरीं होऊनियां पिशा । न योजितां तरणोपाय बसल्या स्वस्थपणें बावऱ्या जशा ॥ ' तेव्हां कृष्णानें त्यांना डोळे झांकण्यास सांगून नाव पैलतीरीं नेली.

'श्रीरंगा ! कमळाकांता ! हरि ! पदरासी सोड ! ॥', 'कोणी घ्या रे मुरली करिंची ! शुद्ध मी विसरलें घरची ॥ '. या कृष्णलीलेच्या लावण्या रामजोशाप्रमाणेंच कृष्णाच्या कागाळ्यांच्या आहेत. मागें दिलेल्या अक्रुराच्या लावणीशिवाय ' चला सख्यांनों सर्व जाऊं या गे । त्यजुन गोकुळ या श्रीरंगाच्या मागें मागें ॥' असा आणखी एक होनाजीचा अक्रूर आहे. त्याचा भावार्थही मागच्या प्रमाणेंच, पण थोडक्यांत आणिला आहे.

मानवी विलासाचें होनाजीनें केलेलें वर्णन बहुश: शुद्ध व सात्त्विक आहे. ' निष्ठा स्वामीपदीं । आम्हां स्त्रियांचें साधन मोठें हेंच जगतामधीं ॥ "

जपतप होमहवन पुरुषांसाठीं; 'पतिव्रतेचा धर्म पतीची सेवा करावी तिनें। ईश्वर मानुनि पती सदनीं वर्ते आनंद वृत्तीनें। × × ×। मर्जी माफक विनोद एकांतीं केवळ रंभेपरी। × × मन रिझवून पतीचे पाय स्वकरें चुरी। यथानुकूल धर्मवासना संतोष सदा अंतरीं। जी गोष्ट प्रिय स्वामीला तीच साक्षेपें करी। ×××। याचपरी स्नेहमंडिता शुभसूचक कामिनी। × × ×। देह स्वामिकारणीं झिजावा हेत हृदयामधीं। होनाजी बाळा म्हणे स्त्रियांचे हे तीर्थाटन विधी॥' 'निजघर सोडुनि सखे परके घरीं। जाणें वाटे पद ठेवणें अहिफणावरी। अन्य पुरुष चंद्रवदन चतुर्थी परी-। न पाहती जन तद्वत् मनवृत्त हें सुंदरी॥' 'विलासिक जिनसांच्या संदुका झांकल्या जशा। पती गेल्यापासून सखे मी नाहीं उघडल्या तशा॥' हा पतिव्रतेचा धर्म त्यानें वर्णिला आहे. होनाजीची नायिका वल्लभाला म्हणते, 'मी कुडी, तुम्ही आत्माराम। मंगळसूत्र गळींचें तुम्ही माझें मंगळधाम। मी तों तीर्थयात्रा, तीर्थी तुम्ही केवळ पुण्यग्राम। × × ×। तुम्ही स्वामीराज; मी तंव तुमची जाया। तुम्ही कल्पवृक्ष; मी तळिंची शीतळ छाया। तव पदावरून आपली कुरवंडी करीन काया। × × ×। पूर्वसंबंधावरून मातृपितृ उदरा आलें। नंतर काया वाचा मनें वनिता तुमची झालें। साध्य साधनीं देह गेह समुळीं अवघीच विरालें।' होनाजी बाळा केवळ बाह्य सौंदर्याला किंमत देत नाहीं. 'गोरा तुझा शरीराचा डौल, वर गोरा रंग, नौति कवळो। वय नूतन, हातों निऱ्या, चालणें चपल जशी नागिण गव्हळी।' इतकेंच त्याला पुरें होत नसून 'मोहिसी मधुर भाषणें, तुझी तव अमृतकुपी रसना जैसी। पूर्णपणें भरलिस भासे मजला मूस चातुर्याची तैसी॥' हे गुणही पाहिजेत. ही त्याची नायिका तत्कालीन इतर सर्व शाहीरांप्रमाणें 'वय बारा तेरांत आली पूर्ण भरांत।' अशी अल्पवयस्क बालिका नसून, 'तनु सोळा सत्रांत चित्रीचा लेप लेपिला चित्रावळीं' अशी प्रगल्भ वयाची असावी लागते. त्या वेळच्या बालविवाहाच्या चालीनुरूप "द्वादश वर्षे, अंगीं पूर्ण भर, नौती आली रंगा।" असें एखादें वर्णन तो करतो; पण अशा विवाहाचे दुष्परिणामही दाखवितो. 'विवाहकाळीं पित्यानें मनन नाहीं केलें। कसें वृत्तीस चळण झालें। मजला जरी लोटिला

प्रवाहीं तरी असतें मेलें। कां मला अशा स्थळीं दिधलें। रत्नपरीक्षा नाहीं त्याचे हातीं रत्न गेलें। ××× दीप असतां अंधारीं दिसेना प्रकाश कांहीं। तसा तो असून मज नाहीं॥' 'छान छबेली अजब रंगेली मुखमें चावे पानविडा।' अशा नायिकेचें वर्णन 'बारा बरसका पठ्ठा देखो आगी नयनपर झुरमुर डारी' असें अनंतफंदी करतो; तर 'वय वरुषें पंधराची दिसे चंद्राची प्रभा ढवळी।' असें होनाजी म्हणतो.

होनाजीची पतिव्रता नायिका पतीला बोध करते कीं, 'नका लाऊं जिवलगा प्रीत तुम्हीं परस्त्रीचे ठाईं। ×××! आम्ही कुळींच्या स्त्रिया बऱ्यावाईट परि कुळिवंता। आमचें मन समजावुन मग धुंडा परक्या वनिता॥ जोंवरी पेज तोंवरी त्या तुमच्या बघा। पदरिंचा अर्थ सरल्यास शेवटीं दगा। फार प्रार्थिलें मघां, अझुनि तरी उमजा लवलाहीं। वर्णिती जन अवघे तुमची चतुराई॥ बहुत बोरी बाभळी उगवल्या दाट वनस्थानीं। जाईजुई मालतिचा दुष्काळ तया वनीं। ×××। कल्याण; सदा हा बोध, जरि ठसल मनीं। मानमान्यता उभयतांही प्राप्त होईल जनीं॥' हा विनयशील, पण जोरदार, नम्र परंतु अभिमानानें केलेला उपदेश पाहिला म्हणजे मम्मटानें 'कांतासंमितततयोपदेशयुजे' काव्य असावें म्हणून जें सांगितलें आहे, त्याचें मर्म समजतें! कामासक्ततेनें बेफाम झालेल्या पतीला होनाजीची नायिका म्हणते, 'मी काय आज नवी गवसलें म्हणून जिवीं अधीर येवढे झालां?। यांत मजा तरी कोणती बरी असेल वाटली चित्ताला। सांगुन फेडा भ्रांत, योग्य ना गोष्टी न होती चतुराला। कधीं नव्हते गुण असे आज आणले कोठून प्रसंगाला?॥ ×××। माहित नाहीं मुळापासून ऐसे गुण स्वप्नीं तेथें। मग शंका कायसी जावया एकांतांत निर्भय तेथें। बोध मागला क्वचित जरी असता तरी हृदयीं भेतें। उभी राहून द्वारांत तुम्हापुन शपथ आधीं वाहुन घेतें। यांवरून सावधगिरीनें मी तुमच्या खोलिंत येतें॥' पति आणि पत्नी या दोघांनाही सुख जेथें असेल तो संसार, ही अगदीं आधुनिक समान हक्कांची कल्पना होनाजीनें दिली आहे. 'अशा कोठें असतात सख्या उभय स्नेहाच्या रीती। एक लुब्ध एक निष्ठुर चित्तीं॥ ×××। प्रीत रसे तो पतंग जळे दीपक

ज्योतीवरी; दीपक न जळे; प्रीत नसे अंतरीं । भ्रमर चीत कमळिणीपासीं, नसे कमळिणीचे मानसीं । ही प्रीत एकांतिक कसी ? ॥ ' ' मी स्त्री पती माझे तुम्ही राजसा । × × × । आम्ही दोघें न होऊं श्रमी असिच काय करा योजना बरी ॥ सारी रात्र मूर्खांची घडी चतुराची एक जिवलगा । शोध करुनि अंतरीं अर्थ यांतिल काय तो बघा । श्रमऊं नये दुसऱ्यास आपणही करूं नये श्रम वाउगा । चतुर तेच जाणतिल मूर्ख नेणती वर्मिच्या रगा । भिन्नभाव स्नेहामधीं क्वचित नसावा दगा । हेंच आहे मागणें धरा जिवीं गोष्ट प्रीतिच्या नगा ॥'

केवळ रूप आणि रंगच नव्हे, तर मनही जुळलें पाहिजे तरच प्रेम जडतें, ही होनाजीची भावना आहे. ' रूप रंग चातुर्यकळा पाहून झालों खुषी । म्हणऊन एकांत केला तुशीं ॥ क्षमा शांति दया मर्यादा त्रिगुण हें तव हृदयीं वसे । नीर गंगेंत निर्मळ जसें । वदनचंद्र न्याहळितां तुझा आम्हां भासलें कसें । शेवटा प्रीत नेशिल असें । परीस आणि लोखंड उभयांचे समरसें। निपजतें शुद्ध कांचन जसें । जें होतें आमचे चित्तीं । पाहिली तशीच तुझी वृत्ती । उभयांच्या एकच रीती कूळ कुळाचरणी, धन्य तुझा जन्म मायेचे कुशीं ॥ ' या नायकाच्या सांगण्यावर नायिका उत्तर देते, ' हेतु ठेउन मजवर चिरटया घालित होतां आधीं । लाधली प्रीत नाहीं तधीं । ऋणानुबंधें स्नेह घडला, प्राणसख्या, गुणनिधी । केलि त्वदर्पण तनु आपली ही नवती लुसलुसी ॥ गुण दावुन संतोषवितां तुम्ही मज मधुरोत्तरीं। लावित ध्यान हृदयांतरीं । चालवा अथवा न चालवा प्रीत रीतीच्या परी । तुम्हांशीं ऐक्य झालें खरी ॥' याच्या 'उलट गुण न पाहतां अविचारानें प्रेम करून, अनीतीचा संबंध ठेवल्याचा परिणाम; ' बाळपणापासून जिवलगा जरी शहाणी असतें । मानभावी वचनावर तुमच्या मी तरी कां फसतें ? । न लागतां ममता गृहीं आपल्या आनंदांत असतें । मुलांलेंकरांमधीं कुटुंबीं साजरी दिसतें । × × × हजार केलेत छंद; कशास्तव मग येउन पुसतें ? ॥' असा पश्चात्ताप ठेवलेला !

## होनाजीची प्रतिभा

अनायासें सायास न करतां संगत तुझी घडली ।
पाहुनि बरवी रीत दिसोंदिस प्रीत अधिक घडली ॥ —होनाजी

महाराष्ट्र-सारस्वतकारांना रामजोशाविषयीं किंवा रा. यशवंतराव केळकरांना प्रभाकराविषयीं जसा आदर वाटतो, तितका उत्कट नसला तरी त्याच प्रकारचा आदर प्रस्तुत लेखकाला होनाजीसंबंधानें वाटतो. त्यामुळें 'होनाजी बाळांत प्रसाद आहे, पण प्रतिभा नाहीं; विषयवैचित्र्य आहे, पण वर्णनाचा विलास नाहीं; त्याच्या काव्यांत भावना आहे, पण ती व्यक्त करणानें वठविण्याइतपत भाषाप्रभुत्व नाहीं;' हा रा. यशवंतराव केळकरांचा होनाजी बाळावरील अभिप्राय विचार करण्यासारखा वाटला. होनाजीच्या काव्यांत प्रसाद आहे हें रा. यशवंतरावांना मान्यच आहे; परंतु होनाजीला प्रतिभा नाहीं असें ते म्हणतात. प्रतिभा ही चीज काय आहे हें सांगणें मोठें कठीण आहे. तथापि मागील लेखांत दिलेली 'प्रीतरसें तो पतंग जळे दीपक ज्योतीवरी; दीपक न जळे प्रीत नसे अंतरीं ।' यांत 'पतंगाच्या हृदयांत प्रेम आहे म्हणून तो ज्योतीवर झड घालून जळून जातो, परंतु दीपकाच्या अंतरांत प्रेम नाहीं म्हणून तो जळून जात नाहीं' ही कल्पना प्रतिभेशिवाय येईल का ? शाहीर तर राहूं द्याच; पण कितीशा मराठी किंवा इंग्रजी कवींनीं 'एकांगी प्रेमामुळें प्रेमी जीवाला आत्माहुति द्यावी लागते; त्याच्या प्रेमविषयाच्या तें गांवीं देखील नसतें,' हें तत्त्व इतक्या सुंदर रीतीनें दाखविलें आहे ?

होनाजी बाळाच्या कित्येक लावण्यांतील विचार इतक्या आधुनिक धर्तीचे आहेत कीं, त्याची कविता एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस लिहिली जाती तर त्याचे विचार इंग्रजी काव्यावरून चोरल्याचा भास आजकालच्या कित्येक टीकाकारांना आला असता, हें मागील उताऱ्यांवरून दिसून येईल. तसाच एक पुढील मासला आहे. 'तुझ्या प्रीतीचें दुःख मला लावूं नको रे । बघुनि जाई, प्राण घेई, जगीं ठेवूं नको रे । × × × । जगीं सांगतात प्रीत

पतंगाची सरी। झड घालुन प्राण देतो दीपकाचे वरी। हें मी सांगत असतां कां गे पडलें भरीं। रत्न टाकुन पदरांत गार घेऊं नको रे ॥' प्रतिभा आणि प्रसाद या दोन्ही गुणांची जोड होनाजीच्या काव्यास मिळाली आहे. रावबाजीसारख्या यजमानाला खुष करण्याचा प्रसंग त्याजवर न येता तर कित्येक अचकट विचकट लावण्या त्याला रचाव्या लागल्या नसत्या!

'हार नव्हता मधीं साहत कसें आज संकट वोढवलें। संसारीं भट पडुनी दोघांमधिं आड पर्वत पडले ॥' या लावणींतील हाराविषयींची कल्पना व 'दूती नसे ही माला। सवतची भासे मला। नच एकांतीं सोडीं नाथा। भेटूं न दे हृदयाला।' या खाडीलकरांच्या पदांतील कल्पना या एकच आहेत. प्रभाकराप्रमाणें होनाजीच्या बहुतेक नायिका पळपुट्या व रडतराऊत नायकाला घोड्यावर स्वार बनविणाऱ्या नाहींत. 'कधीं येशील, भेटशील, प्रीत तपशील सांगशील तरी। प्राणसख्या जीव कष्टी तुजसाठीं मैना झुरझुरी ॥' अशी बेइमान प्रियकरासाठीं झुरणारी एखादी नायिका जशी त्याच्या काव्यांत आढळते, तसाच 'तुझी माझी प्रीत येकदा कधीं घडल घडल घडल ॥' असा अधीर व आषक झालेला नायकही आढळतो. त्याचें प्रेम जर शुद्ध व पवित्र नसेल तर, 'या इष्काचे पायीं बुडाले कैक लक्षापति। खंडोमध्यें तूं एक पात्ररती ॥ स्त्री-चरित्र समुद्र त्यांतुन कोण पार पडियेला?। विरळा क्वचित त्यांत राहिला। × × × परपुरुषांचे पायीं स्त्रियांनीं सोडुन आपला वर। केली अपकीर्ती पृथ्वीवर।' अशी इशारत होनाजी बाळा पुरुषांना व स्त्रियांनाही देतो!

'त्याच्या काव्यांत भावना आहे, पण ती वठविण्याइतकें भाषाप्रभुत्व नाहीं;' असें म्हणणें किती चुकीचें आहे तें वरील उतारे दाखवितात. एखाद्या स्त्रीच्या अंगीं सौंदर्य असून तिला नखऱ्याची आवड असली किंवा तिचें वागणें ठसकेदार असलें, तरी तिचें वर्तन शुद्ध असूं शकतें हें होनाजीनें उघडपणें दाखविलें आहे. 'नाजुक रुपडें बुंद मुखोटा नवतीची लाली। पदरांतुन वर नजर पहातिस सात्विकपणें खालीं ॥' अशा नायिकेचा थाट पाहिला तर 'मागें बुचडा। अरळ झोंक माथ्यावर पदराचा। चार अंगुल्या

सरस लपविला चंद्र तारफेचा । भिवयाकमानांमध्यें बहार कुंकवाचे टिक-लीचा । अति चंचळ वर डौल घातला सात्त्विकपणाचा ॥ × × × ॥ साधी नथ नासाग्रीं शोभली बरी साध्या वसनें । पाहुन समयोचित तुझें नारी मंद मंद हांसणें । न ढळे पायींची दृष्टी सौम्य लक्षणें मुळापासने । चौकी करून मांड्यांची बौद्धरूप बसणें । × × × । मीपण मिरवून सदा पुरें जें नटपणांत नटलें । सकळ रूपाचें तेज सुख तुझ्या वदनीं एकवटलें ।' तथापि 'येवढी चाटक असुन राखिलें त्वां वजना आपुल्या । तुळतीळ सत्त्व स्वरुपास पाहुन अशा स्त्रिया दिपल्या । आधीं विषयवासना जयाच्या सर्वांगीं दिपल्या । त्या पश्चात्तापें मग होती विरक्त तप तपल्या । तसेंच तव सद्गुण-उदयीं दुर्बुद्धि समूळ खपल्या । मनशांतीच्या बळें कल्पना दुरुक्तिच्या लपल्या । निर्मळ गंगेचें नीर तुझें मन स्थीर दिसलें तसें । मंजुळ मध्यम समीर वाटतें क्षीर प्रियकर तसें । तद्वत तव देहांत धीर बहुत, गंभीर तूं स्नेहरसें । होनाजी बाळा म्हणे अशी तुज पाहुन चित्तवृत्ति धाली ॥' नखरा करूनही आपल्या दर्शनानेंच लोकांच्या मनांतील वाईट वासना नष्ट करणाऱ्या शुद्ध शीलाचा हा प्रभाव वर्णिलेला पाहून, लावणी म्हणजे येथून अश्लील असें म्हणणारांनीं हें वर्णन जरूर लक्षांत घेण्यासारखें आहे.

मर्दानी देखणेपणाचें व पोषाखाचें वर्णन होनाजी बाळानें अनेक वार केलें आहे; त्यावरून त्या वेळच्या पोषाखाची वगैरे चांगली कल्पना येते. 'नाजुक बांधा सडक आकृती ठेंगणी गोजिरी । कंगणीदार पगडी शिरीं । कंठीदार अंगरखा, दुपेटा भरनक्षी भरजरी । मस्तकीं गंध केशरी । सुवर्णतोडे सुबक हिऱ्याच्या मुद्या चमकती करीं । खुब डौल दिसे अंबरीं । गळयांत कंठी कानीं भिकबाळी शोभती ।' किंवा 'सुरतपाक देखणा पुरुष ऐसा । अमृत-कर नभोमंडळांत जैसा ॥ बत्तीस लक्षणी गुण सगुणरासी । कोठुन मुशाफर आले पुसा त्यासीं । सडपातळ आकृती लहान खासी । गौरवर्ण कोमल अंग सुखवासी ××× । बाई छेलछबीला लेप चित्रींचा । मुखीं विडा रंगीला खास पत्रीचा । राहणार कोणते पुण्य क्षेत्रींचा । कंठी कंठस्थळीं तेज लईसा ॥ श्यामकर्ण वारू सजऊन प्यारा । जीन शोभतो वर भरगच्ची सारा । सडकेला

कलगीवर जडल्या तारा। शूर शिपाई लक्षामधिं मोहरा। करून पांच पोशाक मारी लहरा। चमकावीत चालला जसा वारा। पोशाक केसरि जरि चमके गोल। मुक्तुरा, पदकीं रत्न असे अनीमोल ॥ '

मर्दानी सौंदर्याचें ध्येय म्हणजे लष्करी बाणा, असेंच होनाजी बाळाच्या वर्णनांत आढळतें. स्त्रीलावण्याच्या वर्णनांतही होनाजीचें वैशिष्ट्य आहे. ' कोण्या ग सुभगाची मदनमंजरी।' वगैरे रामजोशाचें किंवा ' टुमदार कोणाची छान। नवती भरज्वान। पुसा रे आली कुठून। स्वरुपाचे तुटती तारे कडाकड विजवा पडतील तुटून ॥' हें परशुरामाचें वर्णन जुन्या धर्तीवर आहे. प्रभाकराचें ' टपोरे नयन तुफानी तलम दुधारी बल्लम जुलुम करसी। खंजीर काळजापरि वार बरसी ॥' वगैरे वर्णन तुफानी नाविन्याचें असलें तरी त्यांत शब्दाच्या माऱ्याखालीं अर्थाकडे दुर्लक्ष होतें. नवीन आणि जुनें यांचा सुंदर मिलाफ पाहावयाचा असल्यास ' सखे गुल अनार, गुल चमन, निशीचा रमण तसा गोजिरा तुझा मुखवटा। कंठामधिं कोयाळ मधुर बोलणें रंग गोरटा ॥' या होनाजीच्या लावणींत दिसून येईल. ' बांधीव बुचडयाची लबक, पदर अति सुबक खोंविला तिपदरी वेणीचा। चंदन डहाळिस जसा लपेटा काळे नागिणिचा। मुलतानी भुंवया कशा कमाना जशा, बहार मधीं कुंकवाचे टिकलिचा। नरम ओंठ पोंवळ, तुझा नासाग्रीं झोंक नथणीचा। कंबर बारिकशी बुंद, छाती रुंद, सडक बांधा नाजुक देहींचा। लाजून बसशील दूर, पदर शिरीं सरसाउनि युक्तिचा। नयनाचा कैफी झोंक, जराशी नोक, कळे न कळे फिरविशी पटा ॥' याला ' विषयवैचित्र्य आहे, पण वर्णनाचा विलास नाहीं ' असें म्हणणें किती दूषित ग्रह दाखवितें ? या वर्णनाशीं रा. यशवंतरावांच्या मर्जीस पात्र झालेल्या प्रभाकराची लावण्यवर्णनाची लावणी ताडून पाहिल्यास प्रभाकरानें शब्दांची विनाकारण उधळपट्टी केलेली आढळेल. तुलनेसाठीं ' टपोरे नयन ' या लावणींतील वर्णनात्मक दोन चौक देतों. ' निर्मिलें शरीर विधीनें गोल सुबक समतोल, **मोल करवा। खुब नटुन थटुन घनवटुन बेपर्वा।** भांग गुलालीं सारखा भरुन, पदर घेई ठरुन, वरुन **हिरवा**। चिर कसुन, हसुन बोले **बसुन** शब्द अरवा ॥

भंवय कमाना भयंकर वढुन, मार करी अडुन, जडुन बरवा । गेला काळजांत शर गढुन, भिडुन सर्वा । कुंकवाची कपाळीं कोर । मारुन नेत्र तुझे चित्तचोर । भरपणांत नाचे मोर । न्यारे तोऱ्यांत नादरसीं ॥ १ ॥ दिसे उदार मुख धौताल, । अगर रंग लाल, गाल भरले । × × गेंद गलुंगे उभार तरतरले । दंड भुजंग सरळ दोन्ही सुरंग, लकिर मारित रंग अंगि मुरले । हरी कमर पाहुन दरीकंदरींत शिरले । चालसी चाल गजाची झुकत लुकत करी ठकत ठकत हरले । गेले पळून वनीं सारे मिळून कुणी न ठरले । हिरे जडित सर्व शृंगार । पडे उजेड अमर भुंगार । लाल जर्द नेत्र अंगार । गार नव्हे, परिसाची परसी ॥' वरील वर्णनांत जाडया टैपांत घातलेले शब्द निष्कारण आहेत हें उघड आहे. प्रासानुप्रासासाठीं रसहानि केल्याचें तें एक उत्कृष्ट उदाहरण आहे. सिंहाची कमर, हत्तीची चाल वगैरे उपमा जुन्याच आहेत. 'लाल जर्द नेत्र अंगार' हें क्रोधाचें वर्णन इतर वर्णनास—विशेषतः 'मारुनि नेत्र तुझे चित्तचोर' यास जुळत नाहीं ! भाषाप्रभुत्वाचा हा एक रा. यशवंतरावांना मान्य असा मासला असेल तर कोण जाणे !

असो. प्रेम आणि त्याचे परिणाम याचें होनाजीनें केलेलें वर्णन इतकें वैचित्र्यपूर्ण आहे कीं, त्याचीं उदाहरणें द्यावीं तितकीं थोडीं. बाह्य रूपावर नजर गुंग न होतां अंतरंगाचा भेद काढण्यांत त्याची बरोबरी तत्कालीन कवींना करितां येणार नाहीं. 'लाऊन इष्काचा तीर फोडिला पडदा अंतरिंचा ।' आणि अंतरंगाच्या जिव्हारीं पोंचून मनाचे अत्यंत सूक्ष्म भाव त्यानें प्रकट केले असें पदोपदीं दिसून येईल. कोठें 'लई अंतरिंची खोल मोठी वरनट केवळ सात्त्विक दिससी । खेळून अवघे खेळ बरवे गुप्तपणें मौजा करसी । खूबसुरत, गुण प्यारे, पाहाणाराचे मनिं भरसी । अर्जेवांत मर्जीनें गडे तूं रडत्याचे डोळे पुससी ।' अशी 'मी तुमची तुम्ही माझे' अशा

१ फक्त होनाजीनें कुंकवाची टिकली वर्णिली आहे. इतरांच्या काव्यांत कुंकवाची कोर किंवा चिरी आढळते.

मिठ्या मंजूळ शब्दांनीं ' जिकडे तिकडे वारासारी करून टाकणारी ' मोहिनी आढळेल; तर कोठें ' वरकांतीचा लोभ दाऊनी, ' ' माया लावुनी ' प्रेमळ प्रणयिनीला 'व्यर्थ झुराया' लावणारा कपटी वल्लभ आढळेल. विरहाकुलतेमुळें ' हें दुःख सांगतां नये मी झालें मुकी । × × × । सखे या गोष्टीस उपाय कोणता करूं । अवघेच दुष्ट मी पाय कोणाचे धरूं । अंतरलें ग माझें राजहंस पांखरूं । या साठीं आतां ग बाई विष खाऊनियां मरूं । हें उदास झालें मन कुठवर आंवरूं । मी मरेन आठां चौंदिसां झुरझुरूं ॥ ' असा विलाप कोणी निःसीम प्रणयिनी करिते; तर कोणी वल्लभ निरतिशय प्रेमभरानें म्हणतो, ' सखे तुझ्या जिवाची आण आम्हाला ध्यान लागलें फार तुझें सुंदरी । पंगतीस बसतां भोजना, आठव साजणी होती घडी घडी हृदयांतरी । पाणि हातांवरि पडतां धांवत येतों सखे तुझे घरीं । मुख पाहतों तुझें गडे जेव्हां मनाचा तेव्हां हर्ष आमचा न मावे अंबरीं । पाक स्नेहामधिं कल्प कदा काळीं न पडे तें करीं ॥ '

खोट्या संशयानें ग्रस्त झालेल्या प्रियकराला त्याची दयिता म्हणते, 'बिन अपराधी जसें नभानें पक्षिगणावर कोपावें । त्याजवेगळें, प्राणविसांव्या ! पक्षांनीं कोठें जावें ? । × × × । पदरीं पडलें पवित्र झालें; अमृतद्रवीं लेभावें । लागल शब्द जनांत । आपलें म्हटल्या कां उपेक्षावें ? । सर्वोपरि अन्यायी पसरितें पदर ना सोडीं बाही ॥ ' भावनावश होऊन अपराधाची कबुली तिनें दिली, परंतु असा खोटा दोष पदरीं घेणें योग्य नाहीं हें उमजून ती लगेच भानावर येऊन अभिमानानें म्हणते, ' पुरतेपणीं अपराध पाहून तो पदरीं घालून अहो गुणरासी । मग स्वस्थपणें तुम्हीं रुसावें वर्जून एकांतासी । होऊन कृपाळू आधीं समर्थे अंगिकारल्यावर ज्यासीं । राईसम अन्याय मेरुवत् दंड नसावा मग त्यासीं । मजविषयीं अहो प्राणविसांव्या दया असो तुमचे हृदयीं ।' प्रेम आणि अभिमान यांचा असा उलटा सुलटा खेळ करून शेवटीं त्यांतील मर्म ' होनाजी बाळा म्हणें पतीच्या सेवेस सदा राहीं । ' क्षणांत भडका उडून खलास होणारें प्रेम होनाजीला मान्य नाहीं. ' जसें पुष्प कवळें पक्व होतां अधिक सुवासावें । तसें प्रीतीचें लक्षण दिसतें

दिसेंदिवस झालें ठावें ।' असें प्रेम तो गातो. येथें अनुषंगानें जातां जातां सांगावयाचें म्हणजे 'सुवासावें' सारखीं नामापासून क्रियापदें बनविण्याची लकब हरि नारायण आपटयांपूर्वी सुमारें एक शतक होनाजीनें दाखविली आहे. प्रभाकराच्या काव्यांत असे अनेक शब्द बनविलेले दिसतात. असे शब्द साधण्याची चाल शाहिरांचवा काळीं भाषेची प्रगती कशी झाली होती तें दाखविते, हें भाषाशास्त्राच्या प्रमेयांवरून कळेल.

संत कवि परमार्थाचा बोध करण्यास प्रपंचांतील उदाहरणें देतात; होनाजी 'नको आणुं मनिं द्वैत, सत्य सत्यार्थ जीविं परिसीं ।' अशा आध्यात्मिक परिभाषेनें प्रेमोपदेश करतो !

लावण्यवर्णन करितांना एके ठिकाणीं 'लखलखाट चकचकाट जैसें दुकान बोहऱ्याचें ।' अशी एक उपमा दिली आहे, त्यावरून पेशवाईत देखील बोहरी चकचकीत असें कांचेचें व धातूंचें सामान विकीत असावे असें अनुमान निघतें.

सात्त्विक प्रेम आणि ईश्वरभक्ति हीं सारखींच मोक्षप्रद आहेत असें होनाजीनें 'गुणिजन गुणमंडिता पाहतां अहो सद्गुणरासी' या लावणींत वर्णिलें आहे. त्याची नायिका म्हणते 'तुम्ही केलें पवित्र मला म्हणऊन पदरिं पडलें । फळलें तप पूर्वींचें तव अर्धांगीं जडलें । × × × । भागीरथींत घडलें स्नान कारण काय इतर जलासीं ॥ प्रयत्नेंविण अनायासें लाधलें निजसुख प्राप्तीचें । मग कासया करावें साधन क्षुद्र दैवतांचें । सुधा प्राशिल्यावर काय भयें पळावें जीवित्वाचे । संजीवनी साधल्या यत्न काय अनेक मंत्रांचे । घरीं आलिया आदित्य मग कारण काय दीपाचें ॥ × × × ॥ भाग्य उदय सौख्यांत अष्ट अंगीं मी निवालें । विरक्त मात्र स्वतःसिद्ध नाभिकमळापासून धालें । साध्यसाधनीं देहगेह समुळीं अवघीच विरालें । ब्रह्मानंद डोहांत एक सद्भावें मी बुडालें ॥ यांतील सारांश असा मुळीं एक शुद्ध सद्भाव । तरी प्राप्तीचा अनायासें स्वामीपदकमळीं ठाव । सत्वार्थी

असावी सन्मार्गी मनाची धांव । तरीच जड देह नाव पार होईल पैलतिराशीं । होनाजी बाळा म्हणे मी करीन पवित्र पवित्राशीं । '

महादजी शिंद्यानें दिल्लीस मराठ्यांचें बस्तान बसविलें तेव्हां पुणें हें हिंदुस्थानचें केंद्र झालें. देशोदेशींचे मुशाफर पुण्यांत येत. आज युरोपांतील राजधान्या व देशोदेशींचीं मोकळीं बंदरें ( Treaty ports ) येथें प्रवास करणाऱ्या मुशाफरांना मोहून, रंगविलासांत दंग करून, त्यांच्या जवळ असेल नसेल तें बुचाडून घेणाऱ्या पण्यांगना आहेत, तशा या मराठी राजधानींतही त्या वेळीं होत्या. असे मुशाफर व त्यांना लोभविणाऱ्या स्त्रिया यांचीं संभाषणें शाहिरी काव्यांत आहेत. ' खर्चून द्रव्य अपार जरी जरतार वस्त्रभूषणें । घेऊन देईन तुम्हांस ल्यायास सख्या हौसेनें ।' असें म्हणून मोह घालणाऱ्या स्त्रीलाही ' नटचंचल मैना तूं दिसती बाजिंदी जी जी । ममता लाऊन नको करूं मनधरणी जी जी । × × × । तुम्हीं दक्षिणदेशी × × जादु गारिणी जी जी । म्हणून प्रीत कराया भितों अंतःकरणीं जी जी । ' असें सांगणारा एखादा भित्रा मुशाफर भेटला तरी त्यालाही ' गोंउनियां वचनांत महालीं ' नेणाऱ्या मोहना 'बाछाई तक्त गुलजार दिसे रंग बहार पुण्याची वस्ती । श्रीकृष्णाची द्वारका कीं सुवर्ण लंका नगरी दिसती ।' अशा पुण्य नगरींत होत्या तरी ' या पुण्यासारिखें क्षेत्र कोठें नाहीं । छप्पन्न देशिंचे मनुष्य एक्या ठायीं । श्रीमंत पेशवे धनी ब्राह्मण बाछाई ॥ ' हा अभिमान शाहिरांत होताच. या मुशाफरांचा वेष ' शिरीं मंदिल बांधिला मजेचा । शुभ्र दुपेटा जरी पैठणिचा । कंठीं पदक तळिं लोलक निळीचा । साधा बाणा मुशाफरीचा । मुखीं विडा रंगला लाल । करि सफर ॥ घोडा सारंगा बहु ज्ञानी । वर प्रकाशला दिनमानीं । ढालासुरई कमरेस बांधुनी । हातांत रंगीत भाला लाल मुशाफर ॥ ' असा असे.

या विवेचनावरून होनाजी बाळाच्या काव्यांत वैचित्र्याबरोबर वर्णनाचा विलास, प्रसादासह प्रतिभा, आणि भावनेसह भाषेचें सौंदर्य आहे, हें सहज पटेल. होनाजी बाळाचा अंत पेशवाई बुडाल्यानंतर थोड्याच काळानें झाला

असावा. त्याचा शेवट फार घोरपणें करण्यांत आला. एका भाद्रपद कृष्ण त्रयोदशीच्या दिवशीं दोन महारांनीं त्याला वानवडीकडे बोलावून नेलें. वानवडीच्या अलीकडील रानांत त्याला कांहीं मारेकऱ्यांनीं बेदम मारून निवडुगांत टाकिलें. दोन प्रहर रात्र उलटल्यावर त्याला शहरांत आदित-वार पेठेच्या कोंपऱ्यावर आणून टाकिलें. दुसऱ्या दिवशीं त्याचा प्राणांत झाला. कोणी म्हणतात कीं, त्या महारांजवळून सातआठ रुपयांचें गवत त्यानें घेतलें, त्यावरून बोलाचाली वाढून शेवटीं हा प्रकार झाला; तर प्रतिस्पर्धी तमासगिरांना त्याचा हेवा वाटून त्यांनीं मारेकरी घातले, असेंही कोणी म्हणतात. तमासगीर मंडळानें जमून मोठ्या थाटानें वाजत गाजत त्याचें प्रेत नेऊन त्याला अग्निसंस्कार केला. अद्याप भाद्रपद कृष्ण चतुर्दशीस शहरांतील सर्व तमाशे त्याच्या वाड्यापुढें जाऊन हजिरी 'देतात म्हण-तात' अशी माहिती रा. यशवंतराव केळकरांनी दिली आहे.



# प्रभाकर

प्रभाकर जनार्दन दातार याच्या कवितांचा संग्रह पुण्याच्या चित्रशाळेनें मिळवून प्रसिद्ध केला आहे, त्यांत प्रभाकराचा जन्म इ. स. १७६९ व मृत्यु इ. स. १८४३ असा दिला असून, तो आपल्या वयाच्या ७५ या वर्षी वारल्याचें सांगितलें आहे. महाराष्ट्र सारस्वतांत प्रभाकर शके १७६५ (इ. स. १८४३ ) मध्यें वयाच्या ७४ व्या वर्षी वारला असा उल्लेख आहे. इ. स. १९२० मध्यें प्रभाकराची कविता प्रसिद्ध करते वेळीं जोडलेल्या त्याच्या छोटया चरित्रात्मक प्रस्तावनेंत 'प्रभाकराची धाकटी मुलगी यमुनाबाई ही हयात असून तिचें वय त्या वेळीं ( इ. स. १९२० मध्यें ) सुमारें नव्वद वर्षांचें आहे,' असा निर्देश आहे. तिनें प्रभाकरासंबंधीं बरीच विश्वसनीय माहिती सांगितल्याबद्दल प्रकाशकांनीं तिचे आभारही मानिले आहेत. प्रभाकर पडला रा. यशवंतरावांचा आवडता कवि ! तेव्हां त्याच्या संबंधानें त्याच्या मुलीनें दिलेली माहिती किंवा चित्रशाळा प्रतीच्या प्रकाशकांची माहिती चुकीची असा जांवईशोध लावून, प्रभाकराच्या कवितेंतील अंतर्गत पुराव्यावरून प्रभाकराचा जन्मकाळ इ. स. १७५५ किंवा त्यापूर्वीही न्यावा लागेल असें रा. यशवंतरावांनीं ठरविलें आहे. रा. यशवंतराव म्हणतात, 'संग्रहाला जोडलेल्या चरित्रांतील माहिती खुद्द प्रभाकराच्या धाकटया मुलीनें सांगितलेली आहे. परंतु प्रत्यंतर पुराव्यानें ती विश्वसनीय मानणें धोक्याचें दिसतें. कारण एक तर प्रभाकरासंबंधींची माहिती ज्या वेळीं यमुनाबाईसाहेब पटवर्धनांनीं सांगितली त्या वेळीं त्यांचें वय ९० वर्षांचें असल्याचें संपादकांनीं नमूद करून ठेविलें आहे. **त्यांतूनही त्या पडल्या बाईमाणूस.** विस्मृतिप्रभावामुळें म्हाताऱ्याची साक्ष मानूं नये असें म्हणतात. तें कसें खरें ठरतें तें या बाईनी सांगितलेल्या माहितीवरून स्पष्ट दिसतें. संपादकांनीं मुख्यतः याच बाईच्या हकीकतीवर भरंवसा ठेविला आहे. त्यांनीं खुद्द प्रभाकराच्या कवितेंतून मिळणारी माहिती घेतलेली नाहीं. यामुळें त्यांनीं दिलेलें प्रभाकराचें चरित्र विश्वसनीय मानवत नाहीं.'

रा. भाव्यांना ‘ दडपेगिरी ’ चा दोष देणाऱ्या रा. यशवंतरावांची दडपेगिरी वरील विधानांत व्यक्त होते. प्रथम प्रभाकराच्या चरित्राची हकीकत ‘ मुख्यतः ’ यमुनाबाईंच्या सांगण्यावरून घेतली, इतर पुराव्याचा विचार संपादकांनीं केला नाहीं, या यशवंतरावांच्या विधानास कांहींएक आधार नाहीं. दुसरें, स्त्रीवर्गासंबंधीं हलकी बुद्धि दर्शविली असा रामजोशांवर वृथारोप करणाऱ्या रा. यशवंतरावांनीं ‘ त्यांतूनही त्या पडल्या बाई माणूस, ’ अशा तुच्छतादर्शक उद्गारांनीं स्त्रियांविषयीं स्वतःची क्षुद्र बुद्धि मात्र उघड केली आहे. तिसरें, प्रभाकराच्या जन्ममृत्यूचा काळ प्रकाशकांनीं केवळ यमुनाबाईच्या सांगीवरून नमूद केला असें धरून चाललें, तरी त्यापैकीं त्याच्या मृत्यूचा काळ १८४३ इ. हा रा. यशवंतरावांना मान्य आहे. प्रश्न इतकाच कीं, एकाद्या पांढरपेशा ब्राह्मण घराण्यांतील स्त्रीला, आपला जन्म झाला त्या वेळीं आपल्या वडिलांचें वय किती होतें किंवा आपले वडील किती वयाचे होऊन वारले, याचा म्हातारपणामुळें विसर पडेल कीं काय ? म्हाताऱ्याची साक्ष मानूं नये, हा सिद्धांतही चुकीचा आहे. जुन्या हकीकतीं संबंधानें वृद्धांचें म्हणणें मुद्दाम नमूद करण्यांत येतें. आपले वाडवडील दीर्घायुषी होते असें मानण्याचा व सांगण्याचा कल बहुधा आढळतो; त्या अर्थीं प्रभाकर जर नव्वद वर्षे उमर होऊन वारला असता तर त्याची हयात अवघी पाऊणशें वर्षांची होती असें यमुनाबाईनीं सहसा सांगितलें नसतें.

आतां ज्या अंतर्गत पुराव्यावरून प्रभाकराचा जन्मकाळ १७६९ नसून १७५५ किंवा त्यापूर्वी असावा असें रा. यशवंतराव ठरवूं पाहातात तो पुरावा पाहूं. रा. यशवंतराव हा पुरावा प्रभाकराच्या चार लावण्यांतून काढूं पाहातात. त्यांतील पहिली म्हणजे नं. २१ ची ‘ नका जाऊं दूर देशीं घरीं काय द्रव्याला कमी । आली हो वर्षाची नागपंचमी ॥’ ही लावणी आहे. ‘लावणी १७७० च्या सुमारास लिहिली गेली आहे. ’ असें रा. यशवंतरावांचें मत होण्यास जे उतारे आधारास त्या लावणींतून ते घेतात ते असेः—

‘झिरमिर झिरमिर पर्जन्य वरसे भर महिना श्रावण । कठिण लष्करची हवा दारुण । महोत्सव नगरांत मिळाले देशावरील ब्राह्मण । पाहूं सुखसोहळा दोघे

जण ॥ ' ' मुळीं मुलुख कर्नाटक । निर्दयी लोक कंटक । विश्वासघातकी ठक । बिकट झाली चहूंकडून । बाऱ्या कठिण निर्जल भूमी ॥'

या वर्णनावरून लावणींतील नायिका श्रावण महिन्यांत कर्नाटकच्या स्वारीवर निघणाऱ्या आपल्या पतीला या वेळीं जाऊं नका असें सांगत असल्याचें दिसतें; हा रा. यशवंतरावांचा तर्क बिनचूक आहे. परंतु लावणींत ज्या कर्नाटकावरील स्वारीचा उल्लेख आला आहे ती थोरल्या माधवराव पेशव्यानें १७७० च्या 'आगेंमागें' केलेली हैदरावरील मोहीम असावी, हा रा. यशवंतरावांचा तर्क मात्र अगदीं निराधार असून त्यास लावणीत कांहीं एक आधार नाहीं. रा. यशवंतराव म्हणतात, " १७७० सालीं हैदरअल्लीवरची तिसरी स्वारी करण्याची तयारी झाली. ( ऐतिहासिक लेखसंग्रह, पत्र नं. १००३ पाहा ) त्यांत लावणींतील नायिकेनें सांगितलेली हकीकतच दिलेली आहे. ' श्रावण मासाचा समारंभ झालेनंतर मग हिशेब पहाणेचा डौल. यंदा श्रीमंतांचे वाड्यांत दशग्रंथी ब्राह्मण ४०० व पंडित वर्षाप्रमाणें.... दक्षणाही बरीच होत्ये...खासा श्रीमंत भाद्रपद शु० सप्तमीस डेरेदाखल होणार अशी बोलवा आहे. ' वरील प्रत्यंतर पुराव्यानें ही लावणी इ. स. १७७० सालीं भाद्रपदाच्या आधीं रचली गेली हें निःसंशय आहे. ', रा. यशवंतराव इतके ' निःसंशय ' कां व्हावे तें कळत नाहीं. श्रावणांतील हकीकतीवर चार सहा महिन्यांनंतर लावणी रचणें असंभवनीय नाहीं. श्रीमंत भाद्रपद शु० सप्तमीस डेरेदाखल होण्याची बोलवा होती, त्या अर्थी श्रावण शु० पंचमीस म्हणजे एक महिनाभर पूर्वीं नायिकेच्या पतीला जाण्याची इतकी घाई असेलसें वाटत नाहीं. ' नगरांत मिळाले देशावरिल ब्राह्मण । ' हाच उल्लेख घ्यावयाचा असेल तर ही व्यवस्था दरसाल श्रावण मासाच्या समारंभाच्या वेळीं होत असे हें पुराव्यादाखल घेतलेल्या पत्रांतील ' वर्षाप्रमाणें ' या उल्लेखावरून स्पष्ट होतें. यावरून रा. यशवंतरावांच्या 'निःसंशय' या शब्दाला महत्त्व राहात नाहीं. लावणींत ज्या मोहिमेचा उल्लेख आला आहे, ती कर्नाटकावरील मराठ्यांनीं केलेली शेवटची मोहिम असेंही नाहीं. ही लावणी प्रभाकर सुमारें पंधरा सोळा वर्षांचा

असतां त्यानें किंवा महादू सुतारानें किंवा गंगू हैबतीनें रचली असून, प्रभाकर ज्या गंगू हैबतीच्या फडासाठीं लावण्या करी त्या फडाकडून प्रसिद्ध करण्यांत आली, हें यशवंतरावांना मान्य आहे. प्रभाकराचा जन्म १७६९ सालीं असला तर त्याच्या वयाच्या पंधरा सोळाव्या वर्षाच्या सुमारास म्हणजे इ. स. १७८५ सालीं मराठ्यांची टिपू सुलतानावर कर्नाटकांत स्वारी झाली होती. ही टिपूवरील मोहीम 'सन १७८५ पासून सारखी वर्षभर चालू होती.' नरगुंदकर भावे यांच्या मदतीस परशुराम भाऊ वगैरे पेशव्यांचे सरदार गेले होते, त्यांच्याशीं तह करून, ते तेथून गेल्यावर टि् सुलतानानें विश्वासघात करून नरगुंदचा किल्ला घेतला; भावे यांस बंदींत घालून क्रूरपणें ठार मारविलें; त्यांच्या कन्येशीं जबरदस्तीनें विवाह केला; म्हणून ही स्वारी केली. ' निर्दई लोक कंटक। विश्वासघातकी ठक ॥ ' हें लावणीतील वर्णन या हकीकतीस जास्त जुळतें. 'पुढें दिपवाळी करून बेत मग जाण्याचा ठरविला ॥' यावरून या मोहिमेवर जाणें अगदीं निकडीचें नव्हतें म्हणूनच नायिकेची 'उतरा जिन घोड्यावरील हो!' ही विनती तिच्या पतीनें मान्य केली. १७९०--९१ च्या मोहिमेस देखील ही लावणी अनुलक्षून असेल.

यापुढील नं. २२ ची दुसरी लावणी ' परम परदेश कठिण कांते कसें ग तुज न्यावें सगुण शांते ॥ ' ही आहे. ' हिचाही विषय कर्नाटकच्या स्वारीचा आहे ' हें अनुमान रा. यशवंतराव कशावरून काढतात तें कळत नाहीं. ' ठेवूनि हस्तीवर जरिपटका। निघाले रावसाहेब कटका। ' हें वर्णन थोरल्या माधवरावांच्या कर्नाटकावरील स्वारीस जसें साजेल, तसेंच सवाई माधवरावानें निजामावर स्वारी करून खर्ड्याची लढाई जिंकली त्या वेळीं निघालेल्या फौजेच्या वर्णनासही साजेल. " हैदरअल्लीवरील तीन स्वाऱ्यांपैकीं कोणत्या तरी एका स्वारीच्या वेळचा या लावणीचा काळ आहे. " हें रा. यशवंतरावांचें विधान अगदीं चुकीचें आहे. पहिली स्वारी १७६० त झाली. रा. यशवंतरावांच्या म्हणण्याप्रमाणें प्रभाकराचा जन्मकाळ १७५५ धरला तरी त्या वेळीं तो केवळ पांच वर्षांचा होता. दुसरी स्वारी १७६५ च्या सुमारास झाली तेव्हांही त्याचें वय त्यांच्या म्हणण्याप्रमाणें १० वर्षांचें

असेल. त्यानें गंगू हैबतीच्या फडांत पांचव्या किंवा दहाव्या वर्षी जर इतकें नांव कमविलें असेल तर तो मोठा लोकोत्तर कवि खरा! या लावणीच्या शेवटीं ‘कवन गंगु हैबती! झडती नांवाच्या नौबती! माहादेव गुणी सुगर प्रभाकर सुमित्र रसवंते॥’ अशी अटक आहे. त्यांतील ‘रसवंते’ याचा अर्थ ‘गोड गळयानें गाणारे’ असा करून रा. यशवंतराव प्रभाकराची गणना गोड गळयाच्या गवयांत करितात. परंतु चित्रशाळा प्रतीचे संपादक म्हणतात, “प्रभाकरपंत हे स्वतः कीर्तन किंवा तमाशा करीत नसत. त्यांचे पोवाडे व लावण्या गंगू हैबती, महादबा सुतार व गंगाधर हे तमाशांत गात असत.” ही बातमी देखील यमुनाबाईनीं दिलेली असून तिच्या म्हातारपणाच्या विसरभोळेपणाची निदर्शक असावी असा निष्कर्ष काढण्यासाठीं ‘रसवंते’ म्हणजे गोड गळ्याचे गवयी असा ‘यशवन्ती’ अर्थ घेणें भाग आहे.

रा. यशवंतरावांनीं या बाबतींत पुराव्यादाखल घेतलेली तिसरी नं. २३ ची लावणी ‘कधीं ग भेटशिल आतां जिवाचे जिवलग मैतरणी। ऐन उन्हाळ्यामध्यें मुलखगिरी कठिण प्रियकरणी॥’ ही त्याच काळची व त्याच मोहिमांसंबंधाची (तीहींपैकीं कोणत्या?) आहे’ असा रा. यशवंतरावांचा तर्क व्हातो. या लावणीचा निर्देश रा. यशवंतरावांनीं केला नसता तर बरें झालें असतें. ‘आला कपाळीं प्रवास आतां समय कसा टळतो। अंतर्ध्यानीं स्मरण होतांना मद ठिकाणचा ढळतो। धीर न धरवे तोही आवरतां वस्त्रांतरीं गळतो।’ असें रडगाणें गाणाऱ्या स्त्रैण शिपायांच्या जोरावर थोरल्या माधवरावांची कीर्ति खात्रीनें उभारलेली नाहीं. यशवंतराव म्हणतात कीं, “गंगु हैबती म्हणे जतन कर नवतिची बहरी। फत्ते करून खावंद त्वरीत येतिल पुण्यशहरीं। महादेव गुणिराज कविची जरब पडे कर्णीं। प्रभाकराचे छंदबाण भेदती अंतःकरणीं॥ या तुकावरून गंगुहैबतीची ही लावणी हैदरअल्लीवरील स्वारीचे वेळींच तयार झाली हें उघड दिसतें. त्याचप्रमाणें प्रभाकराच्या वयावरहि या तुकानें प्रकाश पडतो.” या तुकांत हैदरअल्लीच्या स्वारीचा किंवा प्रभाकराच्या वयाचा उल्लेख काय आहे तें समजणें अशक्य आहे.. हा एक यशवंतरावांच्या दडपेगिरीचा मात्र नामी मासला आहे. वस्तुतः या

लावणींतील उपरिनिर्दिष्ट अश्लील वर्णनावरून आणि ' कंठ येतो भरभरून मुलुखगिरी कठिण लष्करची । घाम मुखींचा कोण पुशिल मग सय होइल घरची । येती उन्हाच्या झळा स्वारि जाचेल घोड्यावरची । कोण खबर कळवील तुला गे नारी प्रहराप्रहराची । मुखांत मुख घालुन गोष्टी कोण सांगेल अंतरिंची । क्षणक्षणां येतें रडूं जणूं फुटेल सागरची ॥ मृगजलापरी ठाईं ठाईं तुला आम्हीं पहात फिरूं धरणी ॥ ' या तिसऱ्या चौकावरून ही लावणी म्हणणारा वरील तुकांत उल्लेखिलेला 'खावंद' नायक दुसरा रावबाजी असावा असा बळकट संशय येतो. प्रभाकरानें ज्या लावण्या रावबाजीवर लिहिल्या, असें रा. यशवंतराव म्हणतात, त्यांच्या शेवटास मात्र 'प्रभाकरानें बूट प्रियकर गायिला ॥ ' ' प्रभाकराच्या किती गुणावर होती लंपट गुणिजन रावे ॥ ' प्रभाकर कवनीं रस भरी ' ' प्रभाकराचें कवन सुरस ऐकाया । ' असे वरील तुकांतील शेवटच्या चरणांशीं सदृश उद्गार आहेत. या पुढील चौथ्या नं. २४ च्या लावणींतील नायक व नायिका हीं दोघेंही कुच करीत असलेल्या फौजेंत आहेत असें दिसतें. लावणींत कर्नाटकच्या स्वारीचा मागमूस नाहीं तरी ' ही देखील कर्नाटकच्या मोहिमेसंबंधींची आहे ' ही रा. यशवंतरावांची दडपेगिरी आहेच. या लावणींतील ' धर्मस्वरूप साक्षात् ज्याच्या स्मरणेंकरून संकटें लपती । ' हें वर्णन सवाई माधवरावासंबंधानें तत्कालीन पत्रांत, लेखांत, व इतर शाहिरी काव्यांत आढळतें. सवाइ माधवराव हा ईश्वरी अवतार होता असें वर्णन होनाजी, अनंतफंदी, यांनीं व इतर शाहिरांनींही केलें आहे. निजामावरील मोहिमेचा थाट या लावणींत वर्णिलेला दिसतो. ' चहुंकडे सेवक यशस्वी होती हें पुण्य त्या पायांचें ।' ' सवाई माधवराव प्रतापी कलियुगांत अवतरले ॥ भूभार सर्व हराया । युगायुगीं अवतार धरी हरी दानव संहराया । कलियुगीं धर्म ताराया । ब्राह्मणवंशीं जन्म घेतला रिपु निर्मूळ कराया । ' असें खुद्द प्रभाकरानेंच खर्ड्यावरील पोंवाड्यांत सवाई माधवरावाचें वर्णन केलें आहे. ' खुद्द थोरल्या माधवरावाचेंच छावणींतील वर्णन आहे, ' हें रा. यशवंतरावांचें विधान आणि " करि कवन गंगु हैबती । जीवन ठेउनि महादेव गुणिराज म्हणे । ही चतुर सुगर

कांता पाहिली । प्रभाकरावर बहाल मर्जी दोघांची जाहली ॥ या शेवटा-वरून मागें वर्णन केलेला प्रभाकराचा काळ निश्चित ठरतो " हेंही त्यांचें विधान हीं दोन्ही विधानें सारखींच दडपेगिरीचीं आहेत.

" सारांश वर दिलेल्या चार लावण्यांतील अंत:पुराव्यावरून '( १ ) गंगू हैबतीचा फड थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दीपासून गाजत होता आणि ( २ ) १७७० पासून प्रभाकर त्या फडांत लावणी रचणारा व गाणारा म्हणून सामील झालेला होता' या गोष्टी सिद्ध होतात." असें बेगुमानपणें ठोकून देऊन चरित्रकारांच्या कपाळीं रा. यशवंतराव चूक मारूं पाहातात ती त्यांचीच घोडचूक दिसते.

' प्रभाकराचा बाप जनार्दन हा किंवा प्रभाकराचा आजा नाशिक जिल्ह्यांत गंगापूर येथें राहाण्याकरितां आला. तेथेंच प्रभाकराचा जन्म झाला. विसाव्या किंवा बाविसाव्या वर्षी म्हणजे इ. स. १७९० च्या सुमारास प्रभाकर गंगा-पूर सोडून पुण्यास आले. तेथें श्री. खंडेराव रास्ते यांचे पदरीं त्यांना शागिर्दपेशांत कारकुनीची असामी मिळाली. पेशवाई अस्तास गेल्यावर, उतारवयांत रास्ते यांच्याकडून ऐशीं रुपयांचें वर्षासन प्रभाकरपंतास मिळत असे. त्यांच्या पश्चात् त्यांच्या स्त्रीस तिचे हयातीपर्यंत निम्मे वर्षासन चालू होतें,' अशी हकीकत चरित्रकारांनीं दिली आहे. " प्रभाकराचा बाप कारकुनी-पेशांत होता; '**बाप वारल्यामुळें**' १७९० च्या सुमारास प्रभाकर पुण्यास आला; " असें चरित्रकारांनीं कोठेंही म्हटल्याचें १९२० सालच्या सालच्या चित्रशाळा प्रतींत प्रस्तुत लेखकास आढळलें नाहीं. परंतु चरित्रकारानें तसें म्हटलें आहे व ती चूक आहे, असा रा. यशवंतरावांचा आग्रह आहे. ' प्रभाकराचा बाप जनार्दनपंत दातार हा गंगापुरास राहात नव्हता, तर खुद्द पुण्यास पेशव्यांच्या वाड्यांत फडांत नोकरीस होता ' असा शोध रा. यशवंत-रावांनीं लाविला आहे. सवाई माधवरावांच्या पहिल्या लग्नांत बारीकसारीक कामें निरनिराळ्या लोकांकडे नेमून दिल्याच्या याद्या रा. यशवंतरावांना उपलब्ध झाल्या. त्यांत सोयऱ्यांना शिधे वगैरे देण्याच्या कामावर नेमलेल्या कारकुनांच्या दोनचार ( दोन कीं चार ? ) याद्यांत त्यांना **जनार्दन प्रभाकर** असें नांव आढळलें. त्यांतील एक यादी ' मुद्दाम ' आपल्या

'ऐतिहासिक पोवाड्यां' च्या प्रस्तावनेंत त्यांनीं छापिली आहे. त्या यादींत सोळा कारकुनांचीं नांवें देऊन सतरावें **जनार्दन प्रभाकर** हें नांव त्यांनीं जाड्या ठळक टाईपांत छापिलें आहे.

प्रभाकर आणि त्याचा बाप जनार्दन या दोघांचींही नांवें या यादींतील नांवांत एकत्र आहेत हें अगदीं कबूल! पण प्रभाकराच्या आजाचें नांव 'प्रभाकर' असेंच होतें याला आधार कोणता? आजाचें नांव बहुधा वडील नातवाला ठेवण्याची चाल आहे. प्रभाकराला ज्येष्ठ बंधु होता असें चरित्रकारांनीं दिलें आहे. त्याला आजाचें नांव ठेवणें साहजिक आहे. अर्थात् जनार्दनपंतांच्या बापाचें नांव प्रभाकर असणें संभवनीय नाहीं. त्यांतूनही वरील यादींतला जनार्दन प्रभाकर म्हणजे प्रभाकर शाहिराचा बाप जनार्दनपंत दातार हें तरी कशावरून? रा. यशवंतरावांच्या कल्पनेबाहेर कांहीं आधार असल्याचें त्यांनीं दिलेलें नाहीं. या असल्या काल्पनिक आधारावर यमुनाबाई म्हातारचळ लागलेली स्त्री होती असें ठरवूं पाहाणाऱ्या रा. यशवंतरावांच्या धाडसाची तारीफ करावी, कीं त्यांच्या अहंमन्यतेची करावी? शहाजी राजाच्या पदरीं 'अभेद' नांवाचा एक आश्रित होता. अभेद म्हणजे अभयद, अभयद=अभयकर=अभ्यंकर; अभ्यंकर हा चित्पावनच असला पाहिजे. म्हणून शहाजीराजाच्या पदरीं असलेला 'अभेद' हा चित्पावन होता अशी जी कल्पनेची भरारी रा. राजवाड्यांनीं 'राधा-माधवविलास-चंपू'त 'भी' आणि 'भिद्' या दोन्ही धातूंना काखोटीस लावून, मारिली आहे, तिचाच संसर्ग रा. यशवंतरावांना लागलेला दिसतो.

---

# सवाईमाधवरावावरील पोवाडे.

वृथैव वैतागुन। काय त्या गत गोष्टी सांगुन॥

—प्रभाकर

'चित्पावन कोंकणस्थ ब्राह्मणांत जे थोडे कवि झाले त्यांत प्रभाकर हा बरच्यापैकीं दिसतो. एकंदर शाहीरमंडळींत तर हा फार वरच्या पायरीचा कवि आहे.' असें महाराष्ट्रसारस्वतकार रा. भावे प्रभाकराविषयीं म्हणतात

त्यांत पुष्कळच तथ्य आहे. तथापि प्रभाकराचें खरें कवित्व त्याच्या पोवाड्यांत दिसून येतें. अनंतफंदीच्या काव्याचें वैशिष्ट्य त्याच्या ऐतिहासिक रचनेपेक्षां फटके व लावण्या यांत उठावानें दिसतें; त्याच्या उलट प्रभाकराच्या काव्याचें उज्ज्वल स्वरूप त्याच्या स्फुट लावण्यांपेक्षां पोवाड्यांत दिसून येतें. प्रभाकराच्या काव्याचें समालोचन केल्यावर अशी वस्तुस्थिति घडून येण्यास काय कारणें झालीं असावीं, त्याचा विचार करणें सोईचें होईल.

इतर शाहिरांपेक्षां प्रभाकराचे जास्त ऐतिहासिक पोवाडे उपलब्ध आहेत. त्याच्या तेरा प्रसिद्ध पोवाड्यांपैकीं तीन सवाई माधवरावावर आहेत, दोन दुसऱ्या बाजीरावावर आहेत. दोन पेशवेवंशाचें वर्णन करितात. दुसऱ्या सयाजीराव गायकवाडावर दोन आहेत. अहिल्याबाईवर एक आहे. राघोजी आंग्र्यावर एक आहे. एकांत हिंदुस्थानांतील कित्येक राजवंशांची व सरदार घराण्यांची, सावकारांची वगैरे नामावळ आहे व मुंबईचे सुप्रसिद्ध नाना शंकरशेट यांजवरील पोवाड्याचा एक चौक तेवढा प्रसिद्ध झालेला आहे. विषय आणि रचनाकाल या दोनही बाबतींत प्रभाकाराच्या पोंवाड्यांपैकीं सवाई माधवरावाच्या रंगाचा पोंवाडा हाच पहिला ठरतो असें निर्विवाद म्हणतां येईल. ही रंगाची स्वारी चालली असतां ‘ घरोघरीं नरनारी झुरुझुरुक्यांतुनि उभ्या शृंगारांत । गुलाल गर्दी पेल दुतर्फा रंग रिचविती बहरांत । × × × । वेत्रपाणि वारिती तरी झाली गर्दी मोठी बुधवारांत । × × × । आधिंच पुणें गुलजार तशामधें अपूर्व वसला आदितवार । त्यांत कृष्ण श्रीमंत आवंतर समस्त यादव परिवार । हरिपंततात्यांनीं उडविला रंग केशरी अनिवार । हास्यवदन राजेंद्र मुखावरि शेला लाविति वारंवार ॥ ’ वगैरे वर्णन बहारीचें आहे.

या पोवाड्याचें व यापुढील खड्याच्या लढाईवरील पोंवाड्याचें थोडेसें विवरण होनाजीच्या आणि अनंतफंदीच्या काव्यविवेचनाच्या वेळीं आलेंच आहे. खड्याच्या लढाईवरील पोंवाड्याचे प्रारंभीं रघुनाथरावाला पदभ्रष्ट केल्यापासून खड्याच्या लढाईपर्यंतचा इतिहास आहे. ‘ नंद तोतया सहज

मोडिला । तळेगांवावर इंग्रज हरला । इष्टुर साहिब रणींच विरला । × × × । सर्वेच गाढर पुढेंच सरला । शिकस्त खाउनि तोही फिरला । फिरून पुण्याकडे कधीं पाहिना ।' तोतयाचें बंड व इंग्रजांचा पराभव यानंतर सवाई माधवरावाच्या मुंजीचा समारंभ वर्णिला आहे. १७४६ इ० मध्यें टिपूकडून बदामीचा किल्ला काबीज केल्याची हकीकत दिली आहे. त्यानंतर 'सत्राशें तेरावें ( १७९१ ) वरीस अवघड गेलें पहिल्या परीस । करनाटकच्या पहा स्वारीस । टोपीकर मोंगल पडले भरीस । तरी तो टिपू येइना हारीस । त्यावर तात्या गेले परीस । आणुन टिपू खूब जेरीस ।' हें मोंगल, इंग्रज व मराठे यांनीं टिपूवर केलेल्या १७९१ तील मोहिमेचें वर्णन आहे. 'नका जाऊं दूर देशीं ।' या नं. २२ च्या लावणींतील ज्या कर्नाटकच्या स्वारीच्या उल्लेखावरून रा. यशवंतराव प्रभाकराचा जन्मकाळ ठरवूं पहातात ती स्वारी बहुधा हीच असावी. या वेळीं प्रभाकराचें वय वीसबावीस वर्षांचें असून तो नुकताच पुण्यास आलेला होता असें प्रभाकराचे चरित्रकार म्हणतात. त्या वेळीं केलेल्या लावणींत तत्कालीन प्रचलित विषय म्हणून ज्या कर्नाटकच्या स्वारीचा त्यानें उल्लेख केला, त्याच मोहिमेचें वर्णन या खर्ड्यावरील पोवाड्यांत जास्त विस्तृत रीतीनें त्यानें पुढें केलें असावें असा निष्कर्ष निघतो. याच पोवाड्याच्या ज्या चौकांत महादजी शिंद्याची बालपेशव्यावर कशी भक्ति होती; महादजीची थोरवी किती होती; त्याच्या आणि हरिपंत तात्यांच्या मृत्यूनें मराठी राज्याची कशी हानि झाली; त्यामुळें निजामासारख्या शत्रूस अवसान आलें असतांही नानाफडणिसांचा धीर खचला नाहीं वगैरे वर्णनें आहेत, तो या पोवाड्यांतील दुसरा चौक महत्त्वाचा व तितकाच काव्यमय आहे. त्याचा कांहीं भाग येथें देणें योग्य होईल. तो असा:—

**महादजीची थोरवी—**

'मुगुटमणी ते पाटिलबावा । कोठवर त्यांचा प्रताप गावा । दर्शनमात्रें तापच जावा । नवस **नवसितां**, फळास यावा । हरहमेशा शत्रुसि दावा । माहित सगळा मराठी कावा । '

**महादजीची बालपेशव्यावरील भक्ति—**

'राव जेव्हां नालकींत बैसले। कृष्ण तेव्हां ते जनास दिसले। अर्जुन पाटिलबावा भासले। पायपोस पदरानें पुसले। चरणीं मिठी माराया घुसले। कर प्रभूंनीं बगलेंत खुपसले। इमानी चाकर नाहींत असले। धन्य धनी आणि धन्य दास ते।'

**महादजी व हरिपंत यांचें निधन—**

'गुलाम सोदे बुडवुन पाजी। पंत प्रधान राखुन राजी। लष्कर दुनया करून ताजी। शके सत्रार्शे पंधरामाजी। माघमासीं भली मारून बाजी। पाटिलबावा सुरमर्द गाजी। अगोदर गेले विष्णुपदा जी। शरीर वानवडीस ठेवुनी॥ सवाचार महिन्यांचें अंतर। हरीपंत तात्या गेले नंतर। तेथें न चाले तंतरमंतर। वर्तमान हें एक अधिकोत्तर। कांहीं न करिती नाना उत्तर। दिलगीर मर्जी सुकलें अंतर! **हिरे हरपले राहिले फत्तर**। × × ×। दौलतीचे आज खांबच खचले। लाल होते ते कोठेंच पचले। शिपायांचे काय चुडेच पिचले॥'

नाना व महादजी यांची स्पर्धा असली, तरी महादजीच्या हयातींत तरी मराठी राज्यांत आपणांला पेशव्याहून वरचढ होतां येणार नाहीं याची जाणीव नानाला होती. दोघेही पेशवाईसाठीं आपलीं खासगी भांडणें विसरण्यास तयार होते. अगदींच तुटण्याचा वेळ आला असतां दोघांचीही समजूत घालणारे हरिपंत तात्यांसारखे नानाचे हितचिंतक शूर शिपाईगडी हयात होते. महादजी आणि हरिपंत हे '**हिरे हरपल, राहिले फत्तर;**' हें प्रभाकराचें वर्णन वस्तुस्थितीची योग्य जाणीव देतें. अनंतफंदीच्या खड्र्याच्या पोवाड्याबरोबर प्रभाकराच्या या पोवाड्यांतील इतर भागांची विस्तृत माहिती मागेंच दिली आहे.

'हरीपंत तात्या गेले नंतर। **तेथें न चाले तंतरमंतर**।' हें सांगण्यांत मोठेंसें स्वारस्य नाहीं. 'नंतर' याला यमक जुळविण्यासाठीं 'तंतरमंतर' प्रभाकरानें आणिलें आहे. अशा प्रकारचे दोष प्रभाकराच्या कवितेंत बरेच आढळतात. प्रभाकराच्या वर्णनांतील अत्यंत काव्यमय भागांत देखील यमक

आणि प्रास साधण्याच्या भरांत अर्थहानि होते. सवाई माधवरावाच्या मृत्यू-वरील अत्यंत हृदयभेदक अशा प्रभाकराच्या पोवाडयांत देखील हा दोष आढळतो.

'कमि नव्हते पृथ्वींत अवातर प्राणी न्यायाला। औक्ष कसें कमि झालें सवाई माधवरायाला ॥' असा या पोवाडयाचा आरंभ आहे. सवाई माधवरावाच्या मृत्यूचा दुर्धर प्रसंग महाराष्ट्रावर कोसळला तेव्हांपासून हे उद्गार प्रत्येकाच्या तोंडून निघाले असले पाहिजेत. 'क्षीरसागरीं कृष्णास मुदत भरतांक्षणीं बोलविलें। तसें रावसाहेबांस अकल्पित वरून पालविलें।' 'शक्ति घेऊन श्रीहरी निघून जातां मूळ ठायाला। सव्यसाचीसारखे लागले मागें पाहायला।' कृष्ण निधनानंतर पांडवांची निराधार स्थिति झाली; अर्जुनासारख्या भारतीय वीराला यःकश्चित् चोरांनीं कुटून काढिलें व त्याच्या डोळ्यांदेखत यादवांची संपत्ति व यादवस्त्रिया यांना पळवून नेलें. ती उपमा देऊन सवाई माधवरावाच्यामृत्यूनंतर मराठी राज्यांत जी बजबजपुरी माजली तिचें प्रभाकरानें केलेलें वर्णन यथार्थ नाहीं असें कोण म्हणेल? आठव्या चौकापासून पंधराव्या चौकापर्यंत यशोदाबाईनें केलेल्या विलापाचें वर्णन आहे; तें उत्तरोत्तर जास्त हृदयभेदक होत गेलें आहे. 'कां ग कुलस्वामिणी कोपलिस मजवरती। × × ×। कसें माझें दुर्दैव उपजलें चांडाळिण पुरती। म्हणुन श्रीमंत प्रभुची मजला अंतरली मूर्ती।' असा जो त्या निपुत्रिक पतिव्रता तरुण विधवेचा शोक आटव्या चौकांत सुरू होतो, त्याचा शेवट पंधराव्या चौकांत अगदीं साहजिकपणें 'हिरकणी कुटुन जाऊं पाण्यामध्यें कालवूं। ती पिऊन पहुडतें नका ग मज हालवूं। जा समया मालवून आपल्या घरास न्हायाला। **जिवंत मी असल्यास** उद्यां या नेत्र पुसायाला ॥' असा होतो. आपल्यापेक्षां आपली वडील सवत रमाबाई हिनें 'भोगिलें कांहिं तरी सुख।' ही स्त्रीस्वभावसहज आठवण तिला होते. 'संकट पडलें काय दिलासेल जिव संतापानें!' असें म्हणतांना 'दिलासेल' हा शुद्ध कोंकणी चित्पावनी वाक्प्रचार तिच्या तोंडून शोकावेशांत निघालेला प्रभाकरानें दाखविला आहे. 'पतिपूर्वी सौभाग्यवत्या ज्या पुत्रवत्या मरती। इहलोकीं परलोकीं धन्य

त्या कुलास उद्धरती ।' त्यांचें भाग्य आपणास नाहीं ! आपण निपुत्रिक, याचा तिला अत्यंत खेद वाटतो. 'ईश्वरा कशी मजवर आग पाखडलीस । आयुष्य-दोरि तूं मधेंच कातरलीस । कां पेशव्यांचि ही वंशवेल खुडलिस ? ' 'वंशवना-वर चहुंकडून क्षय दावाग्नी वळला !' 'पोटीं जरी एक झालें असतें राजबीज लेंकरूं । राज्य न बुडतें; मी मात्र मरतें शोक सदा करकरूं !' असे उद्गार तिच्या तोंडून निघतात.

'येथें न चले यत्न बृहस्पति, भार्गव, चंद्राचा । उपाय असता तरी न मरता बाप् रामचंद्राचा । ' हा वेदांत तिच्या मनाला शांति न देतां उलट तिच्या दारुण अवस्थेची असहायता वाढवून 'हरहर, जगन्निवासा, आतां काय करूं ? ' असे निर्वाणीचे शब्द तिच्याकडून वदवितो आणि हिरकणी खाऊन जीव देणें हाच निर्वाणींचा मार्ग आतां उरला असें तिला वाटतें ! 'दुःखातिरेकानें अश्रु सुकले तसा जीवही जाणार ! ' अशा भावनेनें ती आपल्या सख्यांना सांगते कीं, 'माझे नेत्र पुसायला उद्यां या ! उद्यां जीव राहिला तर अश्रु पुसण्याची वेळ येणार ! जीवच राहाणार नाहीं; तर अश्रु तरी कोठले ? जा माझ्यावर आलेल्या प्रसंगांत कोणाची सोबत नको ! दिवा देखील नको ! ' अशा रीतीनें 'जा समया मालवून आपल्या घरास न्हायाला । जिवंत मी असल्यास उद्यां या नेत्र पुसायाला ॥ ' हें साधें आणि मर्मभेदक वाक्य यशोदाबाईच्या तोंडीं घालून प्रभाकरानें त्यांत व्यंजनेनें किती तरी अर्थ आणिला आहे. शोकानें होरपळून गेलेल्या एका तरुण, कुलीन, साध्वी अशा हिंदु पतिव्रतेच्या शोकाची साक्षात् मूर्ति मनःश्चक्षूंपुढें उभी करणारे ते उद्गार आहेत.

याच पोवाड्यांत आणखी लक्षांत येण्यासारखी गोष्ट म्हणजे महादजी शिंद्याच्या मृत्यूनंतरच्या काळांत झालेला नाना फडणिसाच्या वृत्तींतील फरक ! खर्ड्याच्या पोवाड्यांत 'धन्य धन्य नानाचें शहाणपण । बृहस्पती ते बनले आपण ।' अशी नानांची ज्या प्रभाकरानें स्तुति केली, त्यानेंच सवाई माधवरा-वाच्या मृत्यूस नानाफडणिसाचा जाच कसा कारण झाला तें दिलें आहे. 'नाना फडणिसाच्या हितशत्रूंनीं नानाची निंदा चालविली होती; सदर

पोवाड्यांतही त्या प्रवादाचें प्राबल्य दिसून येतें.' असें म्हणून तो प्रवाद खोटा असल्याचें रा. यशवंतराव ध्वनित करितात. 'प्रभाकराची माहिती ऐतिहासिक कागदपत्रांशीं तंतोतंत जुळते. × × × त्याचा पोवाडा एकुण एक असाच शुद्ध असतो.' अशी प्रभाकराची शिफारस करणाऱ्या रा. यशवंत-रावांना नानांवरील प्रवादांत मात्र प्रभाकर लोकप्रवादांमुळें चकला असें वाटावें हें नवल आहे. 'थोरल्या बाजीरावाचा कारभार चिमाजी आप्पा पाहात. नानासाहेबांचे कारभारी भाऊसाहेब होते. थोरल्या माधवरावसाहे-बांचा कारभार नारायणरावसाहेब पाहात असत' या पूर्व वहिवाटीप्रमाणें नानांनीं कारभार सोडून, जुन्नरास नजरकैदेंत असलेल्या बाजीरावास कारभारी करावें, निदान त्याचा सहवास आपणांस असावा, असें सवाई माधव-रावाला वाटूं लागलें. परंतु 'वर्तमान कळतांच असें आलि गोष्ट निकरास। नये नानाचे मनास, जाहलें विपरीत इतरांस। झिडकारुनि एकांतीं वदती। नित्य सरकारास। स्वस्थ असावें आपण जेउन पंचामृत सुग्रास। बहुत हट्ट जरी कराल तरी तुम्ही मुकाल प्राणांस। त्यांची अवस्था तीच तुमची पुढें येईल निकरास। शब्दशरें ताडितां लोचनीं जळबिंदू वाहती।' दुसऱ्या दिवशीं अंबारींतून त्यानें उडी घालण्याचा प्रयत्न केला. अखेरच्या निरवा-निरवीसारख्या गोष्टी यशोदाबाईपाशीं केल्या; व शेवटीं कारंज्यावर उडी टाकली; या प्रभाकरानें वर्णिलेल्या गोष्टींनाही ऐतिहासिक कागदपत्रांचा पुरावा आहे. खुद्द प्रभाकराचा त्या वेळीं दरबारांत प्रवेश होता. असें असतां त्यानें केलेलें वर्णन खोटें कां समजावें ?

सवाई माधवरावाच्या मृत्यूच्या पोवाड्यांत सवाई माधवरावाचा मृत्यु सूर्यास्ताबरोबर झाला तेथून प्रळयाला सुरवात झाली. (रवि मावळतां वरी मरण झडकरी आलें सखयाला। इथुन आतां प्रारंभ दिसंदिस अद्भुत प्रळ-याला।) असें वर्णन आहे. त्याचप्रमाणें पोवाड्याच्या शेवटच्या चौकांत 'धन्य वंश एकेक पुरुष जणुं कल्पवृक्ष पिकले। शत वर्षें द्विजपक्षी आनंदें त्या तरुवर टिकले। जलचर, हैदर, नबाब सन्मुख रण करितां थकले। ज्यांनीं पुण्याकडे विलोकिलें ते संपत्तिला मुकले। असे प्रभु कसे अमर कराया

ब्रह्मदेव चुकले । गहन गती कर्माची सर्वजण पूर्वी फळ विकलें ।' असे उद्गार आहेत. त्यांत पेशवाईला शंभर वर्षें पुरी झाल्याचा उल्लेख आहे. तसेंच अखेरच्या तुकांत ' कोण करिल प्रतिपाळ मुलुखास लागली बत्ती । × × × । प्रभाकराचें कवन प्रतिष्ठित सभेंत गायाला । अशा कवीची बुज नाहीं कोणि करायाला ॥ ' असें म्हटलें आहे. या एकंदर उद्गारांवरून हा पोवाडा रावबाजीनें राजसंन्यास केल्यावर व पेशवाई बुडाल्यावर रचला गेला असावा असें वाटतें. प्रभाकराला बाजीरावाचा चांगला आश्रय होता. त्या अर्थी ' अशा कवीची बुज नाहीं कोणि करायाला ।' हे उद्गार पेशवाईच्या अखेरीनंतरचे असावे व पोवाडा १८१८ इ. नंतर रचला गेला, असें दिसतें. अशा या सुंदर पोवाड्याच्या आरंभींच यमक साधण्याच्या भरांत प्रभाकरानें चुका करून ठेवल्या आहेत. सवाई माधवरावाच्या जन्मकालाचें वर्णन ' कड-कडित दुपारचे अवसरीं । झाला जन्म हा दैदीप्यमान पुतळा । जणुं सूर्य उगवला प्रकाश करि भूतळा ।' यांतील ' कडकडित दुपारीं सूर्य उगवला ' हें वर्णन विसंगत आहे. तसेंच ' महोत्साह घरोघरीं लोक लागले करायाला । परशुराम प्रत्यक्ष आले छत्र धरायाला ॥ ' यांत सवाई माधवराव हा प्रत्यक्ष परशुरामाचा 'छत्रपति' अवतार आहे असें सांगावयाचें आहे. 'छत्र धरायाला म्हणजे राज्य करायाला ' असाच अर्थ रा. यशवंतरावांनींही केला आहे. छत्र-पति म्हणजे छत्र धरणारा हुजऱ्या नव्हे. अगोदरच्या चरणांतील ' करा-याला' याचें यमक ' धरायाला ' असें जोडलें. पण त्यामुळें अर्थहानि होते.

---

## बाजीरावाचे पोवाडे

**एक वेळ हाताचे कमानीपासून तीर सुटला ।**
**आला मागें परतून असा नाहीं कोणी कोठें पाहिला।**

—होनाजी बाळा

सवाई माधवरावाच्या मृत्यूच्या पोवाड्यांत जशी त्याची सर्व कारकीर्द प्रभाकरानें संक्षिप्तपणें दिली आहे, तशीच ' यशस्वी झाले श्रीमंत पहिले सर्वे लढायाला । आतांच आलें अपेश कोठुन बाजीरायाला ॥' या पोवाड्यांत

बाजीरावाच्या जन्मापासून राज्यभ्रष्टतेपर्यंतची कारकीर्द पंधरा चौकांत वर्णिली आहे. या पोवाड्यांतील दुसरा, तिसरा व चौथा या तीन चौकांत अनंत फंदीच्या माधव-ग्रंथांतील हकीकत आली आहे. परंतु नानाफडणिसानें केलेल्या महाडच्या कारस्थानाची अनंतफंदीनें गाळलेली हकीकत त्यांत जास्त विस्तृत आलेली आहे. अमृतराव, बाजीराव आणि चिमाजी आपा यांची एकमेकांवर फार बंधुप्रीति होती; ' एकास नख लागल्या दुःख होई त्रिवर्ग भावांस । ' ही प्रभाकरानें सांगितलेली वस्तुस्थिति अनंतफंदीनें केलेल्या वर्णनाशीं जुळते. या त्रिवर्ग बंधूंना कोपरगांवाहून नानानें जुन्नरास नेऊन ठेविलें आणि तेथें ' मांडिला अति सासुरवास । ' प्रभाकर पुढें म्हणतो कीं, ' इतक्या संधींत सवाई माधवराव मरण पावले । तेव्हांपासून **नानांनीं राक्षसी कपटडौल दाखविले ।** ' दौलतराव शिंदे व नाना यांचा मतभेद; नानांचा बाजीरावास कैद करून आपास वस्त्रें देण्याचा बेत; वगैरे हकीकतीचा प्रभाकरानें फारच संक्षेप केला आहे. परंतु शिंद्याच्या भीतीनें नाना वाईस जावयाला निघाले आणि 'साताऱ्यांत राहून लागले भेद करायाला । ' बाळोबानें बाजीरावाला कैद करून चिमाजी आपाला दत्तक केला, त्यांत नानाचें अंग होतें, असें प्रभाकरही म्हणतो. परंतु ' करारांत दोघांच्या कांहीं झाली गफलत । म्हणुनी फिरून नानांनीं उलटी मारुनि केली गल्लत । ' बाळोबा आणि परशुरामभाऊ पटवर्धन यांना महाडचें कारस्थान करून नानानें कसें फशीं पाडलें तें प्रभाकरानें मोठ्या सुरसतेनें सांगितलें आहे. ' सूत्रधारी जो पुरुष ज्याच्या गुणांसि जग भुलत । हातांत सगळे दोर पतंगापरि फौजा हालत । परशुराम, रामचंद्र आणि बाळोबास ठाउक रण । राज्यकारणी नव्हेत, एक केसरी, एक वारण । कठिण गांठ नानाशीं न चाले तेथें जारणमारण । ' यांत एक सिंह आणि एक हत्ती यांना नानासारखा कोल्हा कसा भारी झाला, हा विचार सहज सुचतो. ( ' जारणमारण न चले ' या अर्थहीन चरणाची सांगड या मार्मिक वर्णनाशीं घालणाऱ्या प्रभाकराचा आचरटपणाही दिसून येतो. ) असो. 'महाडास बसून नानांनीं बेत ठरविले । बाळोबास शिंद्याकडून कैद करविलें । शिवनेरी गडावर पटवर्धन धरविले ।' परशुरामभाऊला प्रभाकराचे यजमान 'रास्ते राहिले जामिन प्रसंगीं अवघड समयाला ।'

पुढें नानानें बाजीरावाला गादीवर बसविलें; नाना वारले; त्यानंतर यशवंत रावांची स्वारी झाली. ' सोडिना कंबर कधीं काढिना पायजमा । कुच मुकाम दररोज बनेना पलंगीं निजायाला । घेई जोठाची पचंग, ( खादीच्या जाड कापडाचा कमरबंद बांधी ) समरीं कोण जिंकील याला ? ॥ ' असें यशवंतराव होळकराचें वर्णन प्रभाकरानें केलें आहे. होळकराच्या भयानें बाजीराव पुण्याहून पळाला. ' खंडेराव रास्त्यांनीं प्रभुला वसईस नेउनियां । सुखांत होते स्वस्थ पंचामृत जेवुनियां । इंग्रजांस कुमकेस प्रसंगीं बरोबर घेउनियां । ' या वर्णनांतील खंडेराव रास्ते हे प्रभाकराचे यजमान. पुढें प्रसिद्धीस आलेला बाळाजी नारायण नातू हा याच रास्त्यांच्या पदरीं शागीर्दपेशांत होता. मस्तानीचा नातू अलीबहाद्दर यानें कोट रुपयांचा नवा मुलुख सोडविला होता. तो त्याजकडेच सरंजामादाखल होता. त्याच्या सनदा बाजीरावानें इंग्रजांस करून दिल्याचा उल्लेख प्रभाकरानें केला आहे. इंग्रजांच्या मदतीनें बाजीराव पुण्याला आला. ' झाला बंदोबस्त सर्वही पहिल्यासारखा । परि घरांत शिरला शत्रु सबळ पारखा । लाल शरीर, टोपी, अंगीं आठ प्रहर आंगरखा । धर्मकर्म ना जातपात स्थल नाहीं बसायाला । असें असून सम्पूर्ण व्यापिला प्राण हरायाला ॥ '

गंगाधर शास्त्र्याच्या खुनाचें निमित्त करून इंग्रजांनीं आपले पाय जास्त रोंवले; त्याचें वर्णन प्रभाकर करतो; " फार दिवस जपत होते या इंग्रज राज्याला । अनायासें निमित्त झालें पंढरपुरास कज्जाला । संकट पडलें, कांहीं सुचेना प्रधान पूज्याला । रति ( दैवगती ) फिरली सारांश, मिळाले लोक अपूज्याला । भय, चिंता, रोगांनीं ग्रासिलें काळिज मज्जांला । पदर पसरिती उणाख आणखी नीच निर्लज्जाला । परम कठिण वाटलें, आठवलें त्रिभुवन रावबाजीला ।'

त्रिंबकजी डेंगळा कैदेंतून पळाला त्याचा फायदा इंग्रजांनीं घेतला. ' इंग्रजांचा अन्यायी ( त्रिंबकजी ) निघाला, ( त्याला ) पाठ ( पाठिंबा ) पेशव्याची । म्हणून साहेब लोकांनीं आरंभिली आगळिक दाव्याची । वसई-प्रांत, कल्याण गेली; गुजराथ पुराव्याची । रायगड, सिंहगड बेलाग जागा

केवळ विसाव्याची। कर्नाटक दिलें लिहून, ठाणीं बैसलीं पराव्यांचीं। कोणास न कळे इमारत इंग्रजी काव्याची।'

यानंतर खडकीची लढाई; 'बैसले राव दुर्बिणींत युद्ध लक्षित।' 'दीड प्रहर रात्र होते श्रीमंत दम खाऊनी। गेली स्वारी मग मशाला हिलाला लावुनी। जलदी करूनी साहेबांनी लाविलें निशाण ुणियाला। खेंचुन वाड्या-बाहेर काढिलें कदीम शिपायाला॥' त्यापुढील कथा म्हणजे 'रात्रंदिवस श्रीमंत न घेतां उसंत, पुढें पळती।' नाहीं म्हणायला अष्टीच्या लढाईंत, 'माघ शुद्ध पौर्णिमेस बापुसाहेब (गोखले) रणीं भिडले। जखम करून जर्नेलास फिरतां जन म्हणती पडले।'

पळत्या रावबाजीच्या या सरत्या मोहिमीचें प्रभाकराचें वर्णन अत्यंत हृदयद्रावक आहे. "नाहीं स्नान शयन, नाहीं स्वस्थपणें जेवले। 'आले! आले!' ऐकतां उठपळ राव धांवले। गर्भगळित जाहले, लागले शुष्क दिसायाला। बाईसाहेबांना फुरसद न पडे बसून न्हायाला॥ दिवाळी आणि संक्रांत कंठिला दुःखांत फाल्गुन। रागरंग नाहीं आनंद ठाउक रायालागुन। सदैव चिंताग्रस्त, शब्द बोलती वैतागुन। कर जोडुन फौजेस पाहिलें घडो-घडीं सांगुन। धैर्य धरुन कोणी कसून लढेना, क्रियेस जागून। **कर्म पुढें प्रारब्ध धांवतें लगबग मागून**॥ × × ×॥ ओढवलें कसें सर्वांचें समयीं संचित। कडकडुन पडलें गगन जसें अवचित। दुःखाचे झाले डोंगर नाहीं सुख किंचित॥ × × ×। जे श्रीमंत सुकुमार वनांतरीं ते भटकत फिरती। कळेल तिकडे भरदिसास प्रभु कांट्यामधी शिरती। आपला घोडा आपण स्वहस्तें चुचकारुन धरती। खालीं पसरून उपवस्त्रा दिलगिरींत वर निद्रा करती। अस्तमानीं कधीं रात्रीं भात भक्षिती पाटावरती। दरकुच दरमजलिस कृपेंतिल सेवक अंतरती। पेशव्यांचे वंशांत नाहीं कोणी असा कहर पाहिला। हत्ती, घोडे, उंट, खजीना जेथिल तेथें राहिला।' तरीही प्रभाकर बाजीरावाची स्तुतिच करतो कीं, 'बाजीराव होय धन्य! म्हणून यापरी आक्रांत साहिला।' नर्मदेस शालिवाहन शक संपतो; तेथेंच या शेवटच्या पेशव्यांनीं 'पंती शक' ठेवून दिला; असें वर्णन करतांना प्रभा-

कराच्या हृदयास ज्या यातना झाल्या तितक्या तरी ती गोष्ट प्रत्यक्ष करतांना रावबाजीला झाल्या, कीं एकदाचा या यातायातींतून सुटलों म्हणून आनंद झाला, तें त्याचें त्याला ठाऊक!

'महाराज उपेक्षुन आम्हांस जाऊं नये। ××। हिंमत सोडूं नये सर्व पुढें येईल उदयाला। कोण काळ कोण दिवस धन्यांनीं पुसावें हृदयाला।' असें सांगणारी फौज होती; पण बाजीरावाला हिंमत नव्हती. 'प्राण असुन शरीरांत बुडालों वियोगलोटांत।' अशी सैन्याची अवस्था करून बाजीराव इंग्रजांच्या स्वाधीन झाला. 'कुंकवावांचुनि कपाळ, मंगळसूत्रावांचुनि गळा। तसा सैन्यसमुदाय उदासिन रंग दिसे वेगळा॥' शेवटीं 'कसें प्रभूंनीं ब्रह्मावर्त शहर वसविलें। अगदींच पुण्याच्या लोकांना फसविलें। हुरहुर करीत उन्हांत कां बसविलें।' असें म्हणत बसण्याचा प्रसंग आला.

'विपरित आला काळ मेरुला गिळलें मुंग्यांनीं। पंडितास जिंकिलें सभेमधिं मदांध भंग्यांनीं। भीमास आणिलें हारीस रणांगणिं अशक्त लुंग्यांनीं। कुबेरास पळविलें कसें आकिंचन तेलंग्यांनीं। जळीं राघवमाशास अडविलें असंख्य झिंग्यांनीं। जर्जर झाला विष्णुवाहन बदकांचे दंग्यांनीं। ईश्वरसत्ता विचित्र सारें दैवानें घडविलें।' असें प्रभाकर शोकावेगाच्या पहिल्या भरांत म्हणतो; त्यापेक्षां 'फितुर करुन सर्वांनीं आपलें राज्य मात्र बुडविलें।' हा त्याचा या पोवाड्याच्या शेवटचा निष्कर्षच खरा! अनंतफंदी व होनाजी बाळा यांच्याप्रमाणें 'पावेल जर शंकर। तर दृष्टी पुढें पडतिल राव लवकर॥' असा प्रभाकराचाही विश्वास असलेला दिसतो.

बाजीरावावरील दुसरा पोवाडा 'श्रीमंत झाले लोक श्रीमंतांपासुन लक्षावधी। दुरावले ते श्रीमंत आपल्या दृष्टिस पडतिल कधी॥' असा आहे. त्यांत फक्त पेशव्यांचे सरदार आणि सोयरे यांची यादी आहे. तेवढेंच त्या पोवाड्याचें महत्त्व! नाहीं म्हणावयास 'धन्य प्रभू पेशवे ज्यांचें ऐश्वर्य बघुन मन रिझे। परशत्रूंचें सैन्य ठायिंच्या ठायीं प्रसंगीं झिजे। सुखी केला मुलखांत केशरी भात घरोघर शिजे। गृहस्थ-भिक्षुकांचें गोरवें तुपांत मनगट भिजे। तीर्थोतीर्थीं नित्य शेरभर सोनें सकाळीं झिजे। नाहीं दुःख कोणास, पळंबीं

आनंदांत जन निजे ॥ ' हें रावबाजीच्या काळाचें, दुष्काळ पेंढारांतून बचावून निघालेल्या ' अजात रिपु हे प्रजा, इतःपर मजावृष्टि शिरकली । ' अशा रामजोशानें वर्णिलेल्या पुण्यांतील प्रजेच्या औटघटकेच्या सुखाचें वर्णन या पोवाड्याच्या शेवटीं दिलें आहे. प्रभाकरानें पोवाड्यांत दिलेल्या यादींतील शेंकडों सरदारांपैकीं एकाच्याही अंगीं हे नामर्द विलास उधळून लावून महाराष्ट्राची मर्दुमकी जागृत करण्याची शक्ति असूं नये या विचारानें मन विषण्ण होतें !

बाजीरावावरील दोन्ही पोवाडे त्याच्या कारकिर्दीची इतिश्री झाल्यावर रचले गेले. पेशवेवंशावरील एक पोवाडा पानपतच्या लढाईपर्यंतच्या वर्णनाचा आहे. त्यांत ' प्रभुच्या पणज्यांनीं । पुढें प्रधानपद मिळवून, वैरी पळवून मारिल्या शर्थी ॥ ' असें बाळाजी विश्वनाथाचें वर्णन आहे. बाळाजी विश्वनाथ हा थोरले माधवराव, नारायणराव आणि दुसरा बाजीराव या तिघांही पेशव्यांचा पणजा लागतो. परंतु थोरले माधवराव किंवा नारायणराव यांच्यावर प्रभाकराचें कांहींच काव्य आढळत नाहीं. ' हा पोवाडा दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत रचलेला आहे,' असेंच रा. यशवंतराव केळकरांचेंही मत आहे. 'गंगुहैबती दीन, पदांबुजीं लीन, कृपेंतील भृत्य । महादेव प्रभाकर ध्यायीं × × × ॥' या तुकांतील ' कृपेंतिल भृत्य' हें विशेषण दुसऱ्या बाजीरावाच्या मेहरबानींतील गगुहैबतीच्या फडांतल्या प्रभाकरादिकांनाच योग्य आहे. त्यावरून हा पोवाडा दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत रचला गेला हें उघड आहे. ' प्रभुच्या पणज्यांनीं ' या शब्दावरून ह्या पोवाड्याचा काळ थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दीतला असावा अशी शंका निघण्याचा संभव असला तरी वस्तुस्थिति तशी नाहीं. सवाई माधवरावाच्या रंगावरील पोवाड्या पूर्वीच्या काळांत रचला गेलेला असा प्रभाकराचा एकही पोवाडा मिळत नाहीं. ' गंगू हैबतीचा फड माधवरावाच्या कारकीर्दीपासून गाजत होता ' व इ. स. १७७० त प्रभाकर बारा महिन्यांच्या आंतीलबाहेरील वयाचें अर्भक नसून ' गोड गळ्याचा ' पंधरा सोळा वर्षांचा तरुण होता ह्या यशवंतरावांच्या विधानास कदाचित् ' श्रीमंत ईश्वरी अंश धन्य तो वंश

परमपुरुषार्थी । बरोबरी तयांची कोण करिल पहातार्थी ॥' या पोवाड्याचा आधार 'प्रभुच्या पणज्यांनीं' या शब्दावरून मिळाला असता. परंतु हा पेशवेवंशावरील पोवाडा 'दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत रचलेला आहे' या यशवंतरावांच्या कबुलीमुळें तो आधारही त्यांना उरला नाहीं.

या पोवाड्यांत सर्व पेशवेवंशाला देवांहून श्रेष्ठता दिली आहे. 'राजाधिराज महाराज, गरीब नवाज, धनी श्रीमंत । भासती सदैव देव आमचे हेच भगवंत । पाषाण धातुच्या मूर्ती धरत्रीवरती, आहेत अनंत । त्या पूज्य, परंतु नाहींत प्रगट जीवंत । तसे नव्हे हे तर देव, कलिमधें भूदेव, ब्राह्मण संत । त्या वंशीं पेशवे झाले सबळ बळिवंत ॥' या पोवाड्यांत प्रधानपद मिळविणारा बाळाजी विश्वनाथ; 'आणिली घरास माषुक मस्तानी । दरवर्षी घालुन धौशास, जावें चालून आघाडीस मस्तानी ॥' असा थोरला बाजीराव; वसईचा मोहरा चिमाजी आपा; 'आणिलें पुण्यांत जपानी नळाचें पाणी । × × × । खुष केले शास्त्रीपंडित, विद्यामंडित, विप्र विद्यार्थी । गेले कीर्त गात ते ब्राह्मण तीर्थोतीर्थी !' असा बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब; 'भलत्याच ठिकाणीं घाली रिपुशीं गांठ ।' असा राघो भरारी; 'भाऊसाहेब योद्धा थोर, अंगामध्यें जोर, पुरा धैर्याचा;' आणि 'विश्वासरावही तो तसाच शौर्याचा' इतक्यांचीं वर्णनें दिलीं आहेत.

'बाजीरावाचे कारकीर्दीत पोवाडा तयार झाला आहे, त्या अर्थी पानपतानंतरच्या हकीकतीचे मूळ चौक पोवाड्यांत असावेत, पण मागाहून ते कोठें गहाळ झाले असावेत अशी **सकारण** शंका येते.' असें या पोवाड्याविषयीं रा. यशवंतराव म्हणतात; परंतु ही शंका अगदीं अनाठायीं दिसते. भाऊसाहेब व विश्वासराव यांच्या वर्णनानें सुरू झालेल्या चौकांतच 'किति कांचीं बसलीं घरेंच, हें तर खरेंच, ईश्वरीकृत्य । शोकार्णवीं नाना पडून, नित्य रडरडून, पावले मृत्य ॥' हें पानपताचें त्रोटक वर्णन दिलें आहे व लगेच 'कवि गंगुहैबती दीन, पदांबुजि लीन, कृपेंतिल भृत्य ॥ महादेव प्रभाकर ध्यायीं, सदा गुण गाई यथासाद्यार्थी । श्रीमंत प्रभूची कीर्त जशी भागीरथी॥' ही शेवटची अटकही आली आहे. 'पावले मृत्य, आणि कृपेंतिल भृत्य' या

यमकांनीं जोडलेल्या चरणाच्या सांधींत पानपतच्या विस्तृत वर्णनास जागाच उरत नाहीं. त्या अर्थी रा. यशवंतरावांच्या लाडक्या कवीनें कोठें तरी पानपताचें वर्णन केल्याशिवाय राहूं नये, ही त्यांच्या मनची इच्छा काय ती या शंकेस आधारभूत दिसते; व शंका अनाठायीं आहे असें वाटतें. पोवाड्याचा धागा कोठेंही तुटलेला दिसत नाहीं.

या पोवाड्यांत देवाहूनही श्रेष्ठ असें ज्या वंशाचें वर्णन केलें त्याचें वैभव अस्तंगत झाल्यावर ' जगदीश्वर कोपला गोष्ट झालि खरीच निरुपाई, म्हणून एकाएकीं बुडाली ब्राह्मणवाच्छाई ॥ ' असा पेशवाईचें संक्षिप्त वृत्त गाण्याचा प्रसंग प्रभाकरावर आला. या पोवाड्याचा पहिला चौक अत्यंत सरस आहे. त्यांत सातारकर छत्रपतीची किंवा कदाचित् आद्य छत्रपति शिवरायाची आठवण प्रभाकराला झाली आहे, याकडे लक्ष वेधल्याखेरीज रहात नाहीं. तो चौक असा:—'सबळ वीरांचें राज्य पुरुष जे क्षणांत हरणारे । आकाश कडकडल्यास जे उचलुन धरणारे । आणिक जागा जिंकुन जे धन भांडारीं भरणारे । रिपुसन्मुख धैर्यानें रणांगणीं जे नर ठरणारे । चोहों सागरिंचें स्नान सन्यासमवेत जे करणारे । पूल बांधून नावांचे जान्हवी निर जे तरणारे । छत्रपतीच्या कामीं शरिर जे खर्चुन मरणारे । उभे कंबर आवळून वायुवत जे फिरणारे । स्वकर्म आचरणारे जे बळी सर्वोठायीं । पहा त्यांचे वंशज हिंडती पृथ्वीवर पायीं । '

' मनुष्यमात्रादिकांचें माहेर होति पेशवाई ॥ ' असा प्रभाकराचा पेशवाईचा अभिमान आहे ! बाळाजी विश्वनाथापासून पेशवाईच्या अखेरीपर्यंत झालेल्या पंधरा पुरुषांची नांवनिशी त्यानें दिली आहे. त्यांत रघुनाथरावाचा दत्तक पुत्र अमृतराव याचा मुलगा विनायकराव बापुजी आणि थोरल्या बाजीरावाचा राघोभरारीहून लहान असा कनिष्ठ पुत्र जनार्दनराव या दोघांखेरीज इतर तेरा पुरुष इतिहासप्रसिद्ध आहेत. चिमाजी आपा, सदाशिवराव, विश्वासराव, अमृतराव, विनायकराव बापूजी, व जनार्दनराव या सहा जणांशिवाय बाकीच्या नऊ जणांना पेशवाईचीं वस्त्रें कांहीं काळ तरी लाभलीं. पोवाडा रचल्या वेळीं 'गत झाले अकरा' बाकी अमृतराव, रावबाजी, चिमाजी,

व विनायकराव हे चौघे हयात होते. त्यांनीं ' दिल्या शत्रुसर्वे टकरा । उपाय हरले ह्याच प्रसंगीं गोष्ट गेलि निकरा । × × × । हरण झालें सर्वस्व राहिला नाहीं बकरा । × × × । अशी अवस्था बहुत जनाच्या मनिं पडल्या फिकरा । हरहर हे भगवान् कशा तरी घरिं रहातिल ठिकरा ॥'

पेशवे आणि पेशवाई यांजवरील प्रभाकराच्या सात पोवाड्यांपैकीं ' रंगाचा पोवाडा,' 'खड्यांच्या लढाईचा पोंवाडा' आणि 'पेशवे वंशाचा' पहिला पोंवाडा यांखेरीज राहिलेले चारही पोवाडे पेशवाईचा अस्त झाल्या-नंतर रचण्यांत आले, असें त्यांतील उल्लेख दाखवितात. या सात पोवाड्यांत प्रभाकराच्या काव्यांतील अंतःस्फूर्ति दिसून येते, तशी त्याच्या इतर सहा उपलब्ध पोवाड्यांत दिसून येत नाही.

---

# इतर पोवाडे

**मत अटकावो कोई हमनसे अबी सबहि मैं छांड निकलकर खडी ।**
**सौख्यसंपदा त्यजून, घेऊन वैताग, जहालें केवळ सडी ॥**

—प्रभाकर

प्रभाकराचा अहिल्याबाईवरील पोवाडा तिच्या मृत्यूनंतर त्यानें रचलेला आहे हें ' सती धन्य धन्य कलियुगीं अहिल्याबाई । गेली कीर्ति करूनियां भूमंडळाचे ठायीं ॥ ' या ध्रुपदावरूनच कळतें. त्यांत तिचा धर्मादाय व धार्मिकपणा यांचें वर्णन आहे.

दुसरे सयाजीराव गायकवाड हे १८१९ इ. मध्यें गादीवर बसले व १८४७ त निवर्तले. सयाजीराव, त्यांचे आप्त व दिवाण वगैरे नोकर यांच्या-वर एक व बडोदेकरांच्या औदार्यावर एक असे दोन पोवाडे प्रभाकरानें रचले. त्यांतील दुसऱ्या पोवाड्याच्या शेवटीं ' प्रभाकर कवी भ्रमर गुंतला पहा कर्जाच्या कमळांत । द्रव्यकृपेचा प्रकाश पडल्या सुटून जाइल स्वकु-ळांत ॥ ' अशी याचना आहे. गंगुहैबतीचा फड या वेळीं तरी मोडलेला नव्हता. 'आहेस ठाउका' ही ओंगळ लावणी प्रभाकरानें रचली तेव्हांही तो

फड मोडला नव्हता. परंतु प्रभाकराला निदान बाजीरावाच्या राज्यभ्रष्टतेनंतर द्रव्याची ओढ होती हें या पोवाड्यांत त्यानेंच स्पष्ट म्हटलें आहे.

मराठी साम्राज्यांतून फुटून इंग्रजांच्या कच्छपीं लागणाऱ्या मराठे सरदारांत बराच वरचा मान बडोद्यास मिळेल. परंतु होळकर दंग्यानंतर पडलेल्या दुष्काळांत 'दीड शेराचा दुष्काळ पडला कहर वाटला दुनियेला।' त्या वेळीं 'बडोद्यांत पोंचला तो जगला, न पोंचल्या वाटेस मेला ॥' अशी गोरगरीबांची स्थिति झाली होती. ह्या दुष्काळाचा प्रभाकरानें इतकाच काय तो उल्लेख केला आहे. दुष्काळांत जसा बडोद्यानें मराठी प्रजेला हात दिला, तसाच पेशवाईनंतरही विद्वान् ब्राह्मण, गवई, पहिलवान यांना आश्रय दिला. 'नायकिणी, कसबिणी शाहिर नेहमीं बडोद्यामधि ठरले। पावे पगाराशिवाय बक्षिस, कसबी लोक यानें तरले।' 'येवढेंच विश्रांतिला राहिलें स्थळ पश्चिमच्या राहाळांत।' असें प्रभाकर गातो. परंतु हे पोवाडे केवळ अन्नाच्या ओशाळगतीचे आहेत. आपलें राज्य, आपली रियासत ह्या आपुलकीच्या भावनेची स्फूर्ति त्यांत नाहीं.

कुलाब्याचे राघोजीराव आंग्रे सरखेल व त्यांचा परिवार यांजवरील पोवाडा देखील 'श्रीमंत गेल्यापासुन मिळेना अन्न कोठें बाहेर। म्हणुन झड घालितात लाहेर।' अशा कारणानेंच उद्भवला. 'राज्य असुन तर लहान मुल्खोमुलुखीं कीर्त गाजती।' ही स्तुति आश्रय मागण्यास आलेल्या याचकानें केलेली आहे.

'चोहों वर्णांतुन कोण मुशाफर वर्ण मला सांगा। तुम्हांला वर देतें जागा॥' या लावणीवजा पोवाड्यांत हिंदुस्थानांतील राजे, सरदार व सावकार यांच्या घराण्यांची नामावळ प्रभाकरानें दिली आहे. चित्रशाळा प्रतीच्या संपादकांनीं पोवाड्याच्या आरंभीं दिलेल्या चुकीच्या माहितीचा अनुवाद करून "प्रभाकराचा हिंदुस्थानवर्णनाचा एक पोवाडा आहे, त्यांत 'ब्राह्मण क्षत्रिय आदि वर्णांत शिवछत्रपतीपासून पेशवाईअखेरपर्यंतचे कालांत कोणकोणतीं घराणीं व पुरुष उदयास आले त्यांचें संकलित वर्णन आहे. या वर्णनाची व्याप्ति उत्तरेस नेपाळपासून दक्षिणेस चिनापट्टण म्हणजे

मद्रासपर्यंत आहे, ही विशेष गोष्ट होय." अशी रा. यशवंतराव केळकरही माहिती देतात. ती चुकीची आहे. 'धनी छत्रपती तख्त सातारा हो।' ही पोवाड्याच्या अखेरीअखेरीस आलेली एक ओळ काय ती शिवछत्रपतीपासूनच्या' सर्व मराठे राजांच्या वर्णनाची! 'शिंद्यांत पुरुष एक एक निवडतो तारा हो।' हेंच कायतें शिंदेशाहींतील पुरुषांचें अवघें वर्णन! यांच्या उलट 'वंश हजारों हजार ज्यांचे सुरतपाक बेटे। चपळ जसे वाघिणीचे पेटे। **नगरशेट मसुदाबादेचे** वतनदार शेटे, घालिती पैकेकरी खेटे। सधन गुमास्ते पदरीं बांधिति मंदिल फेटे, गळ्यामधिं लिंग गोफ गेटे॥ **आग्र्याचे केशवलाल** द्रव्य आजकाल तयांचे सदनीं। आल्या याचकास सत्कार पाट बस्कर मिठाक्षर वदनीं। परनारी सहोदर, सदय प्रफुल्लित हृदय, विषयसुख सदनीं॥' त्याचप्रमाणें '**उज्जनचे गोकुळदास**' '**बेदरचे मलापा** मुलुख फिरस्ते वाणी' वगैरे यःकश्चित् सावकारांचीं वर्णनें या पोवाड्यांत भरपूर केलीं आहेत. 'क्षत्रिय मंडळींत घराणें प्रमुख उदेपुरचें।' हें तर शिवाजीच्या पूर्वींच होतें. 'संपत्तीवान कनकाप्पा चिनापट्टणचे राव जी' हे एक सावकारच होते. 'नेपाळचे रणजितसिंग' यांचें फक्त नांव आलें आहे. 'घराणीं व ुरुष उदयास आले' याचा अर्थ राजघराणीं किंवा सावकार घराणीं, राजे, सरदार आणि सावकार या सर्वांना सरसकट घ्यावयाचा असेल तर मात्र रा. यशवंतरावांचें किंवा मूळ संपादकाचें विधान अगदींच चुकीचें नाहीं असें कांहींसें समर्थन करतां येईल. परंतु अशा विधानानें वाचकांची फसवणूक होते. या पोवाड्याच्या पहिल्या चौकाच्या आरंभीं मात्र प्रभाकराच्या काव्याची चुणूक थोडीशी दिसते. 'विप्रवंश संपूर्ण दरिद्रें आजवर नाचवले, ब्रह्मकर्माला आंचवले। संकटीं पडतां पक्षी खगेंद्रें जसे काय वांचवले, सकळ सतेजें नाचवले। श्रीमंतांनीं तसे थोर पदाला ब्राह्मण पोंचवले। तयांकरीं शत्रू वेचवले॥' हा पेशवाईच्या आठवणीचा अभिमान हृदयांत नाचत असतां गंगू हैबतीच्या फडाबरोबर उत्तर हिंदुस्थानात दारोदार गाऊन पोट भरण्याची पाळी आली, तेव्हां कोठल्या तरी तिकडील सावकारापुढें किंवा महाजनसमाजापुढें ही पोवाडेवजा लावणी रचून

गायिली असावी. हा पोवाडा सबंध दिला आहे. यांतील कित्येक नांवांचा आज मागमूस नाहीं. कित्येक केवळ ऐकींव माहितीचीं व चुकीचीं आहेत. यापेक्षां 'नाना शंकरशेट'जींवरील पोवाडयांतील जो एकच चौक दिला आहे त्यांतील 'भलत्याचें पडेना तेज फिटेना भ्रांती। यासाठीं लोक भर दिवसास हिसके खाती ॥' ही माहिती जास्त महत्त्वाची वाटते. 'भाग्यवान भोळे महाराज। कुटुंबसंरक्षणाचें जहाज। डामडौल नाहीं कांहीं मिजाज। दीनदुबळयाचे गरीब नवाज। शरण आल्याची राखुनि लाज। अगोदर करावें त्याचें काज। मोठयामोठयांचा जिरवून माज। हारीस आणिले शेट बजाज।' ही माहिती इतर चरित्र ग्रंथांशीं ताडून पाहातां येण्यासारखी आहे. 'जेव्हां टिपूवर इंग्रज गेले। तेव्हां शेट सर्वे नव्हते नेले। परंतु भणें येथुन केले।' ही माहितीही नवीनच आहे. या पोवाडयाचें धृपद "दैववान् नाना शंकरशेट विजाति। केली केवढी उभय वंशांत ख्याति॥" असें आहे. त्यांतील 'विजाति' याचा अर्थ लागत नाहीं. तेथें 'द्विजाती' असा शब्द मुळांत असण्याचा संभव आहे. 'दैवज्ञ ब्राह्मण' या नांवाचा नाना शंकरशेटजींपासून परवांच्या सुधारणांच्या कायद्यापर्यंत अभिमान किती होता व हल्लीं विशिष्ट कारणांमुळें तो कांहींसा दबला गेला असला, तरी आहेच. त्या अर्थी प्रभाकरासारख्या याचकानें 'द्विजाती' असा शब्द ठळक वापरून खुष करण्याचा प्रयत्न करणें साहजिक आहे. नानांचा परिवार, त्यांचें बंगले, तेथील करमणुकीचे प्रकार याविषयींचे सहा चौक संपादकांनीं गाळले; मुंबईतील कांहीं शोकी मंडळी, साष्टी कलेक्टर हपीसांतील मंडळी, अव्वल इंग्रजींतील प्रिंगल साहेबांचें मोजणी हपीस, बाबाजी बिवलकर अलिबागकर, विकाजी व पेस्तनजी शेट वगैरेंवरील दहाबारा पोवाडे मुद्दाम दिले नाहींत. अव्वल इंग्रजींतील हपीसर व त्या वेळचे प्रकार यांची माहिती या पोवाडयांत असली पाहिजे. 'पेशवे, शिंदे, होळकर, गायकवाड इत्यादिकांचीं वर्णनें ज्याच्या रसवंतीनें गायिलीं, त्याला मुंबईकडल्या पारशांची, सोनारांचीं वगैरे वर्णनें करीत सुटण्याची पाळी यावी,' याचा चित्रशाळाप्रतीचे संपादक, रा. भावे आणि रा. यशवंतराव केळकर या सर्वांना मोठा विषाद वाटतो

आणि हें असें कां व्हावें, याचें आश्चर्यही वाटतें. जगाच्या रहाटीकडे पाहातां ही कांहीं अद्वितीय गोष्ट नव्हे! ‘ वाग्देवीच्या गळ्याला दोरा बांधून तिला दरवेशाचे आस्वलीप्रमाणें दारोदार नाचविण्याची पाळी ’ प्रभाकरावर आली याचा कोणालाही खेदच वाटेल. परंतु त्या खेदाच्या भरांत क्षुद्र भावनांना वश होऊन महाराष्ट्राच्या जीवनावर प्रकाश पाडणारें काव्य गुलदस्तांत ठेवावें आणि हिंदुस्थानवर्णनासारख्या केवळ नीरस नामावळीच्या पोवाड्यांची अवास्तव स्तुति करावी हें योग्य नाहीं. ओढेकर, नायगांवकर, पुरंधरे, पारोळकर, रणनवरे, नवरे, थोरात, खरड, खैरात, फडतरे, कवडे, आपतुळे, पिसाळ यांच्या नांवांच्या याद्यांपेक्षां, नानाशंकर शेटजींचा परिवार व रहाणी, आणि अव्वल इंग्रजींतील ‘ पारशा–सोनारांचीं ’ वर्णनें यांचें महाराष्ट्राला जास्त महत्त्व आहे. या विचारसरणींतील तत्त्व आमच्याकडील संशोधकांच्या मनास पटेल तो सुदिन !

## पौराणिक लावण्या

कंठ तुझा मंजूळ सुसंगित फिरक स्वरामधें स्वर फिरती ।
क्षणोक्षणीं मेनका विलोकुन अमरपुरीं तारिफ करती ॥

—प्रभाकर

पोवाड्यांत प्रभाकराच्या काव्यस्फूर्तीचा प्रकाश पडतो तसा त्याच्या लावण्यांत पडत नाहीं. बाह्य वर्णन व किरकोळ तपशील यांचें वर्णन प्रभाकर फार बारकाईनें करतो; परंतु हृदयाच्या सूक्ष्म भावना, मनाचे तरंग, अंतःकरणाच्या वृत्ति यांचा ठाव त्याला घेतां येत नाहीं. लौकिक विषयांवरील लावण्यांपेक्षां देवादिकांवरील आणि पौराणिक कथांवरील त्याच्या लावण्या जास्त शुद्ध व सरस वाटतात.

‘ लक्ष्मी गर्वे निंदा बोलुनि झिडकारिति पार्वती । आहे ठाउक पुरुषार्थ तुझा तुज प्रिय असो पशुपती ॥’ ही त्याची लक्ष्मी-पार्वतींनीं भांडखोर शेजारणींप्रमाणें एकमेकींच्या नवऱ्यांच्या उखाळ्यापाखाळ्या काढल्याची लावणी

फार प्रसिद्ध आहे. आजकाल कृष्णाला चोर म्हटलें, किंवा सीतात्याग करणाऱ्या रामाच्या न्यायबुद्धीला दोष दिला, कीं आमच्या कित्येक धर्ममार्तंडांचा जीव कासावीस होतो. त्यांना जिकडे तिकडे पाखंड व धर्मनाश दिसूं लागतो. परंतु संस्कृत कवींनीं देखील देवादिकांच्या चरित्रावर यथेच्छ विनोद केला आहे, याचा त्यांना विसर पडतो! देवाविषयीं हिंदूंच्या ज्या कल्पना आहेत त्यांत देवाला बरोबरीच्या नात्यानें वागवून त्याचा विनोद करण्यास देखील हरकत नाहीं अशी एक कल्पना आहे. तिचा फायदा प्रभाकरानें या लावणींत भरपूर घेतला आहे. शंकराचें विचित्र ध्यान वर्णून 'लक्ष जन्मींचें पातक म्हणउन पडलिस ऐशा हातीं!' असें पार्वतीला लक्ष्मी टोंचून बोलते, तेव्हां नवऱ्याचा कड घेऊन 'भोळा माझा सांब लक्षुमी उगाच निंदूं नका।' असें मोठ्या कळवळ्यानें म्हणून तिला 'कशा भाळल्यात गोरक्षका?' 'तुला सवती आहेत!' 'तुझा बाप चोराचा सासरा!' असें उलट टोले देऊन 'जन्म गेला पहा अशाखालीं, म्हणे लक्ष्मीला पार्वती।' 'शंकर भणंग भिकारी, जिवंत पहातां भुत!' असें लक्ष्मीनें म्हणतांच 'तूं चंचळ, नाहींस सुधी! शंख सहोदर तुझा' असें म्हणून तिच्या भावाचें दारिद्र्य, पार्वती लक्ष्मीच्या तोंडावर फेंकते. शेवटीं 'घरोघर मातीच्या चुली' हें तत्त्व पटून आपापल्या घरच्या व्यंगाकडे डोळेझांक करून, 'एकस्वरूप शिव-विष्णु लक्ष्मी–गौरी एक स्मरा' असा वादाचा निकाल लागतो. देवादिकांच्या बायका देखील आपल्यासारख्याच आहेत, असें पटविणारी ही लावणी आमच्या प्रपंचमग्न स्त्रीसमाजास प्रिय व्हावी हें साहजिक आहे.

शंकर-पार्वती संवादा'च्या लावणींत पार्वती शंकराला 'भस्मभूषणा, मदनशोषणा, पशुपति गंगाधरा! ध्यान कुणाचें करितां सांगा त्रिपुरांतक सुंदरा!' असें विचारतांना, 'नका चोरूं; मज खरेंच सांगा! हें काय डमरूधरा!' असा इषारा देते. प्रश्न अडचणीचा असला तर कांहीं तरी थाप देऊन सोडवणूक करून घेण्याची लौकिक नवऱ्यांची धूर्तता पार्वतीच्या परिचयाची होती असें खुबीनें दाखविण्याबद्दल प्रभाकराची तारीफ करावी असें मनांत येतें. परंतु 'रामसखा हृदयस्थ ध्यातसें!' असें शंकरानें सांगितल्यावर 'तुम्ही

अनाद्यनंत तसा रघुवीर नव्हे! सीते सीते म्हणून वनांतरीं भटकत झाडांना कवटाळतो; असा तो राम स्त्रीलंपट आहे!' असें पार्वती म्हणते; तेव्हां 'तुझें तुला मुळीं विदित असुन कां ठेवितेस दूषणें?' 'ब्रह्मांडाचा स्तंभ नेणसी कसा तूं महाकालिके?' अशीं पार्वतीचें दैवी, सर्वज्ञ स्वरूप दाखविणारीं वचनें शंकराच्या तोंडीं घालून प्रभाकर सर्वच विचका करतो! पार्वतीला शंकरानें 'आदिकुमारी' असें संबोधावें हें योग्य दिसत नाहीं. 'सुहास्यवदने सुरूपसखे हे रक्तबीज शोषणे! स्वपदिं सुरेश्वर स्वस्थ तुझ्यामुळें त्रिभुवनिं यशघोषणे!' अशी शंकरानें पार्वतीची मध्येंच स्तुति केली आहे, त्याला कांहीं कारण दिसत नाहीं. लाडक्या बायकोला केव्हांही गौरवाच्या विशेषणांनीं गौरविणें अनाठायीं नसलें तरी लावणींतील संदर्भात या गौरवाचें कांहीं कारण नाहीं. वेळींअवेळीं उगाच गौरविल्यानें बायको चढेल होण्याचा संभव असतो. परंतु अनुभवानेंही शहाणें न होणाऱ्या भोळ्या सांबाची संवय, दाक्षायणी सतीच्या दक्ष-प्रकरणांत कटु अनुभव आल्यावर, गौरीशीं संसार करूनही, सुटली नव्हती असें दाखविण्याचा प्रभाकराचा उद्देश असेल तर न कळे! शंकराला शेवटीं अनुभव मात्र तसाच येतो. फाजील लाडानें शेंफारलेली पार्वती, 'रामलक्ष्मण हे विष्णु आणि शेष यांचे अवतार नाहींतच!' असा हट्ट घेऊन बसते व म्हणते, 'क्षीरसागरिंच्या मूर्ति नव्हत ह्या, अहो भस्मोद्धारणा! जरि असते महाविष्णु शेष, कंदर्प दर्पहरणा! तरी न नेता जानकीस रावण जगदुद्धरणा! × × ×! पशुपते भोळ्या शंकरा! नका प्रपादूं व्यर्थ मला; निज मुक्तीच्या माहेरा!' तरीही तामसी गणलेला बिजवर महादेव तिची समजूत घालीत राहातोच!

गणपति, विष्णु, शंकर, सूर्य, आणि पार्वती या पांच देवतांची पंचायतन प्रार्थनेची 'हे गणेश, हे माधवा, हे गौरीधवा, लोकबांधवा मित्र तमारी, उदयोस्तु अंबे जगदंबे आदिकुमारी॥' ही लावणी सुंदर आहे. धृपदांत वरीलप्रमाणें पंचायतनाला वंदन करून पुढें एकेका कडव्यांत प्रत्येक देवतेचें स्वतंत्र स्तवन केलें आहे. सूर्यस्तवनांतील 'उदास समयीं हैवानां पाव तूं!' या चरणांत 'हैवान' या शब्दाचा 'हैराण झालेला' हा अर्थ ध्यानांत ठव-

ण्यासारखा आहे. अंबेच्या वर्णनांत 'अन्नपूर्णा भवानी' अशा तिच्या स्वरूपाचें ' शशि सूर्य तुझ्या बळभयें उगवती। हे धन्य धन्य अन्नपूर्ण भगवती। ' असें वर्णन आहे; तें पंचायतनांतील अंबेस योग्य आहे.

प्रभाकरानें कित्येक पौराणिक कथानकांवर लावण्या रचिल्या आहेत. त्यांत देखील बारीक तपशील व बाह्य वर्णन हीं जितकीं चांगलीं साधलीं आहेत तितका मनोभावनांचा उठाव प्रभाकराला साधलेला नाहीं.

कांचनमृगाच्या मागें गेलेल्या रामासारखा आर्तस्वर कानीं पडल्यावर शोकाकुल झालेल्या सीतेला ' परोपरी शांतवन करी, धरी पोटासी लक्ष्मण आकांतीं ।' हें वर्णन ' नूपुरे एव जानामि नित्यं पादाभिवंदनात् ।' अशी ख्याति असलेल्या लक्ष्मणास जसें शोभत नाहीं, तसेंच सीतेच्या निर्भर्त्सनेनें लक्ष्मण कितीही संतापला तरी त्यानें ' पडशिल पहा चांडाळणी बंदिखान्यांत जाउन लंकाभुवनीं ।' असा शाप आपल्या भावजयीला देणें संभवनीय नाहीं.

प्रभाकराचें सावित्रीगीत साधारणच आहे. सावित्रीच्या कथेंतील अनेक हृदयभेदी प्रसंगांची प्रभाकरानें अगदीं कशीबशी बोळवण केलेली आहे. डोक्यावर झाडाची फांदी पडून सत्यवान् गतप्राण झाला त्याचें वर्णन ' लागतां काष्ठ भाळीं जीव तेंव्हांच घाबरला । टाकिलें शरीर धरणी, पाहिला पंथ दुरला । मातुश्री पिता कांता या तिघांस अंतरला । घेऊनी शीर अंकीं सतीनें सांवरला । थापटी हृदय अबला, जीव फारच गहिंवरला ।' इतकेंच केलें आहे. यांतील सावित्री हृदय ' थापटी ' आणि जीव 'गहिंवरला 'ही शब्दयोजना अगदीं चुकीची आहे. पतीचें प्राणसंकट पाहून सतीचा जीव ' गहिंवरला ' किंवा ती हृदय ' थापटूं ' लागली या शब्दयोजनेंत गहिंवरणें व थापटणें हे दोन्ही शब्द तेथें उचित असलेला अर्थ देण्यास अगदीं असमर्थ आहेत.

प्रभाकराच्या हरिश्चंद्र-कथेंत मुळापेक्षां कित्येक फेरफार प्रभाकरानें केले आहेत. त्यामुळें कथेचें स्वारस्य वाढलेलें तर नाहींच, पण कित्येक ठिकाणीं अप्रयोजकपणा मात्र झाला आहे. विश्वामित्र आणि वसिष्ठ यांनीं इंद्रसभेंत हरिश्चंद्राच्या सत्वाविषयीं प्रतिज्ञा केल्या. त्यानंतर विश्वामित्रानें देवीला प्रसन्न

करण्यासाठीं शाक्तांना बोलावून स्वत: प्रेतासनावर बसून यज्ञ केला. त्यानें देवी प्रसन्न झाली व हरिश्चंद्राच्या राज्याजवळील अरण्यांत तिनें क्रूर श्वापदें उत्पन्न केलीं. त्यांची शिकार करण्यास हरिश्चंद्र स्त्रीसह गेला. तेथें कौशिक मुनीनें जाऊन ' राजा हे कांचनमृग दे धरून ' अशी आज्ञा केली. राजा बाण सोडूं लागला तेव्हां मृग ऋषीच्या आश्रमांत शिरून बसले. कांचनमृग धरण्याचें काम सोडून राजा वनशोभापाहूं लागला. अर्थात् निरनिराळ्या झाडांचीं नांवें आलींच ! ज्या श्वापदांमुळें ' स्वदेश सारे उजाड पडले ' होते तींच ' पशुपक्षी **निर्वैर मनांनीं** । स्वेच्छ फिरती घोर काननीं ।' असा चमत्कार होतो. आणि मग ' स्नान करी नृप तडागजीवनीं । नंदीसहित शिव पुजून भवानी । नरेंद्र कांता प्रसन्न वदनीं । प्रधानसुद्धां स्वस्थ बैसले । ' अशा स्थितींत विश्वामित्र दोघां वेश्यांना गाण्यानाचण्यास पाठवितो. घोर काननांत या वेश्या कोठून आल्या याची हरिश्चंद्राला शंकाच येत नाहीं. ' हरिश्चंद्र लुब्धला गायनीं । बक्षीस कंकण दिल्हें काढुनी । न घेति वेश्या देति टाकुनी ।' आणि राणीच्या देखत राजाला सांगतात 'आहे अंगसंगाची अपेक्षा ।' अर्थात् राजा रागावतो व 'प्रधानास सांगुनी घालवी त्या मारुन दुर्मती ।'

सत्यवान मेला तेव्हां सावित्री हृदय ' थापटीत ' होती; पण या वेश्या मात्र हृदय ' पिटीत ' कौशिकाच्या आश्रमांत जातात. ' विटंबिलें कोणी तुम्हांस त्याचा प्रास करिन जाउनी ।' अशा आवेशानें विश्वामित्र राजाकडे येतो, राजाला दम देतो; परंतु शेवटीं त्याच्या विनवण्यांनीं शांत होऊन परत जातो.मृगया केल्यावर देखील पूजा करून नृत्यगायनाचा आस्वाद घेण्याइतकी तरतरी असलेला ' राजेंद्र शशांक ' मुनीचें स्तवन करून थकून जातो; 'म्हणउन करी पुढें कांता अंक । उसें ठेऊन वर नि:शंक । रत्नदेउळीं निजून राहिले । ' स्वस्त्रीच्या अंकावर उसें ठेवण्यांत राजाच्या 'नि:शंकपणा'ची जितकी तारीफ करावयाची तितकीच अरण्यांत एकाएकीं रत्नदेऊळ उत्पन्न होण्याच्या चमत्काराची केली पाहिजे ! विश्वामित्राच्या शाक्तयज्ञापासून या रत्नदेवळांत राजा निजण्यापर्यंतचा भाग प्रभाकराचा स्वरचित आहे. इतका सर्व खटाटोप करून हरिश्चंद्राला जी झोंप प्रभाकरानें आणून दिली त्या

झोपेंतच ब्राह्मणांस राज्यदान केल्याचें स्वप्न पडून पुढें सर्व कथाभाग मूळ हरिश्चंद्राख्यानासारखाच झालेला आहे.

कालियामर्दनाच्या लावणींत प्रभाकरानें 'घरस्थळें' हा प्राकृत संस्कृत समास रामजोशाच्या 'मजावृष्टि' सारखा बनविला आहे. त्याखेरीज लावणींत विशेष असें कांहीं नाहीं.

सुदामचरित्रांतील वर्णनें चांगलीं आहेत. 'घोटींव तेथें नीळ शुद्ध पाचूचीं जोतीं। सरूदार हिऱ्याचे खांब झळाळित ज्योति। लालांचिं उथाळीं चौफेर माणिक मोतीं।' हें द्वारकेच्या राजवाड्याच्या चौकाचें वर्णन अरेबियन नाइट मधील कल्पनाशक्तीच्या तोंडांत मारणारें आहे. द्वारकेच्या कोटावर 'काळापरि तोफांचीं वक्त्रें।' हा काळविपर्यास आहेच! रसिकतेला बाध आणणारा भडकपणा जरी प्रभाकराच्या वर्णनांत आढळला तरी बारीक तपशील वर्णन करण्याची वेळ आली असतां मात्र त्याच्या बुद्धीचा कुशाग्रपणा दिसून येतो सुदामजीच्या तीन मुठी पोह्यांतून पहिला घांस घेत असतां कृष्णाचा हात रुक्मिणीनें 'बळकट धरिला;' आणि आपण एकंदर सोळा हजार बायका आहों, हें लक्षांत घेऊन बरोबर हिशेब करून 'एक एक कण या गोप सजणातें।' अशी विभागणी सांगितली. त्याचप्रमाणें 'काशीक्षेत्रवर्णन' करितांना, तेथील निरनिराळ्या महादेवांची 'कुठवर सांगूं नामावळी? एकेक मुठ टाकितां गोणि अगदींच होईल मोकळी!' हें प्रमाण सांगून काशीक्षेत्रांत महादेवाचीं स्थानें किती आहेत याची यथार्थ कल्पना प्रभाकर देतो.

दुर्वासभोजनप्रसंगाच्या लावणीत अपरात्रीं आलेल्या ऋषींनीं भोजन मागितलें असतां त्यांना स्नानास पाठवून द्रौपदी कृष्णाचा धांवा करते. त्यांतही मुळांत फरक करून 'पंडुकुमार सर्वही। घाबरले प्रतापी अर्जुन भले झुंजार सर्वही। दीनवदन पाहती मजकडे ते वारंवार सर्वही।' असें वर्णन केलें आहे. द्रौपदीच्या धांव्यांत दशावतारांचें वर्णन करून 'हे बौद्धयरूपा। हे कलंकी!' अशा नांवांनी कृष्णाला कृष्णावतारांत हांक मारली आहे. या लावणीच्या पहिल्या चौकांत 'सर्वही' या शब्दानें कित्येक चरणांचें यमक साधलें आहे. दुसऱ्यांत 'श्रीहरी', तिसऱ्यांत 'श्रीपती' व चौथ्यांत 'त्यावरी'

अशा शब्दांचीं यमकें बारा बारा चरणांच्या शेवटास घातलीं आहेत, तो एक काव्यदोषच आहे. तेथें ' श्रीहरी ' व ' श्रीपती ' अशी पुनः पुनः आक्रांतानें हांक मारली म्हणूनच " लोटून ताट धांवले सुदर्शनपाणी । सप्रेमें आलिंगुन बोले ' आलों अनवाणी ' " असें समर्थन करितां येईल. परंतु ' क्षोभले फार सर्वही । × × शिकवुन कपट अविचार सर्वही । × × शिष्यपरिवार सर्वही । × × दिशा धुंदार सर्वही । ' वगैरे 'सर्वही'चें यमक किंवा 'त्यावरी' हें यमक समर्थन करण्यासारखें नाहीं.

' मुरली ' वर प्रभाकराच्या तीन लावण्या आहेत. त्यांपैकीं ' वेडें करी विचरतां घरीं, हरी तुझी मुरली । ' ही साधारणच आहे. मुरलीनें वेडें केल्या-मुळें नाकांतली नथ काढून तेथें कर्णफूल घालणें, भाळीं अंजन लावून डोळ्यांत कुंकू घालणें या चेष्टांप्रमाणें दंडांतली वांकी गळ्यांत कशी घालतां येईल हा प्रश्नच आहे !

दुसरी ' मुरली बजावत री रिझजा । ' ही हिंदी लावणी त्याहून सरस आहे. ' भूल गये सुर किन्नर बांके । बैठे ऋसेश्वर इंदर आके । ' हा मुरलीचा परिणाम होऊन पुढें ' रोने लगे सब मुरली सुनके । ' हें वर्णन पटण्यास त्यांचें रडणें आनंदाचें होतें असें समजून घेतलें पाहिजे.

' मुरलिनें ग मन अवघ्यांचें मोहिलें सखये बाई । ' ही मुरलीवरील तिसरी लावणी मात्र फार बहारीची आहे. 'तृण त्यागुन सर्वही धेनू वत्साविण घालिती पान्हा । स्तन आदरें वदनीं देतां पयप्राशन करिना तान्हा ॥ ' हा मुर-लीच्या परिणामाचा विरोधाभास तर आहेच; त्याहीपेक्षां ' तल्लीन किती होवुन रत्नीं गर्भिणी पुत्र प्रसवीती । अध्ययना विप्र विसरले । काननीं समुदाय पसरले॰। घन मौन्य धरुन अनुसरले । ' असा मुरलीचा मोह आहे. 'धरणीधर असतां खालीं, करि डळमळ अवघी अवनी । जिवजंतू उसळ्या घेती, खळ-बळाट होतो जिवनीं । ' तर याच्या उलट ' रथ पळपळ तिष्ठत राहे गगन-मंडळीं प्रखरकराचा । गति कुंठित, मार्ग न चाले अंजनिच्या आज वराचा।

मति मोहून बसला खालीं ऐरावत वज्रधराचा । ' अशी जिची जादू ती 'ध्या हिसकुन कोणी मुरली । त्रिभुवनांत कशि संचरली । नाहीं निर्वात जागा उरली । अशि भरली सर्वा ठायीं । ' तिच्या योगानें ' निर्वैर धरित्री झाली, चाटितात व्याघ्र करींना । भेटतात सन्मुख अंगें शार्दुल आणि शरभ हरींना । निर्जिवांस सये जिव आले, भ्रव सुटले महान गिरींना ॥ नव पल्लव तरुंना फुटती । गरगर्जुन मधुकर उडती । अंतरिक्षिं तारे तुटती । अंबरांत नाद न मायी ॥ '

परंतु अशा सुरस वर्णनांतही ' गिरीकंदरिं मुनिजन करती, किति साधन थोर तपांचें । तळिं डगमग आसनें हालती जंव चाले मंत्र जपाचे । ' या मुरलीच्या जादूशीं अर्थाअर्थी कांहीं संबंध नसलेल्या ' शोधिती मुळ अंतर्यामीं शुकसनकादिक पुरुषाचे । परि अगम्य हा व्यभिचारी । शोधिली पुतना ग बिचारी । गवळ्यांचा पूर्ण आचारी । सर्वां घटीं भरला राही ॥ ' ' गवळ्यांचा पूर्ण आचारी, ' यांतील आचारी म्हणजे आचार करणारा—गवळ्यांप्रमाणें वागणारा हा अर्थ लक्षांत घेण्यासारखा आहे. गवळी व दह्यांदुधाचे घडे यांच्या निकटपणानें ' सर्वां घटीं भरला राही ' यांत ' घट ' शब्द श्लेषयुक्त होतो. तथापि अशा गोष्टी निष्कारण जोडून मध्येंच रसभंग केला आहे. त्याचप्रमाणें शेवटच्या कडव्यांतील ' जगदीश्वर अंतरसाक्षी हा हरि वैकुंठविलासी । मदनांतक प्राणसख्यांनीं तो नवनीतपय अभिलाषी । कर जोडुन सौंगडे म्हणती, अरे कृष्णा बहु श्रमलासी ॥ ' या चरणांचीही तशीच गत आहे. मुरलीच्या मोहिनीशीं या वर्णनांचा संबंध पोंचत नाहीं. ' मदनांतक ' हें विशेषण ' मदनतात ' कृष्णाला अगदींच अयोग्य आहे. ' मदनाला शमविणारा ' असा त्याचा अर्थ घेतला तरी ' नवनीतपय अभिलाषी ' या वर्णनाचें तेथें साहचर्य मुळींच शोभणार नाहीं. जेथें काव्यरसाचा अत्यंत उत्कर्ष झाला पाहिजे. तेथें असा गडबडगुंडा करून प्रभाकरानें सर्व लावणीची दुर्दशा केली आहे !



# देशस्थितीचें वर्णन.

## प्रभाकर आणि परशराम.

जुने कायदे अगदीं मोडले जधींपुन झाली इंग्रेजी ।
कांदा भाजी एक्या मोलें तुपसाकर मैदा मोजी ॥

—परशराम.

पेशवाईचा अस्त झाल्यानंतर प्रभाकर, परशराम आणि सगन हे तिघेही शाहीर सुमारें वीस वर्षें हयात होते. त्यांपैकीं सगन लवकरच सातारकर महाराजांच्या आश्रयास जाऊन राहिला. त्याची बरीच कविता अप्रकाशित आहे किंवा अद्याप उपलब्ध झाली नसावी. इंग्रजी अंमलांतील लोकस्थितीचें वर्णन करणारी त्याची कविता आढळत नाहीं. प्रभाकर मात्र मुंबईत बरेच दिवस राहिला. मुंबईतील शेठसावकार, हपीसें, कारकून यांजवर त्यानें केलेल्या लावण्या बहुश: वैयक्तिक वर्णनांच्या असाव्या. परशरामाच्या काव्यांत अगदीं अव्वल इंग्रजीच्या स्वरूपाचें जसें वर्णन केलें आहे तसें प्रभाकरानें केलेलें आढळत नाहीं. प्रभाकराच्या मृत्यूनंतर अवघ्या वीस वर्षांत त्याच्या ऐतिहासिक पोवाड्यांकडे विद्वानांचें लक्ष गेलें. परशरामाच्या कवितेचें त्याच्या सांप्रदायिक शिष्यांनीं जतन केलें, तर प्रभाकराची कविता संग्रहित करण्याचे प्रयत्न त्याच्या मृत्यूनंतर लवकरच विद्वानांकडून होऊं लागले. त्यामुळें या दोन शाहिरांच्या काव्यांचा बराच भाग आज उपलब्ध झालेला आढळतो. त्यांत प्रभाकराची दृष्टि केवळ तपशीलवार वर्णनाची, तर परशरामाची नजर जास्त व्यापक व अंतर्मुखही आहे, हा फरक ठळक दिसून येतो. केवळ राजेरजवाड्यांचेंच नव्हे तर शेठसावकारांचेंही वर्णन करण्यांत प्रभाकराची कविता जशी रंगते तशी परशरामाची रंगलेली दिसत नाहीं. गायकवाडांचें वर्णन करितांना 'विश्वकुटुंबी श्रीमंत ते तर तूर्त प्रजेला अंतरले । गायकवाड आहेत म्हणून हे समस्त ब्राह्मण सांवरले ॥' असें गायकवाडांचें व गायकवाडींत मिळणाऱ्या खिचडीचें सुद्धां

वर्णन प्रभाकर करतो, तसा खुल्या दिलानें परशरामाची रसवंती या राजांचें वर्णन करण्यास वहात नाहीं. त्याची स्तुति केवळ मामुली वाटते. खंडेराव महाराजांनीं 'प्रीतिमध्यें ठेविलें इंग्रजाला रोहोकून' हा विशेष परशरामाला जाणवतो तसा प्रभाकराला जाणवत नाहीं. बडोद्यापासून कुलाब्यापर्यंत जी लोकस्थिति दृष्टीस पडली तिचें निरीक्षण करून इंग्रजांचें भावि वैभव आणि स्वजनांचा ऱ्हास यांचें भविष्य प्रभाकराला करतां आलेलें दिसत नाहीं. प्रभाकर दरबारी कवि होता. पेशव्यांच्या वैभवाचा थोडाबहुत लाभ त्याच्याही वांटयास आला होता. ठाणें–मुंबईसारख्या महाराष्ट्रांतील इंग्रज सत्तेच्या केंद्रांत त्यानें कांहीं दिवस काढिले, तथापि खऱ्या कवीची व्यापक व भविष्य पाहाणारी दृष्टि त्याला लाभली नाहीं, असें त्याच्या काव्याची परशरामाच्या कवितेशीं तुलना करतांना अनुमान निघतें. इंग्रजी राज्यांत वर्णाश्रमांचें महत्व कमी होऊं लागलें, लक्ष्मी समुद्रापलीकडे चालली, जुने राजेरजवाडे निष्प्रभ झाले, हिकमतीनें दिल्लीपासून श्रीरंगपट्टणापर्यंत इंग्रजांनी सत्ता पसरविली या गोष्टी प्रभाकराच्या काव्यांत न मिळतां परशरामाच्या कवितेंत दिसतात. आमच्या पैशून्याचें छिद्र पाहून मोठमोठाले किल्ले इंग्रजांनीं ढासळून पाडले व इमारती मोडून त्यांच्या सदरा बनविल्या हें परशरामाला जाणवलें. इंग्रजी राज्याची न्यायरीती विशेष आहे; देहदंड करतांना ते शास्त्राची कदर ठेवीत नाहींत; खून केला कीं फांशी चुकणार नाहीं; ह्याचें वर्णन परशराम करितो. प्रभाकराला तें जाणवलेलें दिसत नाहीं. इंग्रजांनीं कोठें अंमल गाजविला, तर कोठें नुसता शहच दिला, कोठें पैसे घेऊन आश्रय दिला; चोरटे, भूमिये वगैरे लोकांना रुपये मोहरांचा पगार देऊन वश करून घेतलें हें इंग्रजांचें कसब परशराम उघड वर्णितो; प्रभाकराच्या काव्यांत त्याचें दिग्दर्शन नाहीं. मातीचें सोनें करावें, अशी इंग्रजांची करामत यंत्रशक्तीनें आलेली आहे, हें परशरामानें जाणलें; प्रभाकराच्या काव्यांत त्याचा उल्लेख मिळत नाहीं. पेशवे दरबारच्या उलाढालींत पूर्ववय घालविलेल्या प्रभाकराच्या कवितेंत या गोष्टी याव्या अशी सामान्यतः असलेली अपेक्षा चुकते

व उलट केवळ तमाशाचा धंदा करणाऱ्या, वेदांताकडे मनाचा कल असलेल्या, सुईदोऱ्याचा अभिमान बाळगणाऱ्या शिंपी कवीच्या काव्यांत इतका चाणाक्षपणा पाहून सकृद्दर्शनीं आश्चर्य वाटतें. परंतु प्रभाकर अणि परशराम यांच्या सामाजिक परिस्थितीचा थोडासा विचार केल्यास त्याचा कांहींसा उलगडा होतो व इंग्रजी अंमलाच्या सुरवातीस महाराष्ट्र समाजावर त्या अंमलाचा काय परिणाम झाला याची माहिती मिळते. पेशवाई जाऊन इंग्रजी राज्य आल्यानें आमच्या समाजाच्या वरच्या थरांत फारशी उलटापालट झाली नाहीं. स्वराज्य गेल्याचा विषाद पांढरपेशा वर्गास कदाचित् विशेष वाटला असेल; परंतु पेशवाईतील सरदार, जहागिरदार, इनामदार यांच्यावर इंग्रजांनीं प्रत्यक्षपणें हात टाकिला नाहीं. शास्त्री, भिक्षुक, ब्राह्मण यांची एकाएकीं आबाळ झाली नाहीं. कारकुनी पेशांतील माणसांना नव्या अमदानींत बेकार होण्याची पाळी न येतां त्यांचें प्रस्थ थोडेसें वाढलेंच. पेशव्यांचा आश्रय सुटला तरी शेठसावकार, कारकून वगैरे नवे यजमान प्रभाकरासारख्या कवीला मिळत होते. इंग्रजांची विद्या, कला आणि नियमबद्ध राज्यपद्धति यांनीं सुरवातीस दिपविलें असेल, तर तें उच्चवर्णांतील लोकांना ! सरदार, जहागीरदार, शेटसावकार आणि उच्चवर्णीय पांढरपेशे यांच्या अभिमानाला धक्का बसला; परंतु शांतता, शिस्त, आणि स्वास्थ्य यांचा फायदाही त्यांनाच प्रथम मिळूं लागला; सरदारांची सत्ता कमी झाली, परंतु आपसांतील चुरशीनें किंवा पेशवे व त्यांचे कारभारी यांच्या लहरीनें त्यांना त्रास होण्याचा किंवा त्यांच्यावर संकट येण्याचा संभवही नाहींसा झाला. सावकार व व्यापारी निश्चिंत झाले. ज्या पांढरपेशे अधिकाऱ्यांच्या हातीं मुल्की सत्ता होती त्यांची जरूर इंग्रजांनाही असल्यामुळें त्यांचे अधिकार मर्यादित झाले तरी कायम राहिले. परंतु ज्या वर्गाशीं परशुरामाचा निकट संबंध होता ते मराठे लढवय्ये शिपायी बेरोजगार झाले. पावसाळ्यांतील शेतकीचा हंगामी धंदा त्यांच्या कपाळीं कायमचा होऊन बसला. सालोसालीं मुलुखगिऱ्या करून महाराष्ट्राबाहेरील संपत्ति लुटून आणण्याची संधि राहिली

नाहीं. ' एक चपराशी चकती पाहून रयत थरथरी बकरी जशी । ' हा अनुभव त्यांना जाणवला. पाटील, कुळकर्ण्यांची खरी सत्ता बुडाली ' महाराचा त्याहून तोरा । ' हें त्यांना जाणवूं लागलें. इनामें व जहागिरी कायम होत्या, पण सामान्य जनतेला दिसणारें इनामदार–जहागिरदारांचें वैभव कमी झालें. तें परशरामासारख्या सामान्य माणसाला 'चवरी, अबदागिरी टांगुन ठेविल्या, छत्री आपण आपली धरी शिरीं । ' अशा रीतीनें दिसूं लागलें. इंग्रजांपुढें जुने राज्यकर्ते निस्तेज झाल्याची जाणीव जशी समाजांतील खालच्या थरांस प्रथम झाली, तशीच वाढत्या दारिद्र्याची आंच देखील त्यांनाच जाणवली. अशी स्थिति कां व्हावी याचा कांहींसा विचार सामान्य जनता करूं लागली आणि परशरामासारख्या व्यापक दृष्टीच्या कवीनें त्यापासून सामान्य विधानें काढून भावि परिस्थितीचें यथार्थ चित्र रेखाटलें. तपशिलांत गढलेल्या, व्यक्तिपलीकडे न पाहाणाऱ्या, परिस्थितींत फारसा फेर न पडलेल्या आणि याचकवृत्ति अंगीं मुरलेल्या प्रभाकराची नजर त्या मानानें फारच आकुंचित होती. परिस्थितीपेक्षांही परशरामाच्या कल्पनेला बरेंच श्रेय द्यावें लागेल.

---

## चालीरीति.

अनंत कोटि ब्रह्मांडें ज्यामधिं माती हो ।
करिती ज्याच्या पदरजासिं नवस रमा ती हो ।
त्या कविराया निजपदिंची लाविति माती हो ॥

—रामजोशी.

महाराष्ट्रांत रूढ असलेल्या चालीरीती, नवस, शकुन वगैरे समजुती यांविषयीं परशरामाच्या कवितेंत पुष्कळच वर्णनें आढळतात. त्या मानानें इतर पांच शाहिरांच्या काव्यांत अशा विषयांचें प्रामुख्यानें वर्णन असलेल्या

लावण्या कमी आहेत. तथापि कित्येक लावण्यांत याविषयींचे उल्लेख उपमा-दृष्टांतांच्या रूपानें किंवा प्रासंगिकपणें येतात. पतिदर्शनासाठीं उत्सुक झालेली होनाजी बाळाची नायिका म्हणते: ' आज कां गे काग बोलतो घरावरी ? हाचि शकुन साच पती येतसे घरीं ! शुभ चिन्हें आज मला होती चांगलीं ! वळचणीस पाल बरी बोलुं लागली ! प्राणपती भेटतील आस लागली ! बाही स्फुरे, नेत्र लवे, हर्ष अंतरीं ! ' व हे शकुन फलप्रद होऊन ' अकस्मात घरीं आले कांत त्या क्षणीं ' होनाजी मुद्दाम सांगतो कीं, ' होनाजी बाळा कवी देश दक्षणी !'

'रामाचें न्हाण ' या लावणींत रामजोशी, 'ज्या रामाचें पदतीर्थ जगाला शुद्ध करतें त्याला पायावर घालून स्त्रियांनीं न्हाण घातलें, त्याची टाळू मारून भय घालविलें, कानांत कुर्र म्हणून फुंकिलें आणि आपल्या पायांची माती काढून त्याला लाविली,' अशा नवबालकाच्या संस्कारांचें वर्णन करितात.

'कृष्णाची दृष्ट ' काढल्याचे महाराष्ट्रांतील प्रकार प्रभाकरानें वर्णिले आहेत. कृष्ण रडूं लागला, अंगावर पिईना, तेव्हां त्याला दृष्ट लागली असें यशोदेला वाटलें. ' दचकून लेंकरूं ग तिनतिनदां ऊठतें ' या प्रकारानें तिचा संशय दृढ झाला. यासाठीं ती राधेला सांगूं लागली कीं, 'नको नेऊं हरी राधे, दूधभात भरवूं दे । गाई, तुळशी, देवापाशीं आण तान्हा फिरवूं दे । कान-फाट्या हातीं सांजे अंगारे करवूं दे । ' परंतु इतकें करून देखील, ' नवसाचा अजुन बाई मज ठोका येइना ।' हें तिचें गान्हाणें आहेच ! '

' सुदाम चरित्रा'च्या लावणींत ' मृग, मयुर, काग, घट भरुन सवाष्णी ' या शुभ शकुनांची प्रवासांत होणारीं लक्षणें प्रभाकरानें दिलीं आहेत.

' प्रजायै गृहमेधिनाम ' हें आर्य संस्कृतीच्या विवाहाचें ध्येय कालिदासानें वर्णिलें आहे. बालविवाहाची रूढि असलेल्या आमच्या समाजांत बालवधू वयांत येण्याच्या समारंभाचें वर्णन करून ' मोत्यांच्या झालरा, कळस ' असलेल्या मखराचें व सोहळयांचें वर्णन परशरामानें केलें आहे. तसेंच

पुत्रप्राप्तीसाठीं नवस वगैरे उपाय करण्याच्या प्रकारावर प्रभाकर व परशराम या दोघांच्याही लावण्या आहेत. प्रभाकराची नायिका 'कधिं ग होइन लेंकुरवाळी' अशा उत्सुकतेनें म्हणते, "नाहिं घरांत एक लेंकरूं। चोपलें खंत करकरूं। गडे काय कपाळाला करूं।" अपत्यप्राप्तीसाठीं ती नाना उपाय करिते. 'विपुल धन देऊन तपाला पवित्र भट घातले।' बदरिकाश्रमाच्या बर्फीत 'कामनिक श्रम' केले; काशीला मठ आश्रम बसविले; उज्जनीचा महंकाळ, ओंकार ममळेश्वर, वेरूळचा घृष्णेश्वर, सोरटी सोमनाथ, आंवढ्या नागनाथ, परळीचा वैजनाथ यांना नवस केले. भागीरथीची कावड रामेश्वराला पाठविली. म्हसोबा, जोतिबा, सिधोबा, झाले. 'दवा जाणते' धुंडून आणले. झोटिंग, बीर, मुंज्या आणि मारुतीदेखील झाले. शनिवारच्या दिवशीं धोतरा आवंतुन आणला. तरी 'निरमाल्य गमे नाहीं तेज कुण्या मंतरा!' हें पाहून 'न कळे वांझ पती, न कळे वांझ वांचलें मी अगजाळी!' अशा रीतीनें 'प्रभाकर म्हणे नार फार पडली शोकजाळीं!'

परशरामाच्या नायिकेचा देवादिकांपेक्षा तंतरमंतरावर जास्त विश्वास आहे. 'पोट पिकेना म्हणून बांधिले भाराभर गंडे!' 'आधींच वर बिजवर!' त्यांत मुहूर्त वांकडा! तिचे तोडगेही विचित्र! 'लेकाची माय पाहुन गे तिच्या बाजेजवळ गेलें। तिशिं ना कळतां चोरून गे जावळाचे केस आणिले ॥' टाणाटोणा, पंचाक्षरी आहेतच. वेरूळच्या वैनगंगेंत जोडप्यानें स्नान करणें, गंडेदोरे वगैरे झाल्यावर अनेक देवतांची उपासना! 'केंस थोडके देव पूजिले माळावरले धोंडे!' वाळकेश्वर व मुंबादेवी हीं स्थानें परशुरामाला माहित होतीं. शेवटीं सात वर्षांनीं नवस पावला. "दैवाची अशी मी गडे। लेंकरूं घेऊनिया कडे। प्रीतीनें उभी पतीपुढें।" अशा परशरामाच्या नायिकेला 'जन्म जुगी नांवा चढे।' असा हर्ष झाला.

अपत्यप्राप्तीची लालसा तृप्त होण्याचें चिन्ह जें गर्भारपण त्याचीं वर्णनें होनाजी बाळा, प्रभाकर व परशराम या तिघांनींही केलीं आहेत.

पहिल्या दोन महिन्यांत ओकारी सुरू झाल्यापासून मासोमासचें मामुली वर्णन होनाजी बाळा करितो. अशा प्रकारच्या जुन्या काळच्या स्त्रीवर्गास प्रिय असलेल्या वर्णनापलीकडे त्यांत विशेष असें कांहीं नाहीं. सातव्या महिन्यांत हिरवी चिरकंचुकी लेवून सगेसोयऱ्यांकडे जेवावयास जाण्याची चाल त्यानें वर्णिली आहे. प्रसूतिकाळीं स्वतःची वेणी हुंगण्याची चालही त्याच्या कवितेंत नमूद आहे.

परशरामाच्या नायिकेस चौथ्या महिन्यांत नाना प्रकारचीं फळें खाण्याचे डोहाळे झाले असून घरोघर डोहाळ जेवणें होतात. अपत्यजन्मानंतर वाजंत्रीं वाजणें, पतीनें पुत्रमुखदर्शन करणें, शेकशेगडया, व पुढें पाळण्यांत मूल घालणें यांचीं तो वर्णनें करितो.

प्रभाकराच्या या लावणीच्या सुरवातीस अश्लीलतेची झांक आहे. पुढें त्याच्या नायिकेला तपस्वी रणशूर पुत्राचे डोहाळे होतात. सफेत परंतु जरीचें वस्त्र नेसून वनांत व्रतस्थ राहाणें व तसेंच रणांगण जिंकणें अशा परस्परविरोधी डोहाळ्यांचींही लक्षणें आहेत. गरोदर स्त्रीच्या जवळ गाभण्या म्हशी, घोडया देखील असूं नयेत; त्या दूर नेऊन बांधाव्या ही समजूत तो सांगतो. तिच्यावरून दिवसांतून तीनदां भ्रतार लिंबलोण करतो. मूल जन्मतांच त्याला दूधमध पचविणें, गंगेंत न्हाऊन पूर्वजांस गती देणें, पांचवी, बारसें, घरोघर शर्करा वाटणें, वगैरे चाली प्रभाकरानें वर्णिल्या आहेत.

एकुलतें मूल आजारी झाल्यानें आईची कशी त्रेधा उडते, ती कावरीबावरी होऊन नवसधुपारे करते, याचें वर्णन करणारी एकटया परशरामाची लावणी आढळते.



## शृंगारिक कविता.

प्रभाकराचे छंदबंद अक्षर साध्या चाली हो !

प्रेमसुखाची निद्रा सखीला धुन ऐकुन आली हो !

—प्रभाकर.

रामजोशी, होनाजी बाळा किंवा परशराम यांनीं कृष्णाचा शृंगार मोकळेपणानें वर्णिला आहे तसा प्रभाकरानें वर्णिलेला नाहीं. मानवी शृंगाराचें व विशेषतः संभोगशृंगाराचें वर्णन करणाऱ्या रामजोशांच्या फारच थोड्या लावण्या आहेत. शृंगारवर्णनांत जोशीबुवांचा बहुतेक भर कृष्णलीलांवर आहे. देवादिकांच्या लीला वर्णन करतांना सुद्धां कल्पनेला स्वैर संचार देण्याची पद्धत संस्कृत कवींपासून चालत आलेली असल्यामुळें हिंदु संस्कृतीला त्यांत मोठेंसें वैषम्य वाटणार नाहीं. न्या. रानड्यांनीं हा प्रकार अनुचित आहे असें दर्शविल्यावरून निबंधमालाकारांनीं न्यायमूर्तींवर गहजब केला आहे, त्यांत वाजवीपेक्षां जास्त कडकपणा आणि पुष्कळ अतिशयोक्ति असली, तरी तो अगदींच चुकीचा आहे असें म्हणतां येणार नाहीं. देवाशीं सलगी करणें, त्याच्या लीलांचीं वर्णनें करणें वगैरे भाविकपणाचीं लक्षणें आहेत. असा भाविकपणा असतांना फक्त भक्तिभावना जागृत असते; कुत्सित विचारांना मनांत थारा मिळत नाहीं. परंतु ज्या भाविकपणाच्या मुळाशीं भोळेपणा असतो त्याचा फायदा घेऊन मतलबी कार्यसाधु धर्माला गलिच्छ रूप देतात आणि धर्माच्या नांवानें अधर्म व अनीति पसरविण्यास समर्थ होतात, हेंदेखील विसरून चालणार नाहीं. तथापि रामजोशांच्या शृंगारवर्णनांत उत्तानपणाची छटा येते तेथें देखील देवलीलेचें वर्णन असल्यामुळें त्या वर्णनाला सौम्यपणा येतो.

अनंतफंदीच्या उपलब्ध कवितेंत चंद्रावळीची लावणी आणि त्रिस्तनी कन्येची कथा यांबाहेर उत्तान म्हणण्यासारखे उल्लेख चार दोन ठिकाणींच सांपडतील.

रावबाजीच्या दरबारांत मानवी शृंगाराच्या वर्णनाला ऊत आला. त्यांतील होनाजी बाळाच्या कवितेंतील शृंगाराची चर्चा मागें केली आहे. सदभिरुचीचा अतिक्रम होण्यासारखे प्रसंग इतरांच्या मानानें होनाजीच्या कवितेंत फार थोडे आहेत. प्रत्यक्ष बाजीरावाच्या हुकमावरून त्याच्या विलासांचीं वर्णनें केल्याचें ज्या लावण्यांत दिसतें त्या वगळल्यास असा प्रकार होनाजीच्या कवितेंत कमी आहे. त्यांतही शाहीरांच्या लावण्या म्हणजे कथा-कीर्तनें, किंवा बालोपदेशाची कविता नव्हे. तमाशांची पूर्वापार चालत आलेली ख्याति लक्षांत घेतल्यास जातीनें गवळी असलेल्या होनाजीसारख्या पिढीजाद तमासगिरानें शिष्टाचाराचीं व सदभिरुचीचीं बंधनें बरींच पाळलीं आहेत असें म्हणावें लागेल. तथापि कृष्णलीलेच्या लावण्यांत कृष्णाचें विलासवर्णन करितांना त्यानें रामजोशांहूनही संकोच बाळगिला आहे, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. संस्कृत काव्याची छाप रामजोशांइतकी पूर्णतेनें न पडल्याचा हा परिणाम असूं शकेल. ' मुकुंद यमुने थडीथडी । खेळतसे मिळवून गडी ।। ' ही होनाजीची लावणी कृष्ण व त्याचे संवगडी यांचे खेळ वर्णन करणारी आहे. तिच्यावरून विटीदांडू, चेंडू, लगोऱ्या, लपंडाव, कावडी, भोंवरे, हुतुतू, हमामा हे आजदेखील थोडेबहुत प्रचारांत असलेले मुलांचे खेळ होनाजीच्या वेळीं असल्याचें आढळून येतें. त्या लावणींत शृंगार नाहीं व लावणीचा शेवट भक्तिरसपूर्ण आहे.

प्रभाकराची कृष्णलीलेंतील शृंगारवर्णन करणारी ' प्यारी देखने चली कुंजबिहारी । ' ही एकच हिंदी लावणी आढळते. त्यांत देखील शृंगार फार कमी असून मुरलीची मोहिनी, व रंगाचा खेळ यांचें वर्णन आहे. मानवी शृंगाराच्या वर्णनांत मात्र प्रभाकरानें अतिरेक केला आहे, त्याचें वर्णन पुढें येईलच.

सगनची कविता बहुशः शृंगारिक आहे. तिचेंही वर्णन यथाकाळीं येईल.

कृष्णाच्या शृंगारिक लीला वर्णन करणाऱ्या परशरामाच्या चारपांच लावण्या आहेत. ' चक्रपाणी । नको धरूं पाणी । ' ' मी चांगट फाकडी रूपानें

तं काळाबेंदरा ।' या लावण्यांत कृष्ण आणि गोपी शहरवासी नागरीक नसून अगदीं खेडवळ गवळी व गवळणी आहेत ही जाणीव जितकी पटते तितकी इतर शाहिरांच्या कृष्णलीलेवरील लावण्यांत पटत नाहीं. रामजोशी, होनाजी किंवा प्रभाकर यांचे गोप व गवळणी यांना थोडाबहुत शहरच्या रहाणीचा संसर्ग पोंचल्यासारखा दिसतो. परशरामाचें वर्णन गांवढयांतील गवळ्यांचें आहे. परशरामाची भाषा शुद्ध मराठी असली तरी बहुश: खेडेगांवांतील साधी मराठी आहे. त्याचीं वर्णनें ही तशींच आहेत. मानवी शृंगारवर्णन करितांना देखील खेडयापाडयांतील साध्या रहाणीच्या सुखवस्तु शेतकऱ्यांची रहाणी परशराम जितक्या साहजिक व मनोवेधक रीतीनें करतो, तितकीं शहरवासी नागरिकांच्या विलासांचीं वर्णनें त्याच्या लावणींत खुलत नाहींत.

प्रभाकराच्या शृंगारिक लावण्यांचें हिडीस स्वरूप दाखविण्यापूर्वी त्याच्या व इतर शाहिरांच्या काव्यांतील भेदाभेदाची रूपरेषा दाखविणें अगत्याचें वाटल्यावरून हा विस्तार करावा लागला.

पेशवाईच्या अस्तापासून तों परशराम, सगन आणि प्रभाकर ह्यांच्या हयातीचा अंत झाला तेथपर्यंतच्या काळांत इंग्रजी वाङ्मयाशीं महाराष्ट्राचा परिचय होऊं लागला. मराठी गद्यवाङ्मयाला सुरवात झाली. त्यामुळें त्याकाळांत व त्यानंतरही कित्येक वर्षेपर्यंत मराठी काव्यरचना मागें पडली. ज्ञानेश्वरीच्या रचनेपासून पेशवाईच्या अखेरीपर्यंत मराठी कवितेचा जो विकास झाला, त्याच्या सहज परंपरेंतील हे तीन कवि मराठी राज्याचा अंत व आंग्लसत्तेचा उदय यांच्या संधिकालांत राहिले. त्यांची कविता वाचतांना त्यांच्या काळाचें वैशिष्ट्य व तत्कालीन समाजस्थिति यांचा विसर पडतां नये. प्रभाकराच्या शृंगारिक कवितेचें विवेचन करण्यापूर्वी इतका इशारा देणें अवश्य वाटतें.



# लौकिक विषय

**इष्क पेंचमें मगन भई लुटपुट सुन छंद परभाकरके ॥**

—प्रभाकर.

प्रभाकराचे पोवाडे त्याच्या काव्याला जितकी उज्ज्वलता देतात तितक्याच त्याच्या लौकिक विषयांवरील लावण्या त्याच्या काव्याला हीनता आणतात. पोवाड्यांतील किरकोळ तपशीलाचीं बारीकसारीक वर्णनें तत्कालीन इतिहासाविषयींच्या उत्सुकतेचें समाधान करितात. परंतु शृंगारिक वर्णनांत अशा तपशीलाच्या किरकोळ चेष्टांचें वर्णन अश्लील आणि किळसवाणें वाटूं लागतें. पेशवाईच्या अखेरीचें इतर काव्य जरी पाहिलें तरी त्या वेळच्या सामान्य समाजाची अभिरुचि इतकी भ्रष्ट झाली असेल असें वाटत नाहीं. शेवटले रावबाजी आणि त्यांच्या सारखे विषयलोलुप यजमान यांची भ्रष्ट रुचि भागविण्यासाठीं प्रभाकरानें आपल्या कवितेची अशी विटंबना केली, हें उघड दिसतें. लौकिक विषयवर्णनाच्या प्रभाकराच्या एकशें एकोणीस लावण्यांत आमच्या सदभिरुचीला किळस आणणार नाहींत अशा पंचवीस देखील लावण्या सांपडणार नाहींत. विप्रलंभ शृंगार असलेल्या फारच थोड्या आहेत. त्यांत देखील उत्तानपणा आहेच. शेवटच्या रावबाजीच्या विलासांचें वर्णन विसांहून जास्त लावण्यांत आलें आहे. कामांध, व्यभिचारी स्त्रियांनीं आपल्या प्रियकरांना संबोधून उत्तेजित करण्यासाठीं गाइलेल्या अशाच बहुतेक लावण्या आहेत. 'स्त्रीच सौंदर्य पाहून सात्त्विक भावना जागृत होतात; दुर्बुद्धि नष्ट होते; पश्चात्ताप होऊन दुरुक्तीच्या कल्पना लपतात!' असें होनाजी बाळा वर्णन करितो. प्रभाकराच्या नायिकेच्या लावण्याचा परिणाम त्याच्या उलट होतो. ' रुंद छातिवर बुंद गेंद जणुं गुलाब बहरामधिं फुलती ॥ अशा तरुणीची 'स्वरूपकीर्ति ऐकून घरोघर पुरुष भुजंगापरि डुलती । '; नृपतें डुलण्यावरच भागत नाहीं! ' आजन्मांत किती परस्त्री मातेसमान; त्यांची वृत्ति स्थिरली ××× । उदक हातावर केल्या तपाचें घालावया ते किती भुलती । ' ' गुणवती सती पतिव्रता रीतीची खरी । करुं नये विषयपर

कल्पना जरी ।' हें जाणून मुद्दाम 'काढी बेहूल हातामध्यें शोध करा अंतरीं ।'' अशी त्यांना पातकी इच्छा उत्पन्न होते.

नवरा आणि बायको यांच्या विलासाच्या वर्णनांत देखील प्रभाकराची अभिरुचि अधम वर्गाची आहे. बायकोनें कामवश होऊन स्वतःच्या कामावस्थेचें रसभरित वर्णन करावें आणि गलथान नवऱ्याला उत्तेजित करण्याचे परोपरीचे प्रयत्न करावे अशीं कित्येक वर्णनें आहेत. भ्रताराला उत्तेजित करण्यासाठीं पत्नीनें केलेल्या कामचेष्टांचीं तपशीलवार वर्णनें फारच बीभत्स आहेत. 'शुकस्वामिसारखे जितेंद्रिय पूर्णपणें भासतां । असे हो का हवस्यांतरिं त्रासतां ? ।' अशा उपरोधिक टोपणा देऊन प्रारंभ केलेल्या लावणींतील भ्रताराच्या गलथानपणाचें वर्णन तपशीलवार करतांना त्याच्या पत्नीकडून प्रभाकरानें काय काय वदविलें असेल तें मूळांतच पाहावें ! 'नका करूं बिगार अशि मरकशी ।' हा त्यांतला अगदीं संभावितपणाचा मासलाच म्हणावा लागेल. कित्येक लावण्यांतील पानचटपणा याच्याही पलिकडे गेला आहे. प्रभाकराच्या नायिकांचा कामावेग इतका प्रबल होतो कीं, 'भ्रतार नोहे दुसमान पुरा । देउन मला विश्वास प्रवासीं गेला निघुनी चांडाळ बरा ।' अशा शिव्या 'अष्टांगीं रगा दाटती' अशी स्थिति झालेली स्त्री नवऱ्याला देऊं लागते ! 'मद अष्टगुणित जरि स्त्रियांस पुरुषाहुनी । तरि काळ सुखें कंठितात कळ साहुनि ।' असें म्हणून देखील अशा नवऱ्याच्या पदरीं बांधलें म्हणून बापाला दोष देणारी नायिका आहेच ! 'कामोऽष्टगुणः स्मृतः ।' हें प्रमाण चवचाल पुरुषस्मृतीनें हिंदू स्त्रियांच्या माथीं मारवल्याचा प्रत्यय प्रभाकराच्या लावण्यांत जागोजाग दिसतो.

पतिपत्नी-विलासवर्णनाचा प्रभाकराचा दुसरा प्रकारही इतकाच अधम आहे. कामावेगाच्या भरांत पति स्त्रीवर असा बलात्कार करितो कीं, 'मी नव्हे नार गहाणची ।' अशी आठवण देऊन त्याला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न पत्नीला करावा लागतो. 'मलाच माझें स्वरूप पहावेना उगीच पडते भूल ।' अशी स्वतःच्या सौंदर्याची जाणीव असणाऱ्या 'मऊ मऊ फूल अखमूल । तैसें शरीर गुळगुळित सुगंधित जसें गुलाबी फूल ।' अशा

नवयौवनेच्या पति 'केळी केफान बंदी, (वडिच्या) ।' अशा कृत्रिम उपायांनीं सज्ज झालेला आहे, असें त्याच्या 'मुंद नेत्रां'वरून तिळा कळून येतें. 'जरा कांहीं काळजी जिवलग्या माझे हो प्राणांची ।' असा इशारा अत्यंत नाजूक प्रसंगीं देण्याचें तिच्या कपाळीं येतें. अगदीं विकरावर येऊन 'कुणी राख ठिवा; या आज बिहुन फारखती ।' असें सांगण्याची पाळी पत्नीवर यावी, त्या लावण्यांतील वर्णन किती उत्तान, अश्लील, आणि बीभत्स असेल याची कल्पनाच करावी !

'काय सुख सांगूं सखये विलासी भ्रतार ग । थिरट्या सभोंवत्या करितें होउन मी धार ग । चतुर सखा मी त्याची प्रियकर नार ग । असा असो जन्मोजन्मीं स्वामी ग ।' असें जेथें पतिपत्नीचें प्रेम आहे तेथें देखील 'रत नसो परस्त्रीच्या कामीं ग ।' असा उद्गार पत्नीच्या तोंडून प्रभाकरानें काढवावा यांत त्याची प्रेमाची कल्पना किती हिणकस होती, हें दिसून येतें.

'नको रे थिरट्या घालूं दोहों द्वारीं प्रहराप्रहरासी । पतिविण न घडे संग मोठ्या अमिरासी ॥' अशी सुरवात करणारी नायिका शेवटीं 'मनांतुन माझ्या तुसी वाटे प्रीत जोडावी । परंतु पतिची कशी शपथ सांग मोडावी ? ।' या विवंचनेंत पडते. अखेर एकदांचा मनाचा हिय्या करून 'येऊन आज रात्रीं भ्रमाची मूठ फोडावी ।' असें सांगून टाकते. तेव्हां तिला 'घडा आज करूनी शरीर परकामीं लागूं दे । × × × । म्हणे कवी गंगू हैबती संजोग जुगूं दे ।' ही 'प्रभाकर कविची न ये करणी नविन सुगरासी ।' हें अगदीं खरें ! असा उपदेश करण्यास निढावलेला प्रभाकर असेल तरच 'पती आड किती करिती कर्म, हा व्यवहारच सृष्टीचा । × × × । तारुण्यनदीचा पुर । काय भर कधुन भरपुर । मुळीं क्षणिक कायापुर । नाशिवंत जाणून चतुर चतुरावर जाती रिझून । पाहुन तुझा मुखचंद्र विसरलों मार्ग न चाले अजून । आलों दक्षिणेकडुन जावया उत्तरेस घर त्यजून ॥' असें सांगण्याचा त्याला हिंमत होईल.

'वर्षाची दिवाळी, भर पाडवा, मुख्य मुहूर्त ।' असें दिवसाचें महात्म्य सांगून 'केव्हांची हो करितें लाडखोड या ।' अशी लाडीगोडी लावणाऱ्या

बायका प्रभाकराच्या विवाहित नायिका आहेत. प्रभाकराच्या लावण्यां-वरून त्या वेळच्या महाराष्ट्राची कल्पना करावयाची असेल तर थोडेसे पुरुष कामांध होऊन माजलेल्या पोळांसारखे सुटले होते आणि बहुतेक निष्पौरुष झाले होते; व्यभिचार बोकाळला होता असेंच म्हणावें लागेल! 'बुळबुळा बुळा पति आवडेना ह्या जिवा। म्हणुन मैत्र म्यां सुरेख केला नवा॥' असें सांगणारी 'नार नवी तरणी।' आपल्या प्रियकराला 'घडाची ती गोष्ट नाहिं कधिं ग घडली।' असे उद्गार काढावयास लावते; किंवा 'व्यभि-चारपणाची आण। एकांतीं जाण प्राणप्रियकराजवळ वाहिली। × × ×। निसंग व्हावें कसें असें भय वाटे चित्तामधीं। ह्याचं अनुताप, होतो कधीं।' असा विचार करून एखादी स्त्री पतिव्यतिरिक्त वल्लभाला 'पुढले जन्मीं खचित आर्या। भार्या होइन तुझी।' व ती इच्छा पूर्ण व्हावी म्हणून 'प्रयागीं करवत घेऊन येउन लागेन चरणांबुजीं॥' असें आश्वासन देते; तेव्हां कामातुर स्त्रिया देखील अगदींच बेफाम झाल्या नव्हत्या अशी शंका येण्यास थोडीशी जागा राहाते. परंतु पुढच्या जन्मीं नवा वल्लभ मिळण्यासाठीं प्रयागावर करवतीचें दिव्य करणारी ही स्त्री 'भरपूर घरीं संपत्ती, सधन काय पती। पती प्रिय केवळ मनधरणिचा। पवित्र, प्रेमळ, उदार भोक्ता, भक्तराज तरणिचा। शास्त्रज्ञ शिरा पंडित, दिसे मंडित आखंडित, जो वस्त्राभरणिंचा। मातबर माहेरीं सासरीं नवलाखिण म्हणवित्यें।' अशा स्थितींतली आहे हें विसरतां नये. तिची जर अशी दशा तर 'पति आळशी फार।' अशा स्थितींतल्या कांकडीनें 'स्वरूपवान मजपरिस देखणा उजेड रुपाचा पडे। नित्य उठून अशेला मित्र करावा गडे॥' असें सख्यांना बेशरमपणें सांगावें यांत नवल नाहीं! अशा बेफाम नायिकांनीं 'ह्राता चढसी कसा जंगलच्या मोरा?।' 'स्तवितां तुजसी न येसि ह्राता रे।' अशा केंविलवाण्या काकुळतीनें परपुरुषांना आळविणें साहजिक आहे. पेशवाईच्या राजधानींत त्या काळीं झालेल्या अवनतीचें चित्र प्रभाकर आपल्या लावण्यांत रंगवीत असावा असें वाटतें. कोठें व्यभिचार उघडकीला

येईल म्हणून भिणारी स्त्री प्रभाकर वर्णितो, तर कोठें 'मितिभाव नांदतो हकिम शेजारी। तशामधिं झालीं अनुकूल घरांतिल सारीं।' अशी कुटुंबानें व शेजाऱ्यानें अनीतिमार्गाचा परवाना दिलेली स्त्री, 'वचन कुठें टळतां, जिभ शेंडयापुन कात्रा।' अशी ग्वाही 'प्रियकरपात्रा'ला—नवऱ्याला नव्हे—देते तर 'स्वरूपगुणी तरुण स्वतां, शूर भ्रतार माझा सरदार। पुण्यपरायण परोपकारी पिढिजाद जहागिरदार। × × × शहर पुण्यामधिं घरदार। अतिशय मजवर लोभ मनांतुन × × ×। घडिभर बाहेर चैन पडेना × × ×।' असें भ्रताराचें वर्णन करणारी 'पतिव्रता व्रत कठिण आरंभुन, शरिर सदोदित आठवलें।' अशी स्त्री देखील 'करुन व्रतभंग नाहक मज बाटविलें।' अशी कबुली देते. 'कसा करून तरि बाटवडा। मन माझें मोहिलेंस न कळे, आहे तुझ्यापाशिं मनकवडा।' असें आश्चर्य प्रदर्शित करणारी ही घरंदाज स्त्री इतक्या अधःपाताला जाते कीं, ती शास्त्रपुराणांच्या आणाभाका घेऊन या घाणेरड्या प्रेमाची ग्वाही देते कीं, 'जंवर कुडीमधीं प्राण तंवर नाहीं अजुन तुम्हाला विसराचे। शेवटास स्नेह लावुन मजला, नांव राखणें पितरांचें। कठिण दुरुत्तर करिन पुढें जर, शब्द न मानुन निकराचे। गंधमादनापरि तरि मुख, दुर्गंधि सकल होउ डुकराचे। × × × एकादशी शिवरात्री चतुर्थी, प्रदोष करतां अंतरले। म्हणून प्राणी नरकांत बुडाले असे समुच्चय कुठें ठरले। पतिव्रताव्रत कठिण तयाहुन, स्वधर्म सगळेच आचरले। अधर्म एक पहा कुकर्म घडतां, कितिक दोष शास्त्रीं धरले। कळुन असें धडधडित तुझ्यावर पंचप्राण माझे फिरले।' शास्त्रपुराण जाणणाऱ्या, श्रीमंत, कुलीन स्त्रीचा असा अधःपात वर्णन करणाऱ्या प्रभाकरासारखा सबळाच महाराष्ट्र अनीतिकर्दमांत लोळत होता असें मानण्यास मन घेत नाहीं; तरी पुरुष देखील असेच बदफैली बनून 'प्राणप्रियकरणी तुजवांचुनी चैन पडेना। × × ×। वाचितां लिहितां अर्थांतरिं चित्त जडेना। पुराणीं भजनीं कीर्तनीं लयलक्ष गडे ना।' असें परस्त्रीला सांगून "हें मी खरें सांगतों, हें माझें 'सत्य पाहुन या आलें युधिष्ठिरासि विमान।'" अशी आपली धर्मराजाशी

तुलना करितात. विश्वामित्रानें रंभेचा विश्वासघात केल्याचा दाखला देऊन 'सुखाचे संगती परपुरुष तुम्ही रे बेमान। बहार भोगुनियां सोडली म्हाळ दुस्मान।' असा पोलिसांचा आव घालण्यावर 'दावुन भावार्थ केसानें कापलिस मान।' असें म्हणण्याचा प्रसंग येतो.

'घरीं भ्रतार आहे बिजवर। कोण सवत एक तिवशी पकडली, तो लंपट तिजवर। मी म्हणुन सुष तुजवर।' अशी जखास तर्वे करणारी स्त्री प्रभाकरानें वर्णिली नसती तर नवलाची गोष्ट झाली असती! संक्रांतीला तिळगुळ देण्याच्या निमित्तानें परपुरुषाला घरांत बोलावणारी; 'उगीच नको करूं पायपिटी। उद्यां मी आपल्या पोरिबरोबर लिहून पाठविन हलुच चिठी।' असें आश्वासन देऊन 'तुम्हीं तर माझें खिलवणें। विषयसुखाचें झुलावणें। म्हणुन धाडितें बलावणें।" अशी कार्यकारणाची मीमांसा करणारी 'बाळपणापासुन चतुर खुब सराइत' नायिकाही प्रभाकरानें निर्माण केली आहे. अशा व्यभिचारी स्त्रीकडून 'कधीं तरी वियोग झाली हरकत। एक निश्चय आहे तेथें भगवान देइल बरकत।' अशी देवाची हमी देववून प्रभाकरानें प्रत्यक्ष परमेश्वराला अनीतीचा साहाय्यक बनविलें आहे. 'विवाह झाला ज्या संगें त्यास दुर ठेउनी। आनंदें गुज पुसतें येउनी। × × ×। घरीं असुन सर्व मंगळ। भासती सकळ ईंगळ।' अशी प्रभाकराची नायिका स्वतःला तुकाराम महाराजांची उपमा घेऊन 'अनंतरूपीं लय लक्ष जसें तुकोबाचें रंगलें। तसें तुझें ध्यान मला रे लागलें।' असें मोठ्या दिमाखानें सांगते. 'शहर पुण्यामधिं वाजुन चुकला डंका। नाहीं मुळींच धरली शंका।' अशी लाज वाटून प्यालेली प्रभाकराची प्रेमपिसी ज्या नादान मनुष्याला 'आडकाठी जिवलगा रे केली कुणी। य दिवसा नवऱ्यावाणी॥' म्हणून सांगते, तो इतका मेषपात्र आहे कीं, 'नको रहूं उगा; डोळ्यावर चढली लाली।' असें तिनेंच त्याला सांगावें लागतें! दुसरी एक स्त्री 'मी कुल-वंताची स्त्रिया' असें म्हणण्यास तिळमात्र लाज न वाटतां 'दूर असुनि तुझें वदन, मदें अधोवदन, होउन येतें!' अशी 'कामाची सोसे न अगन!' म्हणून उघड सांगते. अशा नाठाळ कामिनींना प्रभाकरानें उपमा देण्यांत

अप्रयोजकपणाची कमाल केली आहे. 'तिते जरी वस्ती सख्या चार उपाशीं रे । तरी तिचें सारें लक्ष लेंकरापाशी रे । तसा घरीं देह, मन येथें जडलें तुंपाशीं रे ।' या उपमेनें मातृप्रेमाची विटंबना केली आहे. अशाच रीतीनें कित्येक सुंदर उपमांच्या जोडीला 'पंडितास जिंकिलें सभेमधिं मदांध भंग्यांनीं ।' अशी एक आचरट उपमा पेशवाईची अखेर वर्णिलेल्या पोवाड्यांत देऊन प्रभाकरानें रसभंग केला आहे! 'घरांत सुंदर सभाग्य स्वामीला टाकुनि रतलें' अशी कबुली देणारी प्रभाकराची नायिका 'ईश्वरा सखा दे त्रिकालज्ञानी ऐसा । नको देऊं म्हैसा ।' अशी रसिकता प्रगट करून वल्लभाचें गुणवर्णन करते. 'कारण ज्याचें तेंच तुम्हाला समग्र सांपडलें ।' अशी संभोगशृंगाराच्या वर्णनाची सुरवात करणाऱ्या 'उजेड पडे मंचकीं रूपाचा देह संगिन ऐना' अशा 'माशुक मैने' नें स्वतःच्या क्रीडेचें केलेलें तपशीलवार वर्णन जितकें बीभत्स आहे, तितकेंच 'दानधर्म पूर्वी हातें या असेल कांहीं घडला । तर लाभो ही वस्त कुणी पाहिला दिवस पुढला ॥' असें आपल्या पुण्याचें उदक सोडून गरती स्त्रीला 'कुंटण अथवा स्नेहाकडुन संग घडेलसें करवा ॥' असें फळ मागणाऱ्या पुण्यवान् धार्मिक पुरुषाचें वचन अंगावर शहारे आणणारें आहे!

रा. यशवंतराव केळकर आणि रा. भावे हे दोघेही ज्या प्रभाकराचें मुक्तकंठानें गुणगान करितात त्याच्या कवितेचें स्वरूप असें हिडीस आहे. एकशें एकोणीस लावण्यांपैकीं फार तर पंचवीसच अशा सांपडतील कीं, त्यांतील शृंगारानें नीतिमत्तेला हरताळ फांसलेला नाहीं. ज्या रावबाजीच्या कृपेनें प्रभाकराची सदसद्विवेकबुद्धि अशी बोथटली त्याच्या विलासांचेंही वर्णन या एकशें एकोणीसांपैकीं सुमारें पंचवीस लावण्यांत रावबाजीचा उघड उल्लेख करून दिलें आहे. त्या वर्णनाचें दिग्दर्शन केल्याशिवाय प्रभाकराचें मन इतकें कसें निढावलें हें समजणें कठीण होईल.



## रावबाजीचे विलास

हारी हारी फवारे उडत होते बहराचे ।
ते गेले दिवस हे आले मोठ्या कहराचे ।
निरुपाय प्याले प्यावे आतां जहराचे ॥

—प्रभाकर.

प्रभाकरानें बाजीरावाच्या गुणविलासांचें अगदीं मनापासून वर्णन केलें आहे. त्याची नीतिभ्रष्टता देखील सुरसतेनें वाखाणण्यास प्रभाकर चुकला नाहीं. अवतारी पुरुष झाला कीं, त्याला नीति झुगारून देण्याची पूर्ण मुभा असावयाची हा परिपाठ हिंदूंच्या धार्मिक वाङ्मयांत कृष्णचरित्रानें घातला. तेव्हांपासून एखाद्या व्यभिचारी पुरुषाच्या नीतिभ्रष्टतेचें समर्थन करावयाचें असलें कीं, त्याला अवतारी पुरुष म्हणावें असा सोपा उपाय मिळाला. त्यांतून पूर्वीच्या युगीं किंवा जन्मांतरीं पतिपत्नीचें नातें होतें किंवा तसें नातें नसलें तरी एकाचें मन दुसऱ्यावर गेलें होतें, असें सांगितलें कीं काम भागलें! हाच उपाय अमलांत आणून प्रभाकर बाजीरावाच्या एका प्रियपात्राकडून ' युगायुगाची संगतीण सख्या रे नको विसरूं गुणिराया । ' ही लावणी वदवितो. परशुराम–अवतारीं आपण यत्न केले; पण परशुराम ब्रह्मचारी असल्यामुळें ते हरले! तेव्हां प्रथम यौवनांत तपश्चर्या केली. पुढें रामावतारांत अहिरावणाची बायको झाल्यें तेव्हां पलंगच मोडला. त्या वेळीं शाप देत होत्यें, पण पुढील अवताराची आशा दाखविलीस. कृष्णावतारांत देखील ती आशा पुरी झाली नाहीं; तरी कलियुगांत पुरी होईल असें आकाशवाणीनें आश्वासन दिलें. ' आतां बसुन वामांकीं विलोकिन स्वरूपरूपाची मदभरणी ।' अशी बाजीरावाची अवतारकथा सांगून प्रभाकर म्हणतो ' अजिंक्य हा भूपती । पाहुनी सुचिर्भुत, आर्कि विघ्नें कांपती । '

' पुण्यशील राजा पृथ्वीवर ज्याची द्वाही । ××× । कितिक रूपवंत्या मुख बघन वलाया येती । ' असें बाजीरावाचें वर्णन प्रभाकरानें केलें आहे.

नव्या नव्या तरुणींनीं बाजीरावाच्या गळीं पडावें, त्यानें आपल्यावर प्रसाद करण्यासाठीं परोपरीनें विलाससुखाचें वर्णन करावें; परंतु मलयान् नवच्या-प्रमाणें त्याची शांतता पाहून ' करतां मन कठोर कां हो कृपाळा । ××× । कर शांत नृपाळा ॥ ' उगीच कसें राहवतें तरी मळ घालुन पुसतें ॥ ' असें विचारावें; असेही कांहीं प्रसंग प्रभाकरानें वर्णिले आहेत.

कोठें ' कीर्त ऐकुनि खावंदांची । आरंभिली मग आशा स्वामिच्या पदारविंदांची ॥' अशी स्त्री 'घरच्या दुहीला कंटाळून पतीला सोडून जीवा मनोभंग करूं नये ' असा पद्मपुराणांतील व्यासवचनाचा आधार देऊन ' असो पापपुण्य माझें मजकडे ।' असाही विश्वास देते आणि ' नाहीं मागत द्रव्य, टांक नको लावावा वहिला ।' म्हणून सांगते. तर कोणी ' नित्य पतीदेवता भोगितां उजागरीनें मजा ।' असें वर्णन करून म्हणते, 'अशा स्त्रिया गळिं पडून उडयावर उडया बळेंच घालती । रथ मेण्या पालखी समोंवत्या, रूपवंत्या चालती । कुणी धरती उचलून झगा, कुणि गोड हंसुन बोलती । तुज न्याहाळून सुंदरा । होती विव्हळ अति प्रियकरा । कामज्वरें व्यापती, तापती, म्हणती एकमेकिला । कशी करावी गती नित्य बाई जिव झुरणी लागला । ' ' हा मित्र दिल्यासारखा । नको करूं हरी पारखा ॥ ' अशा नादान स्त्रियांच्या या प्रार्थनेला प्रभाकर दुजोरा देऊन त्याच लावणींत म्हणतो, ' पुरुष हा औतारिक जन्मला । × कवि गुणी प्रभाकर ऐकुन संतोषला ॥' या औतारिक पुरुषानें स्वत: डोकीला केंसांचा टोप घालून, बायकांचे दागिने घालून, पदरदार पैठणी लालभडक नेसून, असा स्त्रीवेष घ्यावा कीं, ' जणूं बघुनि स्त्रिया लाजती; ' पुरुषाचा पोशाख लावणींतील नायिकेकडून करवून त्यानें जे विलास केले ते प्रभाकरानें मनमोक्त वर्णिले आहेत.

हा अजिंक्य भूपति इंग्रजांच्या हातावर मराठी राज्याचें उदक सोडून गेला, तेव्हां त्याच्या मागें राहिलेल्या विलासपात्रांचे पूर्वस्मृतियुक्त विलाप प्रभाकर वर्णूं लागला.

' कोण खबर प्रियकरास कळविल गंगातिरीं जाऊन । कोण घरीं आणिल समजावून । ××× । सर्वांग पुशिल येऊन' । ' अशा चिंतेंत ' कोंवास घालून

भर जमाकर देई हाती आदरून ।' या चिंतेचा भार होताच ! 'शेवट केव्हा झाल्या संगातिरीं ग । नाहीं वळे गोड आतां बरी ग । पडले पर्वत दोघांमधीं ग । वीष कुणी वातलें दुधी ग । ' अशा विलाप करणाऱ्या बाजीरावाच्या प्रियजनानें 'निरुपाय प्याले ध्यावे आतां बहुरावे ।' असेंच ठरविलें. तरीही 'असतील तेथें असोत सुखरूप स्वामी ।' असा शेवटचा आशीर्वाद देतांना बाजीराव पुन: राज्य घेईल अशी कल्पना देखील न करतां त्यांना वाटतें तें इतकेंच कीं, रंगेल बाजीराव जगला वांचला तर असेल तेथें त्याला 'मिळतील स्त्रिया मजपरीस नामी नामी ! ॥'

अशा यजमानाचें भ्रष्ट विलास वर्णन करून प्रभाकराच्या अभिरुचीचा अध:पात झाला !

अशा या उत्तान आणि अश्लील काव्यांतही प्रभाकराचे नैसर्गिक काव्यगुण लपत नाहींत. किरकोळ गोष्टी देखील न वगळणारी त्याची सूक्ष्म दृष्टि दिसून येते. त्याच्या वेळीं चहापान ही एक चैनीची गोष्ट बनली होती असा 'चहा बनाकर मैं देती अजी तुम पीवो ।' अशा एका उर्दू लावणीतील [illegible]वरून दिसतें. 'वय बारा तेरांत आणि ऐन भरांत' असें जरी एका लावणींत वर्णन आहे तरी चौदा, सोळा, सतरा, आणि वीस वर्षांच्याही नायिका त्यानें वर्णिल्या आहेत. उर्दू किंवा हिंदी लावण्यांतील नायिका जास्त उमरीच्या आहेत हें लक्षांत घेण्यासारखें आहे. हिंदी आणि उर्दू या भाषांतही प्रभाकराची चांगलीच प्रगति होती. 'खडी बागन गुलबदन परी तो कहां चले टोना करके ।' या लावणींतील स्त्रीसौंदर्याचें वर्णन फार सुंदर आहे. 'नैनोंका तीर मारा कलिजाके पार ।' या लावणींतील वर्णन हिंदी काव्यांत सामान्य असलें तरी त्यावरून प्रभाकराचा हिंदी काव्याशीं चांगलाच परिचय होता असें दिसून येतें. 'दिलका दिलभर जलदी मिलावरी । नहिं तो लाव अफीम खिलावरी ।' आणि 'दिलभर दिलदार मुझे मिलावो । नहीं तो अफिम खिलावो' या दोन्ही लावण्यांतील विप्रलंभ शृंगारांत मर्यादेचा अतिक्रम न होतां विरहावस्थेचें चांगलें वर्णन केलें आहे. 'लाव [illegible] सिर काट धरे । फिर परवत नाहीं ॥' 'सवार होकर चले मुसाफर किधर इधर ने

नजर पुकारत धरी । शब्द जोडुन जातो मधे अपराध केले काम तरी ॥' या हिंदीमराठी मिश्र लावण्यांत रामजोशाचें अनुकरण उघड दिसतें; परंतु रामजोशाची खिचडी मात्र रा. यशवंतरावांच्या मतांत अळणी, प्रभाकराची तेवढी पचनी पडली, असा विपरीत परिणाम दोघांच्या बाबतीत घडला.

प्रभाकराच्या कित्येक उपमा फार सुंदर आहेत. 'प्रीत बळ अळण्यांत तशि आलि दिसुनी ।' 'डोंगरचे आंवळे समुद्राचें मिठ । गोडी झाली अवीट ।' 'तुटुं नको प्रीतीचा नवाकुन देंठ ।' 'कोय आम्रफळाची अति पातळ कमटी' 'मान हिलाल ।' 'सजीव सारंगी ।' वगैरे वर्णनें फारच मार्मिक आहेत. परंतु 'पंचरत्नांत समुज लख्या ( cat's eye ) ।' अशी विलक्षण उपमाही कोठें आढळते.

'संशय दीप निःसंशय समीरें उठुन आधि मालवा ।' या रूपकांत संशय हा दिवा आणि त्याचा अभाव हा वायु हें रूपक अगदींच टाकाऊ आहे. परंतु त्याच्याच पुढें 'एकनिश्चय वृक्ष त्यामधीं ममताखडीसाखर कालवा ।' असें सुंदर रूपक येतें ! 'आलाप नलगे सहज बोलतां येती दुरून धांवत हरणें ।' हें मंजुळ आवाजाचें वर्णन अत्यंत मार्मिक आहे. 'कंठ तुझा मंजूळ सुसंगित, फिरक स्वरामधिं स्वर फिरती ।' या लावणींत प्रभाकराचें संगीतज्ञान व रागरागिणींचें वर्णन उत्कृष्ट दिसून येतें. 'आधींच स्त्रियांचा कंठ, तशामधिं पूर्वी सुळे तिवरे प्रहरीं । हावभाव प्रत्यक्ष दाविसी नेत्र तुझे केवळ जहरी । आईल वाटतें प्राण मनाला श्रवण होतां गंगालहरी । काय काय शिकलीस न कळे अंत कोणाला या लहरीं । नको घेउ तरी तान अतां या परज वसंताची गहरी । गुरुकृपें परी सरस्वतीच्या भरल्या असतिल दारीं विहिरी । दैव मुळीं प्राधान्य पतीचें आपणास वस्तू पुरती ॥' या वर्णनावरून कुलस्त्रियांनाही प्रभाकराच्या वेळीं संगीतकला येणें निषिद्ध नव्हतें असें वाटतें. 'क्वचित्रानी कतिमता' या सुभाषिताला या लावणींत मुळींच दुजोरा दिला नसून अश्लीलतेपासून मुक्त असलेल्या बहुतेक लावण्यांत हिचा समावेश होतो. तरी 'उदास, धुन, वार्धक्य येतां ब्रह्मचारी वेळा चळती । अलम उभी रसग्रंत अवघे त्यजुन स्त्रिया गर्वित ठरति ॥' हें गाळवोट आहेच !

पतिविरह झाला असता ' खेळतां गंजिफा येतें रडें ग ॥ ' या एका लावणींतील उद्गारावरून तरुण, कुलीन स्त्रियास वेळ घालविण्यासाठीं गंजिफा खेळण्याबद्देखील हरकत नसावीसें वाटतें.

'कधीं ग होइन लेंकुरवाळी ' या लावणींत लग्न होण्यासाठीं नवस, तंतरमंतर वगैरे उपायांचें वर्णन असून त्याच्या पुढील लावणींत गर्भारपणाचें वर्णन आहे.

पंक्तींत वाढणारी यजमानीण देखील प्रभाकराच्या वर्णनांतून सुटली नाहीं. ' मोहोनी असी सुरसमेसर्वी अमृत वाढी करीं । तशी नार पंगतींत आग्रह करी ॥ ' या लावणींतील वर्णनांत सभ्यतेचें अतिक्रमण नाहीं ' कुणासवें शब्द नकरी फारसा । × × × दुधीं कोचन ग्रान्या भरून । घ्या घ्या म्हणे आदरें करून ॥ ' हें गृहिणीचें वर्णन योग्य आहे. परंतु 'नट नाटक कलियुगांत ही राधा दुसरी । × × × । हावभाव दावी पदरावरून । ' हें वर्णन जसें यजमानपत्नीस योग्य नाहीं, तसेंच ' पात्र पाहुन, उभि राहुन, जरा नजर करी ज्यांवरी । वजेड पडे चपळेपरि त्यांवरी ॥ लोकांस चंद्री लागली । नाहीं शुद्ध मागली । असी सुगर फार चांगली । स्वच्छंदामधिं घाली वनीं गुंजारव मधुकरी॥' हें वर्णन तिला आणि जेवणाऱ्या पाहुण्यांनाही फारसें भूषणास्पद नाहीं.

प्रभाकराच्या वैषयिक लावण्या अशा गुणदोषयुक्त आहेत. त्याच्या काव्यांत पदलालित्य आहे; वर्णनांत उठावदारपणा आहे; परंतु कल्पनाचातुर्य नाहीं आणि अर्थवभवही नाहीं. रसिकाच्या हृदयाला भेदणारी अशी कल्पना त्याच्या काव्यांत सांपडत नाहीं. वर्णनाचा सूक्ष्मपणा मात्र भरपूर आहे. तो पोवाड्यांत खुलतो, परंतु लावण्यांतील शृंगाराला उणेपणा आणतो. त्याचे पोवाडे मनाचें समाधान करितात, क्वचित पूर्ववैभवाची स्मृति देऊन चित्त उद्विग्नही करितात.

त्याच्या लावण्या व पोवाडे यांतील या फरकाचें कारण उघड आहे. पहिल्यानें रावबाजीसारख्या उच्छृंखळ चैनी यजमानासाठीं त्यानें लावण्या रचल्या व नंतर चरितार्थासाठीं त्याला लावण्या रचून ज्यांचें मनोरंजन करणें भाग झालें, असे लावण्यांचे शोकिन लोक त्या काळांत बहुधा रावबाजीसारख्याच ठशाचे होते. शिष्टमंडळींत लावण्यांना फारसा मान नव्हता. प्रभाकराचा पेशा कीर्तनकाराचा असता तर त्याच्या लावण्यांतील उत्तानतेला आळा पडला

सता; परंतु अव्वल इंग्रजींतल्या केवळ तमाशे पाहाणाऱ्या श्रोतृवर्गातच प्रभाकराच्या लावण्यांना बहुशः आश्रय मिळाल्यामुळें त्याच्या लावण्यांत अश्लीलपणा जास्त वाढला, असें अनुमान होतें. परंतु त्याच्या पोवाड्याची स्थिति तशी नव्हती. पेशवाईंत असो किंवा पेशवाई विलयास गेल्यावर असो, स्वराज्यांतील ऐतिहासिक प्रसंगांचें वर्णन ऐकणारे श्रोते तमासगिरांहून जास्त योग्यतेचे असले पाहिजेत. त्यांच्यासाठीं प्रभाकरानें जे पोवाडे रचले त्यांतील विषयांसंबंधानें त्याला आपलेपणाची भावना होती. पेशव्यांच्या सत्तेविषयीं व त्यांच्या वैभवाविषयीं पूर्ण आपलेपणा प्रभाकरासारख्या चित्पावन कवीला जितका वाटेल तितका होना गवळ्याला, परशुराम शिंप्याला, सगन मुसल्मानाला, किंवा रामजोशासारख्या देशस्थालाही वाटणें शक्य नाहीं. नानासाहेबांच्या कारकीर्दीपासून चित्पावन सरदारांचीं घराणीं उदयास आलीं तसें आपलेंही घराणें जातीच्या किंवा नात्याच्या वशिल्यानें त्याच रियासतींत वैभवास चढणें संभवनीय आहे; पुत्रपरंपरेनें नाहीं, तरी कन्यावंशाच्या नात्यानें पुढेंमागें पेशव्यांच्या गादीवर बसणाऱ्या पुरुषाच्या पूर्वजपणाचा मान आपणांकडे येणें अशक्य नाहीं; अशी भावना कोणत्याही चित्पावनानें पेशवाईंत बाळगणें साहजिक होतें व त्यांत कांहीं गैरवाजवीही नव्हतें. त्यांतूनही महाराष्ट्रसारस्वतकारांनीं म्हटल्याप्रमाणें, "चित्पावन कोंकणस्थ ब्राह्मणांत जे थोडे कवि झाले त्यांत प्रभाकर हा बऱ्याचपैकीं दिसतो." अर्थात् ज्या सत्तेविषयीं त्याला आपुलकी वाटत होती त्या सत्तेच्या वैभवाचें मनमुराद वर्णन करण्यांत आणि ती सत्ता अस्तंगत झाल्याबद्दल मनःपूर्वक शोक करण्यांत त्यानें आपल्या अंगीं असलेल्या काव्यगुणाचा उपयोग केला. प्रभाकराचे पोवाडे इतर शाहिरांच्या पोवाड्यापेक्षां जास्त सरस होण्याचें कारण त्यांतील वर्णनाशीं त्याची तादात्म्य वृत्ति हें होय! तसेंच बाजीरावाच्या वेळीं वसईच्या तहापासून ज्यांचें प्रस्थ वाढलें होतें, त्या रास्त्यांच्या आश्रयास असल्यामुळें त्याला दरबारची माहिती चांगल्या रीतीनें मिळे. यामुळें त्याच्या पोवाड्यांत वस्तुस्थितीचें चित्र बहुतेक जसेंच्या तसें आलें आहे.

# परशराम

करीन लावणी । अलक्ष वेंचुनी । देवा पंढरीराया ॥
अभेद यार्णे । नामें तुझिया । गाइन मी ताराया ॥

—परशराम.

नाशिकच्या पूर्वेस सिन्नर तालुक्यांत 'वावी' किंवा राजाची वावी, या नांवाचें गांव आहे. १८५७ सालच्या बंडांत जंगली महाराज या नांवानें प्रसिद्धीस आलेल्या भोसले घराण्यांतील जंगली राजांच्या सख्ख्या बंधूंचा तेथें वंश आहे व त्या वंशाकडे तेथील पाटिलकी आहे. सदरील वावी हें परशरामाचें मूळ गांव. चित्रशाळाप्रतींत परशरामाच्या लावण्यांस जोडून त्याचें चरित्र दिलें आहे त्यांत परशरामाचा जन्म शके १६७६ ( इ. स. १७५४ ) व मृत्यु श्रावण शुद्ध १२ शके १७६६ ( इ. स. १८४४ ) असा देऊन त्याचा मृत्यु नव्वदाव्या वर्षी झाल्याचें नमूद केलें आहे. परंतु मृत्युपूर्वी पंधरा दिवस त्यानें आपल्या आईस आपली मरणवार्ता कळविली होती असेंही तेथें सांगितलें आहे. त्यावरून परशरामाच्या निधनकाळीं त्याच्या आईचें वय १०५ वर्षांचें तरी असावें असा अदमास ठरतो. 'ही गोष्ट असंभाव्य दिसते; निदान कांहीं विश्वसनीय पुराव्यावांचून खरी मानतां येत नाहीं;' हें रा. यशवंतराव केळकरांचें विधान योग्य आहे. तुकाराम पुंडलीक शेटये यांनीं परशरामाच्या लावण्यांचा संग्रह प्रसिद्ध केला आहे त्यांत परशरामाचा जन्मशक समजत नाहीं; परंतु मृत्युसमयीं त्याचें वय ८०–९० वर्षांचें असावें अशी माहिती दिली आहे. परंतु त्यांनींही परशरामाच्या निधनकाळीं त्याची आई हयात असल्याचें वर्णन केलें आहे. त्यामुळें त्यांच्या माहितीवरही तसाच आक्षेप येतो. संतपणाचा छाप परशरामाच्या चारित्र्यावर बसल्यामुळें अनेक असंभाव्य आख्यायिका त्याच्या चरित्रांत आल्या आहेत. त्यांतील कित्येक आख्यायिकांच्या सत्यतेला त्याच्या लावण्यांचाही आधार दिला जातो. परशराम हा पूर्वी श्रीकृष्णाचा पेंद्या नामक संवगडी होता, दुसऱ्या जन्मीं

'नामयाचा गोंदा' झाला आणि शेवटीं 'लावणी करणेसाठीं' परशरामानें जन्म घेतला असें त्याच्या 'करीन लावणी अलक्ष वेंचुनी' या लावणीच्या आधारें शेटये प्रतींत प्रतिपादिलें आहे. परशरामाला पंढरपूरच्या बडव्यांनीं देवळांतून मारून बाहेर काढिलें, तेव्हां पांडुरंगमूर्तीच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. त्या वेळीं देवळांत असतां 'साक्षात् देव पंढरी' ही लावणी आणि देवळांतून घालवून दिल्यावर 'तुझी लिला तूंच वदविशी' ही दशावतारवर्णनाची लावणी रचल्याचें सांगण्यांत येतें. परंतु दुसऱ्या लावणीच्या शेवटीं परशरामानें आपल्या सर्व साथीदारांचीं नांवें घेऊन 'सजवट कोल्हापुरीं' असा स्थाननिर्देश केला आहे तो या आख्यायिकेस बाधक आहे. त्याचप्रमाणें परशरामाच्या पायाच्या आंगठ्याचें तीर्थ पिऊन एका अडलेल्या बाळंतिणीची रामपूर ता॥ राहुरी येथें सुटका झाली. त्या वेळीं तिला झालेला मुलगा १९१८ सालापर्यंत हयात होता. त्याच्या आईच्या तोंडून त्यानें ती हकीकत ऐकिली व चरित्रलेखकास सांगितली अशी गोष्ट शेटयेप्रतींत आहे. ज्याच्या जन्मकाळीं हा चमत्कार घडला, त्याचें नांव दिल्यास बरें झालें असतं. तरीही आंगठ्याचें तीर्थ आणि प्रसुति या गोष्टींत काकतालीय न्यायही संभवतो. परशरामाला आपला मृत्युकाळ अगोदर कळला होता. "मंजुरास जाऊन त्यानें मृत्यूच्या आदल्या रात्रीं आपल्या संवगड्यांकडून लावण्या म्हणवून घेतल्या. दुसऱ्या दिवशीं सर्वांचीं भोजनें करवून ज्ञानेश्वरीचा अकरावा अध्याय वाचून, हरीचा गजर करून, आपला भाचा नारायण शिंपी याचे अंगावर मान टाकून देह ठेविला. त्या वेळीं त्याचा मुलगा रामकृष्ण हा जवळ नसून परगांवीं गेला होता. 'तो रामकृष्ण आला' असें कोणी लटकेंच म्हटलें. तेव्हां एक डोळा उघडून पाहिलें. रामकृष्ण नाहीं असें पाहून तोही डोळा मिटला." असें चित्रशाळा प्रतींत आहे. "आईचे मांडीवर डोकें ठेवून 'पुंडलीक वरदे हरि विठ्ठल' असें म्हणाले झालें." व रामकृष्ण आल्याचें ऐकून 'डोकें वर उचलून पाहिलें, परंतु रामकृष्ण खरोखर आला नसल्यामुळें पुनः मांडीवर डोकें ठेवून पुंडलीक वरदे असा घोष करून वैकुंठवास केला' असें शेटयेप्रत म्हणते. चमत्कारांचे असे

मासले परशरामाच्या चरित्रांत वर्णिले आहेत. परशरामास सुपारी खाण्याचें एकच परंतु जाडें व्यसन होतें. एकसारखी सुपारी तोंडांत पाहिजे होती. एका ठिकाणीं शिमग्याचा पांच दिवसांचा तमाशा ठरवितांना बिदागीबरोबर मणभर सुपारीचाही ठराव केल्याची गोष्ट शेटयेप्रतींत दिली आहे. परशरामाची कै. टिळकांशीं समानव्यसनता पाहून सदरील चरित्रकाराला स्फूर्ति झाली असावी आणि इंग्रजी अंमलांत बदललेल्या परिस्थितीचें परशरामानें जें वर्णन केलें आहे तें वाचून ' मवाळबंधूंस एक प्रकारें अंजनच बसेल म्हटल्यास हरकत नाहीं;' असा खोंचदार अभिप्राय त्यानें ठोकून दिला असावा. असो; परशरामाच्या शिष्यांनीं व साथीदारांनीं त्याचा लौकिक पुढेंही चालविला. त्यांत भवानी तेली ऊर्फ बाकेराव यानें बडोद्यास पुष्कळ लोकप्रियता मिळविली व देणग्याही मिळविल्या.

परशरामी लावण्यांत इतरांपेक्षां पुष्कळच विषयवैचित्र्य आहे. अनेक विविध विषयांवर त्यानें लावण्या रचलेल्या आहेत. त्यामुळें तत्कालीन सामान्य जनतेची रहाणी, लोकांच्या समजुती, नवसांचे प्रकार आणि चालीरीति यांची विपुल माहिती मिळते. तितकी इतर पांच शाहिरांच्या काव्यांतून मिळत नाहीं. त्यांतही दोन विषयांत परशरामाचें वैशिष्ट्य आहे. त्यानें आपल्या लावण्यांत वेदांत आणलेला आहे आणि पेशवाईच्या अस्तानंतर स्थापन झालेला इंग्रजी अंमल व लोकस्थिति यांवर पोवाडे रचले आहेत.

रामजोशी आणि अनंतफंदी हे कथेकरी हरदास असल्यामुळें त्यांच्या काव्यांत नीति आणि वैराग्य यांचा उपदेश केलेला आहे. होनाजी बाळा, प्रभाकर व सगन यांच्या या विषयांवर स्वतंत्र लावण्या नाहीत. परंतु परशरामाच्या कित्येक लावण्या केवळ परमार्थपर असून त्यांत वेदांताचे पारिभाषिक शब्द, उपमा इत्यादिकांची रेलचेल केलेली आढळते. तथापि हा वेदांत केवळ सुलभ हरदासी निरूपणाच्या स्वरूपाचा आहे. कथापुराणांस जाणाऱ्या महाराष्ट्रांतील कोणत्याही हिंदु स्त्रीला अथवा पुरुषाला अशा वेदान्ताचा परिचय असतो. इंद्रियें व आत्मा, प्रकृति व पुरुष, माया आणि ब्रह्म यांविषयींचें हरदासी विवेचन सामान्य जनतेच्या परिचयाचें असतें, त्या-

पलीकडे परशरामी लावण्यांची मजल जात नाहीं. बाह्यत: शृंगारिक किंबहुना अश्लील दिसणारें वर्णन करून त्यांतून वेदांताच्या तत्त्वांचा अर्थ काढावयाचा किंवा सुरवातीस अशा प्रकारचें वर्णन करून त्याचें पर्यवसान पारमार्थिक तत्त्वोपदेशांत करावयाचें अशा प्रकारची कांहींशी श्लेषात्मक रचना अनेक संतकवींच्या नांवावर खपते; तसाच या लावण्यांचा प्रकार आहे.

"गणगोताची आशा सरली, संसाराला हात धुतले । जीव घेवो लग्नाचे नवरे, परपुरुषीं हें मन रतलें ॥" अशा रीतीनें लावणीची सुरवात करून कृष्णचरित्रांतील ऋषिपत्न्याख्यान सांगावयाचें आणि शेवटीं 'सकळ गोपि विषयानें तरल्या, परपुरुषीं ज्यांचें मन रमलें । प्रकृति दृष्टि पाहतां कवलें उफराटें सकळांत दिसलें । × × × । परपुरुषाला गावें, ध्यावें, स्वहित करणें जरि असलें । नामें विठ्ठल करून पसारा परशराम म्हणे जिविं रुतलें ॥' ही विवेचनपद्धति आपल्याकडे बरीच रूढ आहे. "× × × करीन परंतु लग्नाचा नको नवरा । माहेरीं माझें चित्तमन रमलें सासरचा नको वारा ॥' या लावणींतील कडव्यांत जी अश्लीलता दिसते तिचा निरास दहा इंद्रियें (ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें) यांच्या भजनीं लागून परमात्म्याची हेळसांड होते, या गर्भित अर्थानें होतो. आणि त्याच लावणीच्या पुढील भागांत 'त्रिकुट चोहटा' 'सहा चवघांचीं वचनें' 'सतरावी' 'परेहून परता त्याहून वरता परपुरुप' वगैरे पारिभाषिक शब्दांची खैरात व या वरकरणी अश्लील वर्णनाच्या पोटीं केलेली परमार्थचर्चा पाहून तज्ज्ञ भाविक ज्या ब्रह्मानंदानें डोलूं लागतात त्याची कल्पना अपरिचितांना होण्यासारखी नाहीं. ताडाच्या झाडाखालीं दूध पिणें चांगलें नाहीं, असा जरी उपदेश करण्यांत येतो, तरी वेदांततत्त्वाचें अमृत अश्लीलतेच्या मद्यघटांतून गटगटां प्राशन करण्यांत भाविक हिंदूंना जो आनंद वाटतो त्याचा प्रकारच और आहे ! तशीच 'मायबापाची लेक लाडकी बसली आढी धरून । इजला भ्रतार द्यावा करून ॥ बापा आधीं लेक जन्मली नारी आधीं पिता । ब्रह्माविष्णुमहेश आदिशिवाची कांता ॥' वगैरे कोडीं "नाथाच्या घरची उलटी आहे खूण । पाण्याला मोठी लागली तहान ॥" याच्या जोडीची असून तीं उलगडण्यांत भाविकांना

मोठा उत्साह वाटतो. परशरामानें पौराणिक कथांवर ज्या लावण्या रचल्या आहेत त्यांत देखील अशीं कित्येक कोडीं ठेवून दिलीं आहेत. दुर्योधनाची पत्नी भानुमती हिनें पतिवशीकरणासाठीं म्हणून दुर्वास ऋषीकडून तेल आणून घेतलें. त्या तेलाची वाटी लवंडल्यामुळें तें तेल पाताळांत शेषाच्या टाळूपर्यंत जाऊन पोंचलें. त्या मंतरलेल्या तेलाच्या प्रभावामुळें शेष रोज येऊन दुर्योधनादेखत भानुमतीवर बलात्कार करीत असे. असें हरदासी आख्यान सांगून परशराम पुसतो कीं, शेष जेव्हां भानुमतीच्या महालांत येत असे, तेव्हां 'पृथ्वी कशावर ठेवीत होता? सांगुन बोला पुढें!' तसेंच जयद्रथवधाच्या वेळीं कृष्णानें सूर्याआड सुदर्शन धरून सूर्य मावळल्याचा भास उत्पन्न केला तेव्हां "सुदर्शनाचें तेज हरपलें कैसें त्या दिनीं? नवशिकाला काय पुसावें शहाणा पडेल अडचणीं॥" हा परशरामाचा सवाल आहेच! पौराणिक कथानकांवर परशरामानें ज्या लावण्या केल्या आहेत त्यांत मूळच्या ग्रंथांवर हरदास, पुराणिक किंवा नंतरचे ग्रंथकार यांनीं फेरफार करून जीं आख्यानें बनविलीं त्यांचा भरणा दिसून येतो. इतकेंच नव्हे तर द्रौपदीवस्त्रहरणाच्या लावणींत परशरामानें कृष्णाकरवीं द्रौपदीला 'खंबायति पितांबर तो मद्रा कडकडी। × × ×। मुंबईचीं पातळ जरी। × × ×। शाल मैलारचा शिट संगमनेरी। मदन गोल आणिला जालनापुरीं। चोळिमहेश्वरी नागमोड किनरी। अद्विचा धोतरजोडा मोल कर शाहण्या। नारायण पेठ बऱ्हाणपुरचा जुना'॥ अशा वस्त्रांचा पुरवठा केला.

"अंतपार नाहीं हरिचा कळला बोलती शास्त्र-श्रुती। शेषाला नाहीं अंत लागला कुंठित झाली मती॥" या लावणीत युगगणनेचा हिशोब किती अपार आहे तें दाखविलें असून "सद्गुरुवांचुनि न पडे ठायीं साधुसंत जाणती खुणा। × × ×। **लीलावतीचे पाहून अडाखे ज्याशीं त्याशीं झाली पैंना।**" असे चरण आहेत व शेवटीं 'वितंडवादी वाद करूनी जातील अधोगती।' असें म्हटलें आहे. परशरामानें ही लावणी लीलावती म्हणणाऱ्या गोसाव्याचा नक्षा उतरविण्यासाठीं रचली अशी आख्यायिका आहे. अल्पशिक्षितांनीं वेदांताच्या किंवा देशकार्याच्या मोठमोठ्या गोष्टी

सांगून विद्येची अवहेलना करण्याचा प्रकार आजदेखील दृष्टीस पडतो ! परशरामाच्या परमार्थपर आणि पौराणिक लावण्यांवरून त्यानें अध्ययन मुळींच केलें नसावें, परंतु तो बहुश्रुत असावा असें वाटतें. एखाद्या खेडेगांवांतसुद्धां त्या काळीं कथापुराणादिकांच्या श्रवणानें पौराणिक आख्यानें आणि वैराग्यपर शिकवण कशी फैलावली होती, याचा परशरामाच्या काव्यावरून चांगल्या प्रकारें बोध होतो. ' दुर्घट माया ब्रह्मादिकांहीं–' ' केस थोडे बाई । पुरुष इतके करूं करूं बसले तपी । इतुकें करून पतिव्रता आगळी । घर माझें निजरुपीं ॥ ' वगैरे लावण्यांत पंचीकरणाचीं ठळक मूलतत्त्वें आलीं आहेत. सगुणनिर्गुण उपासनेंतील भेदही वर्णिले आहेत. परशराम सगुणोपासना श्रेष्ठ मानितो. 'नाहीं सगुणाविण मनशांति ।' असा त्याचा अभिप्राय आहे. ' त्रिगुणाचें तिनपण केलें सर्व पाहिली मजा । ' या लावणींत जन्मापासून मरेपर्यंत सामान्य मानवी चारित्र्यांत होणारे फरक वर्णिले आहेत. ते शेक्सपियरच्या समानार्थक वर्णनाशी ताडून पाहाण्यासारखे आहेत.

कृष्णलीलेवरील परशरामाच्या कित्येक लावण्या हृदयंगम आहेत. ' नातीळ रती चळ । तव कळा अचळ । तूं निर्मळ ब्रह्मचारी । अनंत माया शेष वर्णितां दुभागली वैखरी ॥ ' या लावणींतील राधाकृष्णांच्या प्रथमविलासाचें वर्णन एका ठिकाणीं कांहींसें उत्तान असलें, तरी देवलीला म्हणून समर्थनीय ठरेल. ' चक्रपाणी । नको धरुं पाणि । भरूं दे पाणी । जाइल पाणी मणि माझें ॥ मी नवतरणी । माथां तरणी । देहभान गेलें हरी तुझें ॥ ' या लावणींत पदलालित्य, श्लेष, आणि वर्णनकौशल्य तीनही गुण आले आहेत. विद्वत्तेची ज्यांत झांक मारते अशा परशरामी लावण्यांत या लावणीचा सहज समावेश होईल. परशरामी लावणीच्या धृपदांत सुरवातीस ठसकेदार शब्दलालित्य आणि अर्थगौरव हे दोन्ही गुण असतात; परंतु त्याच लावणींत त्या गुणांचा उत्तरोत्तर बहुधा अपकर्ष होत जातो. धृपदानें उत्पन्न केलेला आदर व अपेक्षा लावणींत पुढें कमी होत गेल्याचें पुष्कळ वेळां दिसून येतें.

कित्येक विनोदी कहाण्या व कथा परशरामानें लावण्यांत गोंवलेल्या आढळतात. त्यांतील कित्येक येथें देतों. १ नवऱ्यानें हांक मारिली म्हणून एक

पतिव्रता धान्य कांडतां कांडतां मुसळ वरच्यावर अधांतरीं सोडून पतीजवळ गेली, तों तिनें सोडून दिलेलें मुसळ तसेंच राहिलें. तो चमत्कार पाहून तिच्या शेजारणीनें तिचें अनुकरण केलें असतां मुसळ कपाळांत पडून रक्त वाहू लागलें आणि ती नवऱ्याला शिव्या देऊं लागली. २ एका नवऱ्यानें बायकोला म्हटलें, 'जीव गेला तर जाऊं दे नारी! केला नेम! ना कधीं डगन! तूं मरशील मी सता रिघन!' बायको 'तऱ्हेबाज ती आधींच खिलाडू!' नवऱ्याच्या गोष्टी ऐकून मिष दुखण्याचें करून निजली; आणि नवरा 'खरेंच निघल काय सता, पाठीला येट घेतली प्रेतकळा!' नवरा सता निघण्याच्या गोष्टी विसरला; आणि मनांत म्हणाला, 'अशी वस्तु कां आज भोगुन घ्यावी; दिवस उगवल्या लाऊं अगन!' तो तिजला भोगूं लागला. नार उघडून पाहे डोळा; आणि म्हणाली, 'बरा किं रे वचनांचा खंबीर! भोगुन घेशी सुख सोहळा!' ३ कल्पतरूच्या झाडाखालीं कर्महीन येऊन बसला. त्याची इच्छा होतांच त्याला तेथें पाणी, पंचपक्वान्नांचें भोजन, छपरी पलंग, रंभेसारखी मदनाची पुतळी, आणि रथ, अंबाऱ्या देखील मिळाल्या. परंतु कर्मानें भ्रांति पाडली. तो मनांत अचंबा वाटून म्हणाला, "भुतचेष्टा गमती मजला!" "तधीं अवधीं तीं भूतें झालीं; पाहुन मनीं बहु गजबजला. 'खातिल' म्हणतां खाऊन घेतलें!" अशी कहाणी सांगून परशराम म्हणतो, 'कल्पतरूकडे दोष मुळीं ना। भ्रांति भ्रमाच्या भ्रमिं रिझला॥' ४ मुलुखगिरीवरून नवरा आला आणि लष्करच्या बढाया सांगूं लागला. दोनचार बहुमोल कपडे मात्र त्याच्या अंगावर होते. 'चवरी, अबदागीर आणि दोनचार उंट दौलत मिळविली होती ती भिल्लांनीं लुटली;' अशी त्यानें थाप दिली. बायकोनें हुरळून जाऊन त्याची मोठीच बडदास्त ठेवली. डोकीला टक्कल पडलें होतें, आणि खांद्यावर घट्टे होते. ते शिरस्त्राण घातल्यानें व पाठीखांद्यावर ढालबंदुका पेलल्यामुळें पडले. सोन्याचे मंदिल व तुरे आपल्या मर्दुमकीमुळें बक्षीस मिळाले, असें त्यानें सांगितलें. एके दिवशीं एक पाहुणा आला. त्यानें खरी स्थिति सांगितली कीं, 'हा बुणग्यांत होता! मोळ्या वाहून टक्कल पडलें व बादल्या वाहून खांद्याला घट्टे पडले. लढाई झाली तेव्हां पोषाक घेऊन हा

पळाला ' तें ऐकून ' नारीचें झिजलें कपाळ पायां पडतां। वाण्याची उचापत देऊं कशानें आतां ॥ '

स्वतः नवऱ्यानें लग्नास उभें न राहातां खंजिराला प्रतिनिधि करून त्याच्याशीं लग्न लावण्याची चाल ' पतिव्रता खुण करून पतीला गुंफून दिधला तरा । ' या लावणींत आली आहे. त्या लावणींतील पतिव्रता नायिकेनें विक्रमपुत्र ठकसनाच्या आईप्रमाणें नवऱ्याला दाद लागूं न देतां पुत्र तर मिळविलाच; परंतु त्याशिवाय नवऱ्याच्या खंजीराशीं लग्न लावून एक सवत देखील त्याच्यापुढें अचानक हजर केली. सवतींचीं भांडणें, त्यामुळें नवऱ्याची ओढाताण, तर कधीं दोघींचा सलोखा यांचें वर्णन करणाऱ्या सहासात परशरामी लावण्या आहेत. पहिली उतार वयाची नवऱ्याला जपणारी, तर दुसरी तारुण्याच्या तोऱ्यांत त्याला मुठींत ठेवणारी; एक लग्नाची तर दुसरी पाटाची; दोन बायका असतांना तिसरी एखादी राख आहेच; अशी गृहस्थिति परशरामानें वर्णिली असून, या सवतींच्या ' नित्य धुमाळी सांज सकाळीं ' होत असल्यामुळें ' बेजार केला नवरा करुन ठेविला बिल्ली. । ' असा प्रकार घडत असलेला त्यानें वर्णिला आहे. त्याचप्रमाणें गांवढ्यांतील नवरा-बायकोचें भांडण कित्येक ' बालेघाटी ' लावण्यांत त्यानें वर्णिलें आहे. ' धट्टाकट्टा तरणा ताठा कांहीं करिना चाकरी । ' असा आळशी नवरा 'धष्टपुष्ट हा लड्ड सुमाना घर सोडून कुठें जाइना ।' असें बायको आपल्या नवऱ्याचें गाऱ्हाणें सांगते. ती म्हणते कीं, हा 'उगाच बाता मात्र मारतो; शिराळशेटी गोष्टी सांगतो; बाहेर लटकी मिजास मारतो; एक कानावर पगडी ठेवून दर्पणीं मुखडा पाहे; जन्मापासून आइतखाऊ कवडी जोडतां नये !" याच्या उलट नवरा सांगतो, 'पाटील हिचें ऐकूं नका ! लागलें वेड हिला चळ भरला माहेरचा ! काय बापाचें भूषण सांगती ? तिथें खडबडती पिसा ! तोंड धुतां धड येईना चिपडें, दो गालांतुन एक वांसा ! हिचा बाप तो आमचा मामा; मागत होता भीक ! बळेंच आणुन यानें पदरीं घातली लेक ! " त्यावर बायकोची तक्रार आहेच कीं, माझे माहेरचे दागिने यानें मोडून खाल्ले; 'आहाळण्या किती सोसूं याच्या झुकून देह झाली माझी माल !

साहिना दुःख म्हणून मी आलें पारावरी; लेक मी तुमची धर्माची काय अन्याय घाला पदरीं! खरी पंचाईत करा!' यावर पारावरचे पाटील दुसरा निकाल काय देणार? 'चुकेना लग्नाचा जोडा; पायीं खोडा जज्य बोले!' आणि समजी करून 'उभयतां धरून मणगटीं घरीं नेलें!' हाच निकाल ठरलेला.

बायकोच्या शिकवणीनें भावापासून विभक्त होणाऱ्या गृहस्थाची पुढें होणारी दुर्दशा एका लावणींत परशरामानें वर्णिली आहे. मूल होण्याची हौस; तें नसल्यामुळें वांझपणाची खंती; 'म्यां काय तरी देवाची चोरी केली? का पूर्वजन्मीं फळें नव्हतीं वाहिलीं? कोण इवशी (विवश) माझ्या अंगणामध्यें नहाली?' अशा शंका; इतकें झाल्यावर दैवी उपचार आहेतच. त्यासाठीं अंगारेधुपारे व्हावयाचे. एक 'सगट सुपारी। लागेल पाउण पैसा। विड्याचीं पानें शंभर, लवंगा तिन विसा। वीस केळीं, जायफळ, खारका दोन। एक आण कोंबडा उफराटे पर ऐसा। नऊ लिंबें, तिखारी नारळ—' वगैरे यादी पुरी केल्यावर कळतें कीं, 'बाइ समज तुज दोष असे लाविला। गे तुझ्या वेणीचा अग्रभाग कापिला। पुजला उंबरठा तुझा सोम अवसाला।' परंतु 'अंगारे केले जागजागीं पुसून। परि गुण कशाचा शेंद्री गोट्यापासून। नाहिं गर्भ राहिला धन महामुर नासून।' तेव्हां पंढरपुरची यात्रा, नवस वगैरे करून एकदाचा गर्भ राहातो. त्यानंतर त्या गर्भाचा विकास; पुढें मूल होणें; "एक्या पोऱ्यानें घर भरलें जणुं कीं अंगण सारें। दिसे माझें लागलें रांगु अंगण त्याशीं न पुरे॥ पानसांकळ्या हंसळ्या पुतळ्यांमधीं वाघनखें मढविलें। पायीं पैंजण तोडे घालुन राव्यापरि पढविलें। आणुन जरीची टोपी त्यावरी जाळी काढविली। लेकाची माय म्हणती, होती हौस मनामध्यें बाई कल्पना तितकी उडविली। घडी आनंदाची वाढविली॥" अशा होणारा आनंद; व नवसांची फेड यांचें वर्णन कित्येक लावण्यांत केलें आहे.

नवऱ्यानें बदफैलीपणा करण्यापेक्षां 'एक नाटकशाळा ठेवा घरीं। देखण्यांत जैशी इंद्रघरची परी॥' असें बायको बेशक सांगते. त्यावरून तत्कालीन

नीतिमत्तेची कल्पना होते. अशा रीतीनें परशरामाच्या अनेक लावण्यांतून पेशवाईअखेरच्या व इंग्रजी अंमलाच्या आरंभींच्या समाजस्थितीची पुष्कळच माहिती मिळते.

---

## परशरामाचें वैशिष्ट्य.

**वाहिली ती गंगा राहिलें तीर्थ मग आतांतरी होय शहाणा ।**
**—परशराम.**

इंग्रजी अमदानीपूर्वीच्या प्रसंगांवर परशरामाचे पोवाडे उपलब्ध नाहींत. ‘ पश्चिमवाहिनि गोदा प्रतिमळगंगा ’ या लावणींत रघुनाथरावानें कोंपरगांवास वाडे, महाल, देवळें बांधून बागा तयार करविल्याचा निर्देश आढळतो. ती माहिती अद्याप इतरत्र मिळाली नव्हती,असें यशवंतराव केळकर म्हणतात. ती लावणी ऐकून खुष झाल्यामुळें रावबाजीनें परशरामास इनाम देऊं केलें. त्यावर परशरामानें बाणेदार उत्तर दिलें कीं, ‘ सुइदोऱ्याला हयात असों द्या; तोचि इनाम मोकासा । निजकर्मी रत नर झाल्यावर काय उणा मग त्या पैसा।। × × × । पोट भराया उभारिला ना तमाशाचा धंदा । महाल मोकासे जहरी वळसे करितील आपुला बंदा । रुची मनाची गायन करुनी आळवावें गोविंदा । चैनीखातर आम्ही राया पडलों नाहीं या फंदा । कर्म आमुचें हरिगुण गावे, नाम न विकरों परिसा ।। × × × । गाण्याविरहित सुइदोऱ्यावर नित्य मिळवुनियां पैसा । खातो पीतो चैनी करितो, घेउनि विठ्ठलाचा दिलासा । ’ असा सडेतोड जबाब देणाऱ्या परशरामावरही होळकरशाहींत व बडोद्यास जाऊन याचना करण्याचा प्रसंग पेशवाई बुडाल्यावर आला आणि मल्हारराव होळकरावरील पोवाड्यांत ‘परशराम म्हणे आलों नांवावर गरीब,महाराज नवाजे । कल्पतरूचें दर्शन होतां दरिद्र हरलें अनुसहजे ।।’ असें त्याला गावें लागलें. फत्तेसिंग गायकवाडांना ‘ कल्पतरूचें दर्शन झालें, दरिद्र तेथें कोठें उरे ।’ असें वाखाणावें लागलें; आणि ज्यानें ‘ प्रीतीमध्यें ठेविलें इंग्रजाला रोहोकून । ’ त्या खंडेरावाची विनवणी केली कीं, ‘चकचकाट कल्पतरू नांव आलें ऐकून !’ ज्या इंग्रजी अंमलामुळें ही घटना झाली · त्या इंग्रजी अमदानीचें वर्णन या सहा शाहिरांपैकीं एकट्या परशरामानें केलेलें उपलब्ध आहे.

मराठ्यांशीं ज्या इंग्रजांचा मुख्य संबंध आला ते मुंबईकर इंग्रज ! मुंबईला परशराम लंकेची उपमा देतो. ‘रावरंक समसमान उंच नीच एकंकरी’ हें मुंबईचें वैशिष्ट्य परशरामाच्या काळीं देखील होतें. त्याचप्रमाणें मुंबापुरस्थ म्हणजे पिढीजाद संपत्तीवर चैन करणारे नव्हत; कसून अंगमेहनतीनें उदयास येणारे ! हें ‘पायपिटी डोईचा गाडा तर ममईची वस्ती बरी। हेलपाटी जर करून रहाशिल चौघांमधीं मातबरी ॥’ या त्याच्या वर्णनावरून उघड होतें. परशरामाच्या वेळींही मुंबईत कर्मठ धर्माचारांना वाव नव्हता. कर्मठ हिंदूंच्या दृष्टीनें येथें ‘राज्य राक्षसी प्रत्यक्ष जेथें पापाचे पर्वत होती। चौयुगांचे दोषी प्राणी अवतरून जेथें रहाती ॥’ अशी स्थिति होती.

इंग्रजांचें वर्णन करणाऱ्या पोवाड्यांत इंग्रजांचा ‘शककर्ता अवतार कलीमधें हीच भासली नवी मुद्रा।’ ही परशरामाची विचारसरणि महाराष्ट्रांत सर्वत्र पसरली होती. इंग्रजांपुढें पेशवे, मोंगल, जाट, होळकर हे सर्व ‘झिरपून गेले’ आणि ‘महाल मुलुख कुल पहाडी किल्ले ना लढतां बसले अर्पून !’ परशराम म्हणतो, ‘तेज हीन अवघ्यांचें झालें, ना आले जननी उदरां। शूरत्वाशीं डाग लागला यास्तव दैवीं आल्या मद्रा ॥’ विलायत कोणी पाहिली देखील नसतां त्यांची अशी जरब बसली कीं, ‘एक चपराशी चकती पाहून रयत थरथरी बकरी जशी।’ ‘न्याय नीति बालाहुन बारीक, मुसळाहून ठोसर लइशी ॥’ हें इंग्रजी न्यायाचें परशरामी वर्णन फार मार्मिक आहे. ‘दहा हत्तींना न ढळणारें काम इंग्रजी अमदानींत एक माणूस हालवूं लागला.’ ‘कोठें अम्मल,कोठें शह नुसता पदर खाऊन, लाऊन थारा’ अशा रीतीनें हिंदी सत्ता इंग्रजांनीं व्यापिल्यामुळें ‘शिंदे होळकर फक्त शिपाई जसें बाहुलें भिंगाला !’ अशा दशेस आले. परशरामाप्रमाणेंच महाराष्ट्र थक्क होऊन मनांत म्हणूं लागला कीं, ‘तेज हीन अवघ्यांचें झालें शूर शिपाई कांहीं नसतां। तराजूंत तोलून काढिल्या पृथ्वींतील अमोल वस्ता ॥’ इंग्रजी अमलाखालीं हिंदुस्थानची संपत्ति देशाला सोडून जात चाललेली पाहून परशरामानें भाकित केलें कीं, ‘लक्ष्मीका मूळ आलें वाटतें, समद्रात जाइल दिसतां !’

अव्वल इंग्रजी अंमलांतील देशस्थितीचें हुबेहूब चित्र परशरामानें रंगविलें आहे. पूर्वी 'रोजगार होता बेबंदींत;' त्या वेळीं 'धांवलें फावलें असेल कांहीं त्या संधींत। तें धनरत्न ठेवा बांधुन तुटक्या चिंधींत!' आतां काळ पालटला आहे. 'जे पंचहत्यारी होते आपल्या लावणींत। ढालातलवारा ठेविल्या घरच्या गोणीत'। 'हिंदवणी राजे होते, अवघ्या गोष्टी सोईच्या। वडिलांनीं मिळविली जहागिरी बसल्या ठायीच्या। जमविला पैका जशा वाळुवा नदीच्या।' आतां 'तप ज्याचा हा सूर्य झाला उदित। शक अवरा केवढा! चळ पडला अवघ्यांच्या बुद्धींत। शहाण्याचें शहाणपण न चाले या संधींत। ज्या नामी नामी वस्ता गंजल्या रहींत। चाल सख्या पाय फुंकून मार्ग नीट शोधीत। यापुढें कठिण काळ थोडक्या अवधींत।' असा परशरामानें इषारा दिला. इंग्रजी अंमलामुळें झालेलें स्थित्यंतर त्यानें याहूनहीं स्पष्ट वर्णिलें आहे तें आजच्या एखाद्या वर्तमानपत्रांत शोभेल. तो म्हणतो, 'जुने कायदे अगदीं मोडले जधींपुन झाली इंग्रेजी।' मोठमोठे उमराव धारकरी ज्यांचा चहूंकडे जबर दरारा होता ते 'राघ्यापरि पिंजऱ्यांत कोंडिले, मायेणीचा चंदी चारा!' 'शहाणे पुरखे, अकलवंत, हेवट, म्हातारे बिनकाजी! कवळे कोंब वय तरणे कारभारी त्यावर बहाल खुष मर्जी॥' 'जिकडे बदली तिकडे जावें कुटुंब कबिला बरोबरी! राजधान्या अगदीं बुडाल्या राजांचे झाले फर्जी। चवरी, अबदागिरी टांगुन ठेविल्या; छत्री आपुण आपली धरी शिरीं!' अशा या अमदानींत 'सावकारी मारवाड्याची घर बुडविल दिवसा दिसतां। ती (तीन) टोल्याचा कागद, त्यावर हजारोंचा भरी दस्ता। घरदाराचा लिलांव करून तुरुंगांत खाती खस्ता। **एक साल सुकळ एक साल दुकळ**। × × × जिकडे तिकडे भरी पांगली पाउस घाला घाली शिस्ता।' परशराम म्हणतो कीं, या राज्यांत वाघ बकरी एकत्र पाणी पितात हें लक्षण बऱ्याचें नव्हे. 'शक न बरा म्हणून वाघ बकरी एके ठायीं पाणी पाजी।' आज बिकट झालेला अस्पृश्यांचा प्रश्नही त्याला जाणवला होता कीं, "चहूं वर्णांची अवघ्यांनीं एकच केली धांदल। आठरा पगड महारमांग एक्या पोहऱ्यानें पाणी सेंदल!"

पेशवाईतील शाहिरांत कलगी तुऱ्याचा वाद होता. गवळी आणि रावळ यांची चुरस नेहमीं चाले. 'ज्ञानवल्लीची फत्ते तलवार रेवडी रावळाची।' असें बाळा बहेरूनें गावें, तर 'होना गवळयाचा झाला चुना' असें सगनभाऊनें म्हणावें. कलगीतुऱ्याची ही चुरस परशरामाला अनिष्ट वाटे. तो म्हणे 'तुझी आई कलगी! बाप तुझा तुरा! कां करिशी लटका वाद। कलगी तुऱ्याशी निंदुन गाइल तो मांगाची अवलाद ॥'

'मर्दानी देखणेपणा म्हणजे शिपाईबाणा' हें होनाजीप्रमाणें परशरामानेंही वर्णिलें आहे. तसेंच स्त्रीलावण्याचें वर्णन करणाऱ्या त्याच्या कित्येक लावण्या आहेत. 'नाजुक रुपडें दिपडें ठिकडें जिकडे तिकडे असकारा। कऱ्हाडची कां कोल्हापुरची देखण्यांत बाकी तारा ॥' अशा युवतीच्या रुपाचें वर्णन करितांना 'गोरे गाल जसा नरम खवा' 'जशी चमकली नंगी समशेर अलम पाहती भिराभिरा' हें त्याच्या वर्णनाचें वैशिष्टय आहे. होनाजीप्रमाणें अंतरंगांत शिरून 'हंसणें, रुसणें हीं प्रीतीचीं लक्षणें' असें विवेचन परशरामाला करतां येणार नाहीं. त्याच्या भाषाशैलींत नागरिकांची सफाई नाहीं, संस्कृत शब्दांची लीला नाहीं, अलंकारांची कृत्रिम शोभा नाहीं; परंतु अस्सल मराठीचा जोम, स्वच्छंद भराऱ्या, आणि स्वाभाविक मोहकता हे गुण भरपूर आढळतात. 'टुमदार कुणाची छान। नवती भरज्वान पुसा रे आली कुठून.॥ स्वरुपाचे तुटती तारे कडाकड विजवा पडतिल तुटून ॥' ही त्याची लावणी, रामजोशाच्या 'कोण्या ग सुभगाची मदनमंजरी।' या लावणीपेक्षां कांकणभर सरस वाटते. 'गगनांत चांदणी ठळक। मारशी झळक। उभी ग अंगणीं। किति नटुन थटून मारशील छनाछन नैनाच्या संगणी ॥ झालों घावाविण घायाळ। झोंबला विखारी व्याळ। जणूं टाहो करी कोयाळ। तूं न कळे घालशी माळ। कोणाला ग उठून ॥' या तुफानी वर्णनापुढें 'सुंदरा मनामधिं भरली, जरा नाहीं ठरली, हवेलित शिरली, मोत्यांचा भांग ॥' हें वर्णन फिकें पडतें. 'कसून तीर गेला उराशीं नवळी गवळी जशी नागन। प्राणवल्लभे उभे तुजसाठीं प्रभे नभाचें भरलें गगन ॥' असें नायिकेला सांगणारा नायक 'भला घोडा अस्सल काबुलचा लालबोर टाकम तुरकी। जडाव

जीनवर स्वार होउनिया शिंदेशाही बांधुन फिरकी । चतुर सुलक्षण बत्तीस लक्षणी दवलत घरीं महामुरकी ।' असा विलासिक उमदा शिपाई गडी असला पाहिजे आणि त्याची प्रियकरीण 'कटी बारिक वेताची जशी बोथाटी, देखणी, सरळ सडक । × × × । हास्यवदन जशी मदन पुतळी' ही मराठमोळ्यांतील मोकळ्या वातावरणांत वाढलेली कुलीन कुमारी असली पाहिजे, हें सहज ध्यानांत येतें. पढिक विद्येचे संस्कार न झालेल्या काव्यांत ताजेपणाचा तजेला आणि जोम कसा असतो हें परशराम आणि सगन यांच्या लावण्यांत स्पष्ट दिसून येतें.

पेशवाई बुडाल्यावर प्रभाकराप्रमाणें परशरामालाही इंदूरबडोद्यापर्यंत उदरभरणार्थ भटकावें लागलें; परंतु त्यानें आपल्या कवितावधूची विटंबना केली नाहीं. शृंगाराच्या अश्लील वर्णनांनी रंगेल यजमानांना खुष करण्याचा गौण मार्ग त्यानें पतकरला नाहीं–गोषा झुगारून देणाऱ्या स्वतंत्र महाराष्ट्रांत स्त्रियांविषयीं छचोर आणि कुजट कल्पनांना थारा नाहीं, हें होनाजी बाळा-प्रमाणें परशरामानेंही व्यक्त केलें आहे. 'देहकांति कर्दळीचा गाभा प्रभा तिच्या मुखचंद्राची । × × × । महान महाची तर्पे ढाळिलीं एकुलती एक नवशाची । × × × । छडी फुलांची कंबर बारिक पितांवर नेसली । नटल जणुं गगना उविट तुटली ।' अशी 'छेल छबीली नाजुक पुतळी उंबर (उम्मर) कांहीं एक वर्षाची ।' पाहून परशरामाच्या मुशाफर नायकाला 'पुसावी कोण्या हवशाची ।' असें वाटेल ! परंतु ती परस्त्री आहे असें कळतांच 'ज्याची त्यास लखलाभ असो ! आम्ही मुशाफर अकत्यारी । आम्ही निर्गुणीं मुखत्यारी । **पाहुं बाहुलें जसें भिंतीवर चित्र काढतां चितारी ।'** असें म्हणून तो वाटेस लागेल ! तारुण्याच्या भरांत बफाम न होण्याचा उपदेश करण्यासाठीं परशराम म्हणतो 'जुने ढोळ नवे तमाशे आम्ही पाहिले फार । सखे गे दे सोडुन वेडेचार ॥ करूं नये तें भलतेंच करिती नव्या नवतिच्या बळें । उतार वयांत पदरीं पडतील फळें । × × × । धनदौलत जरि पदरीं असली पाण्यावाणी पळे । × × × । विषय हाच बचनाग प्रथम खातां लागे गोड । अंगि भिनल्या मोडितसे खोड ।'

उपरोधिक वचनांनीं उपदेश करण्यांत परशराम अनंतफंदीची बरोबरी करूं शकणार नाहीं; परंतु त्या धर्तीच्याही त्याच्या कित्येक लावण्या बऱ्याच वरच्या दर्जाच्या आहेत. ' सोनार शिक्का नवा निघाला पंधरा आणे जरी बट्टा ॥' या लावणींत अंगीं अवसान किंवा योग्यता नसतां भलतीच फुशारकी मारणाऱ्या घमेंडखोरांचा–अनेक उदाहरणें देऊन–चांगलाच समाचार घेतला आहे. तो म्हणतो 'हेल्यावर जरी दिली अंबारी मटकन बसेल भारानं । × × × । उदंड झाला ताजा गधडा, वर शोभेल काय जीन ? । भीक मागून पिंड घालशी तर स्वर्गीं कैसा वाजेल घंटा ? ॥ " " श्रावणमासीं शिरड मातले शेपाघरीं नेऊं लग्न । चैत्रवैशाखांत या म्हणून म्हटलें तिकडेच गेले मरून । " हें परशरामानें दिलेलें उदाहरण अंगीं कर्तबगारी नसतां परिस्थितीमुळें आलेल्या ओंट घटकेच्या वैभवाचा गर्व कसा आपोआप उतरतो,तें फार मार्मिकतेनें निदर्शनास आणितें. शीलहीनाचा गर्व कसा पोकळ असतो त्याविषयीं परशराम याच लावणीच्या शेवटीं म्हणतो "अशीलाचा पोकळ ताठा ! साऱ्या गांवचे ओहोळ मिळून गंगेची करिती थट्टा ! "

' सर्वे गुणा: कांचनमाश्रयन्ति । ' हें तत्त्व ' जराविण जगिं जरब बसेना जर पदरीं तर काय होईल । जर पदरीं जर नसला तर तो नर संसारीं येऊन बैल ॥ ' या परशरामी लावणीत आलें आहे. ' जर पदरीं तर गंगा यमुना घरींच येउन भेटावी । ' 'जर पदरीं तर जवराईनें खऱ्यास खोटें करि रेटून । ' हे अनुभव त्रिकालाबाधित आहेत; परशरामाला आले तसे आजही येतात !

परशराम आणि प्रभाकर समकालीन होते. प्रभाकर पेशव्यांच्या दरबारीं मान्यता पावला. परशरामाचें बहुतेक आयुष्य एका गांवांत गेलें. परंतु परशरामाच्या लावण्यांत तत्कालीन समाजाचें चित्र जसें दिसून येतें तसें राजदरबारच्या ढंगांत रंगून गेलल्या आणि काव्यगुणाच्या जोरावर द्रव्यार्जनाच्या पाठीस लागलेल्या इतर पांचही शाहिरांच्या काव्यांत आलेलें नाहीं. राजे, पेशवे, सरदार यांची मनधरणी करण्यासाठीं इतर शाहिरांनीं इतिहास, प्रेम, शृंगार यांवर कवनें केलीं. परशराम साऱ्या भोळ्या गांवकऱ्यांत राहिला-

त्यांचे आचारविचार, त्यांची रहाणी, आणि त्यांचा जीवनक्रम यांचें वर्णन करून सामान्य जनतेचें रंजन करण्यांतच त्यानें समाधान मानिलें. त्यामुळें त्याच्या कवितेंत पांडित्याचें तेज, कल्पनेचें वैभव किंवा कलेचा उठाव हे गुण नसले, तरी त्याचें काव्य जिज्ञासेनें वाचण्याची आतुरता वाटते. मराठ्यांच्या मर्दुमकीच्या काळीं स्त्रिया देखील वीरांगना बनल्या होत्या याची जाणीव देणारें 'अस्सल जरद्दी घोडी भिवरथडी वर बसली चांदणी। कान कळाशी फेरफटक्यामधीं कोणी तरी दिली आंदणी ॥' असें घोडीवरून फेरफटका करणाऱ्या स्त्रीचें वर्णन त्या दरबारी शाहिरांच्या काव्यांत मिळत नाहीं. रंगेल यजमानांना मोह घालणाऱ्या नाजुक फुलराण्यांचें वर्णनच त्यांनीं बहुश: केलें आहे. दरबारी कारस्थानांची झळ न लागलेला, शहरच्या चोंचल्यांची बाधा न झालेला, रावबाजीच्या अनीतिकर्दमापासून अलिप्त असलेला, खेड्यापाड्यांतील, शेतांमाळांवरील, झोंपड्याखोंपटांमधील, मोकळा, स्वतंत्र, साधाभोळा, दिलदार, बाणेदार, हौशी, उघड्या मनाचा खरा मराठा परशरामाच्या लावणींत पाहावयास मिळतो! तो स्वभावत: रंगेल आहे, त्याला इष्काची आवड आहे, त्याची नीतिमत्ता कांहींशी सैल आहे, त्याच्या रहाणींत गांवढळपणा आहे; परंतु त्याचा धर्माकडे ओढा आहे, त्याचा स्वभाव मानी आहे, आचरण सरळ आहे, वर्तन प्रामाणिक आहे, आणि मन उदार आहे असें आढळून येईल.



*

*

# सगनभाऊ.

जाळावांचुन कड येइना !
मायेवांचुन कोण रडतं ?
जखमी माणुस तरफडतं !
आतां अंत कां पहातां माझा ?
सांगा हितगुज आवडतं !

—सगन.

महाराष्ट्रांतील हिंदूंप्रमाणेंच मुसलमानही मराठेशाहीशी कसे समरस झाले होते, तें सगनभाऊच्या कवितेवरून दिसून येतें. मराठी राज्याच्या आरंभापासून मराठी सैन्यांत मुसलमान सैनिक होते; पानपतच्या लढाईत इब्राहिमखान गारद्यानें मराठी राज्यासाठीं अखेरपर्यंत लढून प्राण दिला; राणाखान हा महादजी शिंद्याचा एक आधारस्तंभ होता; तथापि केवळ त्यावरून मुसलमानांना मराठी राज्याविषयीं अभिमान वाटत होता असें सिद्ध होणार नाहीं. कारण निजाम वगैरे मराठी राज्याच्या शत्रूंच्या पदरीं अनेक मराठे सरदार असून मराठशाहीच्या मुळावर उठण्यास त्यांना मुळींच दिक्कत वाटत नव्हती. हिंदु मराठे हिंदु रजपुतांना सतावून सोडीत होते आणि बंगाली हिंदूंच्या मनांतील मराठ्या 'बुरजीं' विषयींची तेढ अद्याप समूळ गेलेली नाहीं. परंतु सगनभाऊसारखा मुसलमान शाहीर मराठेशाहीचे शौर्यपराक्रम प्रेमानें गातो; महाराष्ट्रीय संतांच्या भावनांत रंगून जातो; पंढरपूर आणि विठ्ठल यांवरील मराठ्याची प्रेमवृत्ति आपलीशी करतो; मराठमोळ्याच्या चालीरीति अभिमानानें वाखाणतो; हें पाहिल्यावर मराठेशाहीच्या वेळीं महाराष्ट्रांतल्या हिंदु-मुसलमानांच्या अंगीं बाणलेली वृत्ति केवळ स्वामिभक्तीची किंवा खाल्ल्या मिठास जागण्याची नव्हती—महाराष्ट्रभूमीवर त्यांची निष्ठा होती राष्ट्रीयत्वाची भावना महाराष्ट्रांत संचरली होती, असें वाटूं लागतें. जगन्नाथरायानें 'दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा मनोरथान्पूरयितुं समर्थः ।' असे

जे स्वाभिमानशून्य उद्गार काढिले त्याचा वचपा "जन्मा येउनि नामस्मरणीं विठ्ठल जागवाल काय ? । सगनभाउचें कवन रावबाजीला ऐकवाल काय ?" असा सवाल करून सगन शाहिरानें सव्याज भरून काढला !

पुणें दरबारासारख्या विद्वानांनीं गजबजलेल्या ब्राह्मण पेशव्यांच्या दरबारांत सगन मुसलमानानें काव्यगुणांत मान्यता मिळविली, ती आजवर टिकून आहे, ही एकच गोष्ट त्याच्या कवित्वाची साक्ष देण्यास पुरेशी आहे. सगनभाऊ जातीनें मुसलमान होता. त्याचा पिढीजाद धंदा शिकलगारीचा म्हणजे हत्यारें पाजळून त्यांना धार देण्याचा होता. त्याच्या विषयींची माहिती फारच थोडी उपलब्ध आहे, तशीच त्याची बरीच कविताही अप्रसिद्ध आहे. सगनभाऊ इ. स. १७७८ त जन्मला असें भावे म्हणतात, तें रा. यशवंतराव केळकरांना मान्य आहे; परंतु पुण्यांतला रंग व खड्र्याची लढाई या प्रसंगांचीं सर्व शाहिरांनीं वणनें केलीं आहेत, असें रा. भावे यांनीं लिहिण्याच्या भरांत ढिलाईचें वर्णन केलें आहे, तेवढ्या चुकीसाठीं रा. यशवंतराव, भाव्यांच्या सर्वच विधानांविषयीं शंका प्रदर्शित करून बेसुमार टीका करितात तें योग्य नाहीं. पुण्यांतील रंग व खड्र्याची लढाई यांवर सगनभाऊचें कवन उपलब्ध नाहीं हें खरें; परंतु तशीं कवनें उपलब्ध असतीं तर त्याचा जन्मकाल मागें न्यावा लागला असता, हें रा. यशवंतरावांचें अनुमान तर्कशुद्ध नाहीं. कारण सगनभाऊचा पानपतचा पोवाडा आहे, त्याचा काल वरील दोन्ही प्रसंगांपूर्वी तीस वर्षांचा आहे. तेवढ्यावरून सगनभाऊ नानासाहेब पेशव्यांच्या काळीं हयात होता असें सिद्ध करूं पाहाणें चुकीचें होईल. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत सगनभाऊ प्रसिद्धीस आला. लवकरच त्याची गणना दरबारी शाहिरांत होऊं लागली. होनाजीबाळाचा तो प्रतिस्पर्धी होता असें 'सगनभाऊ म्हणे होनाजी बाळा उन्म[illegible] [illegible] [illegible]कडें !' 'होना गवळ्याचा झाला चुना !' वगैरे त्याच्या लावण्यांत[illegible] उद्गारांवरून दिसतें. परंतु त्याची कविता असे उद्गार काढण्याइतकी [illegible] [illegible] काव्याच्या तोडीची नाहीं.

सगन मूळचा जेजूरीचा, पण त्याचा पुष्कळ काळ पुण्यांत गेला. इ. स. १८१८ त पेशवाई बुडाल्यानंतर त्याला साताऱ्यास सातारकर महाराजांच्या पदरीं आश्रय मिळाला. तेथें त्यानें पानपतावरील पोवाडा लिहिला. पेश-वाईप्रमाणें सातारकर छत्रपतींच्याही राज्यनाशावर पोवाडे लिहिणें त्याच्या नशीबीं आलें. सगनभाऊ १८४० नंतर किंवा त्या सुमारास वारला.

सगनभाऊनें पानपतचा पोवाडा रचला तो पेशवाई बुडाल्यानंतर म्हणजे पानपतच्या लढाईनंतर सुमारें साठ वर्षांनीं लिहिला. शाहिरांचे पोवाडे बहुशः समकालीन प्रसंगांवर रचलेले असतात. 'अमुक प्रसंग घडून आल्यानंतर ६०।७० वर्षांनीं त्यावर फिरून पोवाडा झाल्याचें एवढें एकटें एकच उदाहरण शाहिरी वाङ्मयांत दृष्टीस पडतें,' असें रा. यशवंतराव केळकर म्हणतात. जंगबहादर नामक मूळ उर्दू पोवाड्याचें हें स्वैर मराठी भाषांतर असल्याचेंही त्यांनीं नमूद केलें आहे. या पोवाड्यांतील वर्णन अनेक ठिकाणीं चुकीचें आहे. "भाऊ नाना तलवार धरून । गेले गिलच्यावर चढाई करून ॥' या सुर-वातीच्या कडव्यांतच सदाशिवराव भाऊंबरोबर नानासाहेब पेशवेही गेले होते, अशी चुकीची माहिती दडपून दिली आहे. या पोवाड्यावरील रा. यश-वंतरावांची सुरवातीची टिप्पणी वाचनीय आहे. 'पोवाडा भाषेच्या दृष्टीनें बरा असला तरी ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनें अगदीं अधम प्रतीचा आहे' हें त्यांचें मत ग्राह्य वाटतें; तथापि सगनभाऊ महाराष्ट्रांतील हिंदूंच्या भावनांशीं कसा तद्रूप बनला होता हें देखील त्या पोवाड्यांत व्यक्त होतें. "नाना भाऊ गादीवर शूर जन्मले जैसे अर्जून । × × × । गर्व कोंदला फार जैसा लंका-पती रावण । होणारासारिखें अक्षर कैसें लिहिलें ब्रह्मयानं ॥' हे पौराणिकसंदर्भ सगनभाऊनें यथोचित योजले आहेत. अपशकून झाला असतांही 'भाऊ ऐकेना कोणाला । दक्खनची सौभाग्यगळसरी तुटली त्या समयाला ॥' ही उपमाही मराठ्या हिंदूचीच आहे. 'ब्राह्मणराज्य पेशवाई बुडाली असें नाहीं होणार !' असा सगनचा विश्वास आहे. 'होळकरानें फितवा केला ।' हा प्रवाद त्यानेंही खरा मानिला आहे. या युद्धाला भीष्मयुद्धाची व कर्ण-

युद्धाची भारती उपमा सगन देतो व म्हणतो–' नवलाख बांगडी फुटली हाहाकार । दक्षिण बुडाली सती पडल्या महामूर । × × × । सोन्याची जळली भट्टी, उरलें खापर ।'

बाजीरावाची सगनभाऊवर फार मर्जी होती. खडकीच्या लढाईनंतर बाजीरावाला पुणें सोडावें लागलें त्या वेळची पुण्याची दीनवाणी अवस्था सगनभाऊनें वर्णिलेली मागें होनाजीच्या प्रकरणांत दिलीच आहे. त्यानंतर पावणेदोन वर्षांनीं सगनभाऊनें केलेला त्यापेक्षांही उत्कृष्ट असा रावबाजीवरील पोवाडा रा. यशवंतराव केळकरांनीं दिला आहे. " गगन कडकडुन पडलें, पार नाहीं दुःखाला । श्री शैल्य मल्लिकार्जुना आम्हीं अंतरलों सुखाला॥' असा त्या पोवाड्याचा प्रारंभ आहे.

' दुनया बापुडी दिसती, पैसा असून गांठीला, दक्षिणचें सौभाग्यगळसरी कोण्या रोहकाला ( जलचराला=इंग्रजाला ? ) । ' ' लक्षांचें अन्न गेलें राव अंतरले गादीला । एकटे पक्षावाणि उडाले टाकुन मादीला ।' ' आग लागली दर्यांत बुडालें जहाज ठीक नाहीं । वनवास आला राजेन्द्राला निजला शेषशायी । ज्याचें होतें त्यास पारखें काळोखी मुखाला ।' ' रोजगार सावकार बंद उदम्यांचीं दुकानें । केंविलवाणे जन आपापल्या दुःखानें । नाहीं निखालस उदीम, अठरा बंद कारखाने । × × × । धड आहेव न, रंडकी न; कैसें केलें भगवंतानें । ' ' रयत बिचारी लोल झाली, उपटली पराला ।' अशी स्थिति तेवढया पावणेदोन वर्षांत झाली. तरी इतर कित्येकांप्रमाणें सगनभाऊलाही विश्वास वाटत होता कीं, ' घोर होईल परी हरण; चार दिवस स्वस्थ राहीं !'

छत्रपति प्रतापसिंह महाराजावर सगनचे दोन पोवाडे आहेत. त्यांत प्रतापसिंह पदच्युत झाल्याचें वर्णन आहे. सगन म्हणतो, ' अवघ्या राज्याची हीच गती पुकार झाला सर्वांना । अवघें राज्य करीना लढाई, खंडणी देती बहादुर इंग्रजाला ।' पेशवाई गेल्यामुळें सगनभाऊनें काढिलेले कळवळ्याचे

उद्गार भाव्यांनीं दिले आहेत. ' राजा कुणीकडे प्रजा कुणीकडे काय अशी आग पाखडली। अन्न विसरलों पाणि विसरलों वाळवंटीं जशी मासोळी पडली। तसेंच काय हो चहुं भवंत्या फौजा भयाभित झाल्या आभाळांत। जरिपटक्याचा हत्ती आमुचा रुतला गाळांत ॥'

मराठी राज्याशीं जशी सगनची आत्मभावना झाली होती तशीच मराठी संतांविषयींही होती.

' विठ्ठल दासी त्याची मी गाइन नामनगा रे। मुक्तेश्वराची ओंवी, जनीचा अभंग सदाकाळ गा रे।' ' कटीवर कर ठेवुनि उभा। पंढरपुर भीमातिरीं; भजा रे राईच्या वल्लभा। भक्तराज ज्ञानेश्वर, तुकाराम सांवता माळी, चोखामेळा वाट पाही दुर्लभा। माय माउली विठ्ठल आमुचा त्रैलोक्याचा सुभा। अगाध महिमा निष्कलंक जगद्गुरु। सगनभाऊ म्हणे असो द्यावी पूर्ण कृपेची प्रभा ॥' हे सगनभाऊच्या कवितेंतून रा. भाव्यांनीं महाराष्ट्र सारस्वतांत घेतलेले उतारे जरी संतचरित्रकार रा. ज. र. आजगांवकरांच्या नजरेखालून गेले असते तरी सगनभाऊची ' तुरेवाला सगन ' अशी हेटाळणी त्यांनीं केली नसती असें वाटतें. रामायण, महाभारत, व संत कवींची कविता सगनला अवगत होती, आणि हिंदूंचें आध्यात्मिक तत्त्वज्ञान त्याच्या ठिकाणीं मुरलें होतें, असें त्याच्या कवितेवरून दिसतें.

सगनची नायिका आपल्या वल्लभास आठवून म्हणते ' त्या संगें प्रीत घडो असा कधिं पावशील पंढरीनाथा।' प्रीतीची ग्वाही देऊन ती सांगते, ' यामध्यें संशय नाहीं साक्ष विठाई।'

गीतगोविंदकार जयदेवाच्या स्त्रीनें पतिमरणाची लटकी वार्ता ऐकून प्राण सोडला व अष्टपद्या म्हणून जयदेवानें तिला उठविलें, हा पातिव्रत्याचा दृष्टांत सगननें दिला आहे. परदाराभिलाषानें रावणाची गत कशी झाली याचा दाखला तो अनेकदां देतो. भारतांतील दाखले त्यानें पदोपदीं दिले आहेत, ' जीवंत तोंपर्यंत नाहीं जाणार तुला टाकुनी !' अशा आणा भाका देणाऱ्या

मुशाफर वल्लभाच्या थापांना आपण भाळून गेलें नाहीं असें खुबीनें सुचविणारी नायिका म्हणते, " एक वचन राहिलें, बसा शेजारीं राव ऐकतां । × × × । कृपा करुनि भगवंतानें मुखपाठ शिकविली गीता । मग कां अर्जुन पुन्हा चालला अभिमन्यूकरितां ? ॥ " अर्जुन जसा समजून उमजूनही मोहवश झाला, तशीच माझीही गत आहे. मी उमजून आहें तें "अक्षर धरावें चित्तीं, साजणा । या कलियुगाच्या प्रीती, साजणा । ×××। तुम्ही मुशाफर लोक प्रीत करूं पाहातां कोणत्या रीती । प्रीतीचा हावभाव काय तो सांगा मजप्रती ॥ "

कुंतीच्या सांगण्यावरून भीमानें इंद्राचा ऐरावत आणल्याचें कथानक एका लावणींत आलें आहे. तशींच हिंदु तत्त्वज्ञानाचीं कित्येक प्रमेयें सगननें आपल्या लावण्यांत गुंफिलीं आहेत. ' दुपारची सावली, नाहीं धनदौलतिचा भरंवसा ! ' ' मुळमाया सोडून वरळतो, दावितां कड आष्टी । ब्रह्मज्ञान कथून कांहीं ज्योत पडेना दृष्टी ।' असे दृष्टांत सगनभाऊ देतो. यादवी होऊन यादवांचा संहार झाला; किराताच्या बाणानें मर्मभेद होऊन कृष्ण विकळ झाला; 'बाण काढा प्राण चालला या समयीं वांचिव आम्हां । ' अशी त्याला अर्जुनाची काकुळती करणें प्राप्त झालें ! सगन म्हणतो, " चतुर्भुज नारायण त्याच्या गती अशा; शिव ! शिव ! रामा ! ! काय पाड आमच्या राज्याचा ! ठावें असे लिहिलें कर्मा ! ! "

प्रभाकराची वाखाणणी करणारे रा. भावे सगनच्या " लावण्यांत शृंगार फार आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं तर हा उत्तान शृंगारांत फारच रमतो व याची रचना अगदीं विचकट होते. मग याला कसलीच मर्यादा राहात नाहीं; " असा अभिप्राय देतात. ' सगनभाऊच्या लावण्या भेदक आहेत. ' हें रा. भाव्यांचें वाक्य घेऊन रा. यशवंतराव केळकर भेदक या शब्दाबद्दल 'भेदिक' ( म्हणजे परमार्थपर ) हा शब्द भाव्यांच्या माथीं मारून त्यावर निष्कारण टीकेचा खटाटोप करितात. ' अज्ञ जनांत सगन-भाऊच्या किंवा त्याहूनही शृंगाररसानें थबथबलेल्या अशा लावण्या म्हणण्याचा परिपाठ आहे व थोर व गंभीर मनाचे पुरुष त्यांचा धिःकारच करितात. '

हें शालिग्रामांचें वाक्य उद्‌धृत करून रा. यशवंतराव अप्रत्यक्षपणें सगन भाऊला नादान ठरवितात; परंतु ज्या प्रभाकराला रा. यशवंतराव 'पेशवाईतला खराखुरा शाहीरतुरा' म्हणून वाखाणतात त्याच्या अश्लीलपणाच्या पासंगासही सगनभाऊची उपलब्ध शृंगारिक कविता लागणार नाहीं. प्रभाकराच्या शृंगाराचा भर किळसवाण्या वर्णनांवर आहे, तसा सगनचा नाहीं. विलासाच्या बाह्य वर्णनापेक्षां प्रेमाच्या मनोभावनेलाच सगन महत्त्व देतो. 'चतुरसे चतुर मिला! चांदसे खुला! एकपर एक हो गये फिदा!' अशा प्रेमाचेंच तो वर्णन करितो. 'कुंकुं कपाळीं राजस वाळी बांधा केवळ बिन अरवा। बुचडयामध्यें खोउन मरवा। पेंडें तन्मणि जीवलग गडणी शालू नेसुन आज हिरवा।' अशी सगनची नायिका सांगते कीं, 'सजणाकडे मोहरा फिरवा। घडिभर जाउं, दर्शन घेऊं, बोलूं त्यासी बेपरवा। भेट सख्याची आज करवा। लई मन मिळलें, नाहीं कधीं टळलें, आण घाला माझ्या रक्ताची ॥ चंचल मैना बांधुन पैना आलें सजनाला भेटाया। चला उभयतां रंग पाह्या। राजस रुपडें जिविचें ठिकडें, भेटतांच लागन पायां। आहे मजवर त्याची माया। आड पडद्यानें बहु युक्तीनें मुख कुर्वाळिन पतिराया ॥' ती म्हणते 'प्रीतीच्या मंत्राची नाहीं दिधली मातेनें घुटी। काळें सांवळें स्वरूप माझें राख घेऊनि मुठी। नित्यकाळीं अंगास लावितें; काय होईल शेवटीं?।' तरी मनाचा धडा ती करतेच कीं, 'होइल तें होऊ, साजणा। नाहीं करीत कोणाची आस, साजणा। औषधास वेडा ऊंस, साजणा। गोड निघे ना रस; कडूपण काढिलें विरळा सुती।'

प्रियकराचा बेइमानपणा त्याच्या पदरीं घालणारी सगनची नायिका त्याला लावून म्हणते 'चोरटीं पाऊलें ओळखलीं बरी चित्तचोरा!' परंतु 'कसुन मारिला बाण, भेदला जाण या जिव्हारीं!' अशी व्याकुळ होऊन 'दो घटकेचें सुख शेवटीं पडलें मी उघडी!' असें तिला वाटतें. 'प्रीत घरोघर नाहीं!' असा ती आपल्या प्रियकराला उपदेशही करिते. शेवटीं आपण त्याला व्यर्थ दोष दिला, असें तिला कळून येतें. तिच्यासारख्या नाजुक सुंदर

स्त्रीचा पति बेइमान होणार नाहीं 'कवळी शेंग चवळिची सेवील कोण गव्हारी ?' असा सगनचा सवाल आहे.

'मनांत हसलें ग बाई हसलें। जाणून बुजून फसलें॥' असें म्हणणारी नायिका देखील जाणते कीं, 'प्रेमरसाची गोडी। आकाशीं आंबा पिकला पाडी॥'

मराठमोळ्याचा सगनभाऊला फार अभिमान आहे. "नार मऱ्हाठमोळ्याची। काय गोड बोलणें;भुजवर चालणें;मुरवत चौंडोळ्यांची!' असें तो वर्णन करितो.

सगनचीं वर्णनें मार्मिक आहेत. 'चंद्राचें चांदणें शितळ कां उष्ण प्राण-पती ? तें सांगा मजप्रती। कल्पना डोळ्यांमधिं खुपती।' या नायिकेच्या प्रश्नावर नायक उत्तरतो 'आपण शितळ असल्यास प्रभा चंद्राची शितळ दिसती। आपण उभयतां उष्ण। कल्पना मनिं वसति।' त्याच्या उपमाही विशिष्ट आहेत. 'मी नागिन घालिन झडा, तूं एक केवडा! पाहून सद्‌गुण जीवीं चिखलीं रुतला खडा! मी वावडी तूं एक सडा! नको मारूं आढा! झडूं दे इष्कि नौबद वाजित्र चौघडा! मी देहें काटें तूं जिवलग माझा हुडा! जाईजुई चमेली तूं गेंद भरला पुडा!'

सगनभाऊ हा सिदू रावळाचा शिष्य होता. रावळ व गवळी यांची चुरस असल्यामुळें त्यानें होनाजीला लागट असे कित्येक उद्‌गार काढिले आहेत. तसेंच 'रावळ सिंधु समर्थ माझा। प्रसन्न ज्ञानेश्वर महाराजा॥' असेंही म्हटलें आहे. तथापि आपसांतील चुरस नसेल तेव्हां इतरांना 'रावळ गवळ्यांची चाल नित्य मुखीं गात जा' असाच लोकांना त्याचा उपदेश असावा! तथापि रा. भाव्यांनीं 'सिदु राउळाचे छंद नित्य मुखीं गात जा।' असा या कडव्याचा पाठभेद दिल्यामुळें सगनभाऊनें लावणी छंदाचा प्रसार लोकांत करण्याच्या इच्छेमुळें आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या कां होईनात, पण लावण्यांच्या चाली रूढ व्हाव्या म्हणून इतकी सहिष्णुता दाखविली असेलच असें म्हणतां येणार नाहीं.

हिंदी मराठी मिश्र लावण्या सर्व शाहिरांनीं केल्या आहेत; परंतु "दाद कोई नहीं देता; मैं तो जोगन होऊंगी। राख लावा माझे अंगीं॥" ही

सगनची लावणी 'सगनभाऊके ख्याल हरफ चमके समशेर नंगी ॥' ह्या त्याच्या आत्मप्रौढीचें समर्थन करिते.

सगनच्या अंगीं परशरामाइतकीही विद्वत्ता नव्हती. तरीही अगदीं साध्या मराठी भाषेंतही किती जोम व अर्थ आणतां येतो हें सगनची कविता दाखविते. सगन मूळचा मुसलमान; परंतु मराठी राज्याच्या अमदानींत त्यानेंही मराठेशाही कल्पनांच्या वर्णनानें मराठी काव्यांत बहुमोल भर घातली. रावबाजीनें मराठेशाही रसातळास नेली; परंतु त्याच्या विलासी कारकीर्दींत शाहिरी काव्याला बहर आला. आज देखील गवई गाण्यांत मराठी पदांना मान नाहीं; विलासी बाजीरावाच्या मनाला ही उणीव फार जाचली. म्हणून त्यानें होनाजी, प्रभाकर, सगन यांना आश्रय देऊन राग-दारीच्या लावण्या तयार करविल्या. परंतु मराठी कवितेला राजाश्रय मानवत नसावा. त्याच्या जोपासनेनें आलेला हा बहर त्याच्या सत्तेबरोबरच अस्तास जाऊन त्यानंतर पाऊणशें वर्षें मराठी काव्याची आबाळ झाली. सगनभाऊ सांगतो कीं,

भर नवतीचा बहर रुताचा पाहा नेत्र भरून ।
नानापरिचीं पुष्पें सुकती सुवास येइना फिरून ॥



# शाहिरांच्या काव्याचें समालोचन.



सगनभाऊचा पानपतचा पोवाडा खेरीजकरून कोणत्याही शाहिरानें स्वतःच्या आठवणीबाहेरच्या ऐतिहासिक प्रसंगावर पोवाडा किंवा लावणी रचल्याचें आढळत नाहीं. पौराणिक कथांशीं शाहिरांचा जितका परिचय होता, तितकी देखील त्यांना आपल्या ह्यातीपूर्वींच्या इतिहासाची माहिती असल्याचें त्यांच्या काव्यांत आढळत नाहीं. प्रभाकरानें मात्र एका पोवाड्यांत बाळाजी विश्वनाथापासूनच्या पेशव्यांचें वर्णन फार त्रोटक रीतीनें केलेलें आहे. गतेतिहासाची आठवण अभिमानानें ताजी ठेवण्याची किंवा भविष्यकाळांत दूरवर नजर पोंचविण्याची प्रवृत्ति मराठेशाहींतील फारच थोडया व्यक्तींच्या ठिकाणीं आढळते. मराठी राज्याच्या आरंभापासून मराठेशाहीवर एकसारखे असे प्रसंग येत गेले कीं, त्यांतून निभावून पुनः पूर्ववत् घडी बसविण्यांत त्या वेळच्या कर्तबगार पुरुषांची सर्व करामत खर्ची पडली. त्यामुळें सुव्यवस्थित कारभाराची मांडणी करून पुढील कार्य आखून देण्यास कार्यकर्त्यां व विचारी पुरुषांस अवसर मिळाला नाहीं. सामान्य जनता याच घडामोडींत निमग्न झालेली होती. सर्वांना सामान्य अशा परिस्थितींत शाहिरांनाही मागील किंवा पुढील काळाकडे नजर पोंचवितां आली नाहीं, याबद्दल त्यांना फारसा दोष देतां येणार नाहीं. आलेल्या प्रसंगांतून निभावून वाढत्या वैभवाचा उपभोग घेणाऱ्या पेशवाईच्या अमदानींत मराठ्यांना शिवकालीन परिस्थितीचा आणि पराक्रमाचा विसर पडत चालला होता असें दिसतें. शिवकालाहूनही उज्ज्वल आणि महाराष्ट्राच्या इतिहासांत अत्यंत अभिमानास्पद असा जो संभाजीच्या वधानंतरचा काळ त्या काळांतील स्वामिभक्त व पराक्रमी वीरांचीं स्तुतिगीतें गाणारा एकही तत्कालीन पोवाडा असूं नये व मराठेशाहीच्या अखेरपर्यंत तसा पोवाडा रचण्यांत येऊं नये, ही गोष्ट मराठ्यांच्या स्वभावांतील एकांगीपणा दाखविणारी आहे. मराठेशाहींत कली माजण्यास व मराठेशाहीचा ऱ्हास होण्यास हाच दोष पुष्कळ बऱ्याच अंशीं कारण झाला. तो दोष शाहिरी काव्यांत ठळकपणें दिसून येतो.

आधुनिक मराठी कवितेवर इंग्रजी काव्याची पुष्कळच छाया पडलेली आहे. शाहिरांना इंग्रजीचा गंधही नव्हता. संतकवि आणि पंडित कवि यांच्या कवितेशीं त्यांचा चांगलाच परिचय होता. असें असतांही शाहिरी काव्याचें आधुनिक कवींच्या कृतीशीं जितकें साम्य आहे तितकें संत व पंडित कवींच्या काव्याशीं नाहीं, हा प्रकार आश्चर्य वाटण्यासारखा आहे. संत कवींच्या काव्यांत समकालीन लोकस्थितीचें किंवा लौकिक विषयांचें वर्णन धर्मपर व भक्तिपर वर्णनाच्या अनुषंगानें व गौणत्वानें आलें आहे. त्याच्या उलट आधुनिक कवींप्रमाणें शाहिरांनीं लौकिक विषयांना व समकालीन लोकस्थितींतील व्यवहारांना आपल्या काव्यांत प्रमुखस्थान दिलें आहे. कित्येक संतकवि व पंडितकवि यांप्रमाणें शाहिरांनीं महाकाव्यांचीं भाषांतरें केलीं नाहींत किंवा स्वतंत्र महाकाव्यें रचलीं नाहींत. एखादी लहानशी गोष्ट, एखादा प्रसंग, एखादी मनोभावना किंवा मनोविकाराची छटा घेऊन त्यांवर पोवाडा किंवा लहानशी लावणी रचण्याचा शाहिरांचा परिपाठ आहे; त्यावरून आधुनिक काव्याशीं त्यांच्या कवितेचें साम्य दिसतें. अलीकडील कवींच्या कविता वीतभर किंवा टीचभर असतात; एखाद्या महाकाव्याचा फुगारा किंवा ढिगारा त्यांच्या कृतींत दिसत नाहीं; ही आधुनिक कवितेची प्रवृत्ति इंग्रजीच्या अनुकरणामुळें उत्पन्न झाली, असें म्हणणारांनीं शाहिरी काव्यांत तशीच प्रवृत्ति कां दिसून यावी याचा विचार अवश्य केला पाहिजे. विचार केल्यास कारण समजणें कठीण नाहीं. संतांनीं ईश्वरभक्तीचा फैलाव करण्यासाठीं आणि धर्मतत्त्वांचा व अध्यात्माचा उपदेश करण्यासाठीं ग्रंथरचना केली. त्याप्रमाणेंच पंडितकवींचा मराठी ग्रंथरचना करण्याचा मुख्य उद्देश, आपल्या अध्ययनाचा व ज्ञानाचा लाभ सामान्य जनतेस करून द्यावा, असा होता. त्या वेळीं ग्रंथांची प्रसिद्धि होण्यासाठीं पद्यमय ग्रंथरचना करणें जरूर होतें म्हणून त्यांनीं पद्यात्मक ग्रंथ लिहिले. त्यामुळें पद्यरचनेंत ज्यांना विशेष महत्त्व आहे, असे शब्दालंकार व अर्थालंकार त्यांच्या ग्रंथांत सहजच आले. कवित्व करावें किंवा कवि म्हणून प्रसिद्धीस यावें, असा संतकवींचा किंवा पंडित कवींचा मुख्य हेतु नव्हता. त्यांच्या काळीं मुद्रणकला असती, ग्रंथ छापून त्याच्या सहस्रावधि प्रती लाखों वाचकांनीं वाचण्याची सोय असती तर ज्ञानेश्वरी व यथार्थदीपिका यांच्यासारख्या ओंवीबद्ध ग्रंथांच्या

ऐवजीं टिळकांच्या गीतारहस्यासारख्या गद्य टीका ज्ञानेश्वरानें व वामनानें लिहून छापल्या असत्या. तुकारामाचे किंवा नामदेवाचे अभंग न्या. रानड्यांच्या किंवा डॉ. भांडारकरांच्या धर्मपर प्रवचनांसारख्या गद्य स्वरूपांत दिसले असते; व रामायणाचीं एकनाथी व मोरोपंती गद्य भाषांतरें झाल्यामुळें चिपळूणकर मंडळीचा खटाटोप वांचला असता. परंतु शाहिरी पोवाडे किंवा लावण्या आहेत तशाच प्रकारच्या पद्यस्वरूपांत दिसल्या असत्या; कारण कविता करणें हाच शाहिरांचा पेशा होता; आधुनिक कवींप्रमाणें कवित्वगुणांत प्रसिद्धीस येण्याची त्यांची मनीषा होती. तत्त्वोपदेश किंवा प्रवचन कितीही लांबलें तरी चालतें; तत्वाच्या स्पष्टीकरणासाठीं पुनः पुनः त्याच गोष्टी निरनिराळ्या तऱ्हेनें सांगणें आवश्यक होतें. तसेंच कथानकाचें सूत्र, आणि त्यांतील वर्णनें व प्रसंग लांबल्यानें रसहानि होत नाहीं.परंतु कल्पनेच्या स्फूर्तीवरच ज्या भावनाप्रधान काव्याची भिस्त असते त्यांतील कल्पना लांबवर ताणतां येत नाही. त्यामुळें शाहिरांच्या लावण्या किंवा आधुनिक कवींच्या कविता चुटकेवजा त्रोटक पद्यांच्या स्वरूपांत असलेल्या दिसून येतात.

शाहिरी कवितेंत गणवृत्तांचा उपयोग केल्याचें उदाहरण कोठेंही आढळत नाहीं. मनांतील विचार सांगण्यास अडचण पडणार नाहीं अशा चालींचा उपयोग शाहिरांनीं केलेला आहे. तथापि ऱ्हस्वदीर्घांच्या किंवा इतर व्याकरणोक्त नियमांचें फारसें उल्लंघन त्यांच्याकडून झालेलें नाही. म्हणून सर्वच शाहिरांनीं व्याकरणाचा अभ्यास केला होता असें म्हणतां येणार नाही. मराठी भाषा बोलतांना जे उच्चार, आरोह व अवरोह सहाजिकपणें होतात, आणि जे प्रयोग प्रचारांत असतात ते पद्यरचना करतेवेळीं सहसा बदलूं नयेत यासाठीं मात्र त्यांनीं बरीच काळजी घेतलेली दिसते.

आधुनिक मराठी कवितेंत गूढवादाचा किंवा अज्ञेयवादाचा (mysticism) जो एक प्रकार आहे तो शाहिरी काव्यांत आढळत नाहीं. परशरामाच्या कित्येक लावण्यांत अध्यात्मिक कोड्यांसारखी जी थोडीशी रचना आहे ती य गूढवादाशीं कांहींशी सदृश आहे, असें म्हणतां येईल; परंतु हा कोड्याचा प्रकार वेदकाळाइतका जुना आहे. अशीं कित्येक कोडीं वेदांत आढळतात, भागतांत आहेत, व संतकवींच्या काव्यांत आहेत. गोंधळ्यांच्या कवनांतही अशीं कोडीं असतात. रामदासाचें एक डफगाणें प्रसिद्ध आहे त्यांतील कूटप्रश्न असा:

पोरकटपणाचे, पण कोणालाही निरुत्तर करणारे आहेत. कोड्यांचा वितंडवाद घालणाऱ्या गोंधळ्यांना ताळ्यावर आणण्यासाठीं तें डफगाणें रचल्याची एक आख्यायिकाही आहे. कोडीं घालणें व सोडविणें हा जसा पोरांचा खेळ आहे, तसाच गूढवाद हा विद्वानांचा एक कामगिरीचा प्रकार बनला आहे. 'सपूर्ण', ' हरवलें श्रेय' वगैरे केशवसुतांच्या हृदयंगम कवितांचें अनुकरण भलतीकडेच वहावत चाललें असून डॉ. टागोर यांच्या गीतांजलीस मिळालेलें नोबेल प्राइझ पाहून कित्येक आधुनिक कवींची प्रतिभा बहकल्यासारखी दिसते. नाथांच्या घरीं 'वळचणीचें पाणी आढयाला गेलें' होतें; त्याचें अनुकरण करण्याची बुद्धि शाहिरी काव्यामृताला झाली नाहीं हें मोठें भाग्यच म्हटलें पाहिजे !

इंग्रजी कवितेच्या परिचयानें आधुनिक मराठी कवींच्या काव्याला जें रूप आलें, असा प्रवाद आहे, तें रूप शाहिरांच्या कवितेंत पाहिलें म्हणजे हा प्रवाद खरा धरून चालतां येणार नाहीं, असें अनुमान करणें प्राप्त होतें. ' मुरली ' हा विषय अनेक अर्वाचीन कवींना आवडीचा झाला आहे. प्रभाकरानें त्याच विषयावर तीन लावण्या लिहिल्या; त्यांतील एक लावणी कोणत्याही आधुनिक कवीच्या ' मुरली 'शीं अतिशय सदृश दिसते. प्रभाकर, परशराम आणि होनाजी या तिघांच्याही लावण्यांचा ' अरुणोदय ' हा विषय कित्येक अर्वाचीन कवींना प्रिय झाला. प्रेम, काव्य, सौंदर्य वगैरे आधुनिक कवींना आवडणारे विषय शाहीरकवींनीं मनमुराद गायिले. यावरून या विषयांची आवड आमच्याकडे केवळ इंग्रजी काव्याच्या अनुकरणानें किंवा परिचयानें उत्पन्न झाली, हें मत चुकीचें ठरतें. गणेशस्तवन, देवादिकांवरील लावण्या, वेदांतोपदेश, वैराग्योपदेश वगैरे विषय ज्याप्रमाणें शाहीरकवींचा जुन्या संतकवींशीं संबंध जडवितात त्याप्रमाणेंच त्यांच्या लावण्यांचे लौकिक विषय त्यांचें नातें अर्वाचीन मराठी कवींपर्यंत आणून पोंचवितात.

एकाच विषयाचा विचार करतांना सारखे शब्द व कल्पना शाहीरकवि आणि अर्वाचीन कवि यांच्या काव्यांत आढळतात. कन्येचा विक्रय करून तिला वृद्ध वरास देणाऱ्या बापाचा निषेध ' जळो जळो बापमाय । जो कन्येचें धन खाय ।' ही लावणी रचणारा दामू नागू ' वृद्ध त्रिनेत्रा कन्या कसी दिधली दक्षा ?' असा प्रश्न करतो तीच कल्पना देवलांच्या 'शारदा' नाटकांत 'हिमनग जो पाषाणहृदय तो प्रसवे गौरीला ' या पद्यांत येते. शारदा नाटकाच्या

नांदीत, व 'झाला सांग विवाह शंभु मग ये कैलासिं गौरीसवें' या मंगलाष्टकांत शिवगौरीच्या विषमविवाहाची तीच कल्पना निराळ्या रीतीनें व्यक्त होते.

आधुनिक कवींवर शाहिरी काव्याची छाप पडलेली आहे; परंतु शाहीर कवींनी इंग्रजीशीं सदृश असलेल्या काव्यरचनेचा प्रकार केवळ स्वतःच्या कल्पनेनें निर्माण केला. इंग्रजीच्या अनुकरणाचा वास येतो म्हणून आधुनिक मराठी काव्य तुच्छ मानणारांनीं ही गोष्ट दृष्टीआड करितां नये. मुसलमानी सत्तेचें दडपण दूर होऊन, धर्मनाशाच्या भयापासून मुक्त होतांच मराठी काव्याला जें वळण लागलें त्याचाच पुढें विकास झालेला आधुनिक मराठी कवितेंत दिसून येतो. परशराम, प्रभाकर आणि सगन हे पेशवाईच्या अखेरीचे शाहीर इ. स. १८४० च्या आगेंमागें दिवंगत झाले. त्यापूर्वी सुमारें वीस वर्षें इंग्रजी अंमल सुरू झाला. अव्वल इंग्रजींत शाहिरी काव्याला मान राहिला नाहीं. संस्कृत विद्येला पेशवाईच्या काळाहूनही कांहींसें जास्त महत्व चढलें. त्यामुळें शाहिरी कविता मागें पडली. परशराम तात्या गोडबोले, कृष्णशास्त्री चिपळूणकर, डॉ. कीर्तिकर, हेमे, महाजनी, मोगरे, वगैरे इंग्रजी अंमलाच्या पहिल्या काळांत झालेल्या कवींवर संस्कृत काव्यांची व वामनमोरोपंतादि पंडित कवींची छाप पडलेली आढळते. महादेव मोरेश्वर कुंटे यांनी या पंडितगिरीच्या पकडींतून सुटण्याचा कांहीं यत्न केला; परंतु त्यांस यश आलें नाहीं. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस कृष्णाजी केशव दामले ऊर्फ 'केशवसुत' यांनी अर्वाचीन काव्याची प्राणप्रतिष्ठा केली. रे. नारायण वामन टिळक, आणि गडकरी यांनीं केशवसुतांची परंपरा पुढें चालविली.

गडकऱ्यांची कविता कितीही सदोष असली तरी त्यांनी अर्वाचीन मराठी कवितेंत केशवसुतांनीं गुंफिलेला शाहिरी काव्याचा सूक्ष्म धागा बळकट करून आधुनिक मराठी काव्याची शाहिरांच्या गीतांशीं असलेली गांठ पक्की केली. केशवसुतांच्या काव्यांत मराठेशाहीतला "महादेव! हरहर! समराचा गर्जत तो वाऱ्यावरती" कानीं घुमतांच "निजलेल्या जागृति आली, हो ताजें जें थकलेलें!" अशी सत्यता गडकऱ्यांनीं पटविली. आधुनिक मराठी काव्याचा उगम इंग्रजी वाङ्मयापासून नाहीं. ज्ञानेश्वरांच्या काळापासून चालत आलेल्या मराठी कवितेचा तो परिपाक आहे. संतकवि आणि पंडितकवि यांच्या कवितेशीं आधुनिक काव्याला जोडणाऱ्या दुव्याप्रमाणें शाहिरी कवितेचें कार्य आहे.

# समारोप.



आज उपलब्ध असलेल्या मराठी वाङ्मयाचा आरंभ सामान्यत: ज्ञानेश्वरांपासून होतो. ज्ञानेश्वरांची रचना धार्मिक वाङ्मयाची आहे. त्यापूर्वीचे महानुभाव पंथाचे ग्रंथ आढळतात. तेही त्या पंथाचे धर्मपर ग्रंथ आहेत. त्या ग्रंथांतील व ज्ञानेश्वरींतील भाषेची रचना पाहातां मराठी भाषेंत त्या काळीं केवळ धार्मिक ग्रंथांचीच रचना झाली असेल असें वाटत नाहीं. संस्कृत कवींचीं नाटकें, मेघदूतासारखीं काव्यें, कथासरित्सागरांतील गोष्टी, यांचा भाषांतरें करून किंवा तसें स्वतंत्र वाङ्मय स्वभाषेंत रचून सामान्य जनतेचें मनोरंजन करणारे ग्रंथकार त्या काळांत झाले नसतील किंवा तशा वाङ्मयाची आवड नसण्यासारखी लोकांची मनोरचना असेल असें वाटत नाहीं; परंतु ज्ञानेश्वरांनंतर महाराष्ट्रांत मुसलमानी सत्ता झाली. तीनशें वर्षांचा काळ धामधुमीचा गेला. त्या काळांत कांहीं धार्मिक वाङ्मयाखेरीज इतर प्रकारच्या वाङ्मयाचें रक्षण झालें नसावें. ब्राह्मणांखेरीज इतर वर्ग साक्षर नव्हते. हिंदू धर्म कायम ठेवल्यानेंच ब्राह्मणांची श्रेष्ठता टिकावयाची होती. त्यामुळें धर्मनिष्ठ अशा हिंदूंची धर्मनिष्ठा कायम ठेवण्यासाठींच साक्षर ब्राह्मणवर्गाला सर्व प्रयत्न करावे लागले. त्यामुळें धार्मिक वाङ्मयाचा तेवढा बचाव होऊन इतर प्रकारचें वाङ्मय नष्ट झालें असावें. मुसलमानी अंमलांत जे ब्राह्मणेतर विचारी पुरुष झाले त्यांनींही धर्मरक्षणाकडेच सर्व लक्ष दिलें. त्यामुळें धर्मपर मराठी वाङ्मयांतच भर पडत गेली. धर्मपर वाङ्मयाशिवाय इतर प्रकारच्या मराठी वाङ्मयाचा नाश झाला असल्याचें दुसरेंही एक कारण संभवतें. एकनाथांच्या वेळेपर्यंत व त्यानंतरही विद्वान ब्राह्मणवर्गांत संस्कृत भाषेला अतिशय मान असून मराठी भाषा हीन दर्जाची समजली जात असे. त्यामुळें मराठी भाषेंत रचना झाली असली, तरी ती पुस्तकरूपानें लिहून ठेवण्याचें काम फारच थोडया प्रमाणांत होत असावें. ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथाच्या प्रती दुर्मिळ झाल्या होत्या. त्यांचा जीर्णोद्धार व संशोधन एकनाथांना करावें लागलें.